महाराष्ट्र-ग्रन्थ-प्रदीपावलि-प्रदीप पांचवा

सत्कार्योत्तेजक सभा - धुळें

श्री

# रामदास आणि रामदासी

भाग १२१ वा

सर ११ वा ] **श्रीसमर्थचरित्र** [ मणि ११ वा

## तृतीय खंड

## श्रीसमर्थसंप्रदाय



श्रीगुरुचरणांतें स्मरोनि ।
वाङ्मयमूर्ति हृदयीं धरोनि ।
शिष्यप्रशिष्यांतें हि पुसोनि ।
श्रीसंप्रदायस्वरूप प्रकटिलें ॥

१८६७ ज्येष्ठ शुद्ध १३ शनिवार
राज्याभिषेक शक
२७२

केशव भिकाजी ढवळे, : श्रीसमर्थ-सदन
गिरगांव, मुंबई

मूल्य चार रुपये

॥ श्रीरामसमर्थ ॥

# अनुक्रमणिका

॥ श्रीरामसमर्थ ॥

# ग्रन्थारंभ

(१) नमन—(२) ग्रन्थाचा विषय—(३) संप्रदाय कसा बनला—(४) ग्रन्थाला आधार—(५) उतारे च फार—(६) पुनरुद्धृति—(७) श्रीसमर्थांची हेतुपुरस्सर ग्रन्थरचना—(८) फलश्रुति

*** । *** । *** । *** । *** ॥

**जय जय जी सद्गुरुराया । अनाथजनकैवारिया ॥**
**तुमचें उत्तीर्ण व्हावया । देहेविण कांहीं न दिसे ॥**

तो देह हि, हे परम पुरुषा, आपल्या चरणीं अर्पण करून आशीर्वादाची याचना करितों. माझ्या हृदयीं अखंड वास करावा, माझी मति चालेनाशी होईल तेव्हां तिला गति द्यावी, कांहीं च दिसेनासें होईल तेव्हां पुढचा मार्ग सुचवावा आणि ग्रन्थ शेवटास न्यावा. मूळची कल्पना होती कीं, श्रीसमर्थहृदयानंतर श्रीसमर्थावतार व्हावा आणि अवताराच्या पाठोपाठ श्रीसमर्थसंप्रदायाचें दर्शन व्हावें. पण ज्या स्वरूपांत श्रीसमर्थावतार व्हावा, अशी इच्छा केली आहे, त्या स्वरूपांत तो प्रकट होण्याची वेळ अजून आली नाहीं. तेव्हां प्रस्तुत श्रीसमर्थसंप्रदाय ग्रन्थ प्रकाशित करून श्रीसमर्थावताराची वाट पहात बसावें, असें मनांत आणून आज संप्रदायाच्या प्रकाशनास आरंभ करण्याचें योजिलें आहे.

( २ ) श्रीसमर्थसंप्रदाय म्हणजे काय, त्याचीं अंगें, उपांगें कोणतीं, त्यांत प्रवेश होण्याला कांहीं पूर्व तयारी करावी लागते काय, लागत असल्यास कोणती, श्रीसमर्थकालीं संप्रदायाचें स्वरूप कसें होतें आणि आज कसें झालें आहे, आपल्या मूळ स्वरूपापासून तो ढळला असल्यास, तसें कां झालें, त्या मूळ स्वरूपांत तो पुनरपि केव्हां तरी विलसूं लागेल किंवा नाहीं, त्यासाठीं आपण सर्वांनीं काय करावें, तात्पर्य या संप्रदायाचें भवितव्य काय आहे, इत्यादि प्रश्नांचा विचार निर्मल मनानें केला जावा असा हेतु आहे.

( ३ ) हल्लींच्या काळीं एकादी संस्था स्थापन करतांना आपण जसे तिचे हेतु, तिचें धोरण, तिचे नियम, तिची कार्य करण्याची पद्धति वगैरे घटना तयार करतों, तसें कांहीं श्रीसमर्थांनीं केलें होतें असें वाटत नाहीं. जगाला बोध करावयाचा, ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाचा मार्ग दाखवावयाचा, आर्ते भेटों येती त्यांना रामोपासनेचें वेड लावून कार्यप्रवण करावयाचें, असा त्यांच्या मनांतला हेतु खरा, पण त्या हेतूच्या सिद्धीसाठीं नियमबद्ध अशी कांहीं एकादी रचना त्यांनीं केल्याचें दिसत नाहीं. त्यांनीं कांहीं संप्रदाय स्थापन केला नाहीं, त्यांचा संप्रदाय स्थापन झाला. एवढें प्रचंड त्यांचें वाङ्मय, पण त्यांत संप्रदाय शब्द क्वचित् च आला असेल. श्रीमत् दासबोधांत, करुणाष्टकांत, मनाच्या श्लोकांत, तो कोठें आढळत नाहीं. ७१ व्या स्फुट ओवीप्रकरणांत, मत्सराच्या योगानें सर्वत्र भांडणें लागलेलीं असतात, असें सांगतांना भिन्न उपासनेचे आणि भिन्न संप्रदायाचे लोक एकमेकांची निंदा करीत असतात असें म्हटलें आहे. त्यांत स्वतःच्या अशा संप्रदायाचा उल्लेख नाहीं. तसें च पदपदांतरांतील एका पदांत, आपणांस श्रीरामाच्या चरणसेवेपुढें कशाची जरूरी नाहीं, असें सांगतांना, उलट आपणांस संप्रदाय नको, समुदाय नको, प्रतिष्ठा नको, गौरव नको, कांही हि नको, असें म्हटलें आहे. एकवीससमासीपैकीं नवव्या समासाच्या ५४ व्या ओवींत, ब्रह्मज्ञानाच्या दृष्टीनें तुला, मला आणि संप्रदायाला निरनिराळें अस्तित्व नाहीं, असें शिष्याला समजावून देत आहेत. किंचित् भास होतो कीं, त्यांच्या हयातींत च त्यांच्या संघटनेला संप्रदाय म्हणून संबोधिलें जाऊं लागलें असावें, पण हें निश्चित कीं, त्यांनीं स्वतः कोठें हि हा आपला संप्रदाय व हीं त्याचीं लक्षणें, असें म्हटलें नाहीं.

( ४ ) यावर कोणी हि प्रश्न विचारूं शकेल कीं, मग तुम्ही कशाच्या बळावर श्रीसमर्थसंप्रदायाचीं लक्षणें सांगणार आणि त्यांची चर्चा करणार ? तुमच्या बोलण्याला आधार कोणाचा ? माझा आधार जन्माचा ठरलेला आहे. श्रीसमर्थकृपा हा आपला मुख्य आधार ! त्यांची कृपादृष्टि सतत आपल्यावर आहे, असें मी मानतों, मग ती आपल्या कळण्यांत येवो, वा न येवो !

**तूं हृदयस्थ माझा होसी । हें मज जाणवलें निश्चयेसीं ।**
**म्हणौनिया ग्रन्थलेखनासी । मन प्रवृत्त होये ॥**

कोणी हि असें समजूं नये कीं, गुरुकृपेचा साक्षात्कार होईल तर च त्यांची आपल्यावर कृपा असते, एरव्हीं नाहीं. कळो न कळो, प्रत्यय येवो न येवो, ज्याला साक्षात्कार म्हणून लोक समजतात तो होवो न होवो, आपण सतत त्यांच्या कृपादृष्टीखालीं वावरत आहोंत, असें मानावें. माझा असा विश्वास आहे, तसा च तो सर्वांचा असावा असें मी इच्छितों. त्यांची आपल्यावर कृपा आहे, या नुसत्या कल्पनेचा मला केवढा आधार वाटतो. त्यांच्या कृपेवांचून एक शब्द हि लिहितां किंवा बोलतां येणार नाहीं. ती त्यांची कृपा मी क्षणोक्षणीं भाकीत राहणार. केव्हां हि सुचेनासें झालें, कांहीं अडलें, उलगडा होईनासा झाला, मति कुंठित झाली, म्हणजे त्यांना शरण जाणार आणि विचारणार. हा माझा नेहमींचा पहिला आधार ठरलेला आहे. तो तुम्हांस ठाऊक झालेला आहे.

यानंतरचे माझे आधार दोन : त्यांचें चरित्र आणि त्यांचें वाङ्मय. तें हि नवीन नाहींत. श्रीसमर्थ जसे वागले तसे त्यांचे नियम बनले. त्यांनीं आपल्या चरित्राचा पाया, सावध होऊन, मायापाश झुगारून देऊन, जिवलगांचा संग सोडून, वैराग्यानें घातला, तें वैराग्य त्यांच्या संप्रदायाचें एक मूलभूत तत्त्व बनलें. पुरश्चरण, तीर्थाटण, रामकृपा, मठस्थापना, शिष्यजनसंरक्षण, जनसेवा, परोपकार, वर्णाश्रमधर्मरक्षण आणि त्यासाठीं राजकारण, या ज्या त्यांच्या चरित्रांतील ठळक गोष्टी, तीं च त्यांच्या संप्रदायाचीं अंगें ठरलीं. त्यांनीं प्रत्यक्ष तसें म्हटलें हि असेल, पण नसेल म्हटलें तर आपण आज त्यांच्या वतीनें म्हणूं शकूं. श्रीसमर्थ म्हणाले असतील, " मी हा साक्षात् तुमच्यापुढें उभा आहे, हाच माझा संप्रदाय. मजकडे येणारानें, संसार जरी नाहीं, तरी संसारावरील आसक्ति सोडली पाहिजे, शुद्ध उपासना केली पाहिजे, ज्ञान समजावून घेतलें पाहिजे, आचारविचार पाळले पाहिजेत आणि ज्यांनीं माझ्या एकट्याचा च नव्हे, तर माझ्या सर्व वर्तमान आणि भावी भक्तांचा सांभाळ करण्याचा भार आपल्या शिरावर घेतला आहे, त्यांची अनन्यभावानें सेवा केली पाहिजे. हें ज्यांना मान्य नसेल त्यांनीं मजपासून दूर सरावें. "

पळा पळा ब्रह्मपिसा येतो जवळी ।
रामनामें हांक देउनि डोई कांडोळी ॥ ध्रु० ॥

या पदाचा दुसरा काय अर्थ होईल ?

तात्पर्य, त्यांचें चरित्र हा एक आपला आधार आणि त्यांचें च वाङ्मय हा दुसरा आधार होय. श्रीसमर्थहृदयाला हि समर्थांचें वाङ्मय हा आधार होता च. फक्त हृदयांत वाङ्मयाचा प्रकरणशः विचार आला, आणि संप्रदाय सांगतांना त्या च वाङ्मयाकडे आपण साकल्यानें पाहणार. एकादा भूप्रदेश जमिनीवरून हिंडून पहावा तसें हृदयांत वाङ्मयाकडे पाहिलें, आणि तो च भूप्रदेश दोन हजार फूट उंच वर आकाशांत विमानानें जाऊन पहावा, तसें आतां या ग्रंथासाठीं त्या च वाङ्मयाकडे विहंगमदृष्टीनें पाहणार आहें. श्रीसमर्थांचें चरित्र आणि त्यांचें वाङ्मय हीं दोन्ही हि अपूर्व होत. या वाङ्मयांत अशी एक हि गोष्ट त्यांनीं दुसऱ्यास करावयास सांगितलेली आढळावयाची नाहीं कीं, जी त्यांनीं स्वतः आचरिली नाहीं. शिष्यांचा अधिकार पाहून व त्यांना झेपणार नाहीं असें जाणून त्यांना त्यांनीं सवलती दिलेल्या असतील, पण त्यांचें स्वतःचें आचरण मात्र आपल्या शिकवणीबरहुकुम झालेलें असावयाचें. जगांत असें दुसरें उदाहरण कदाचित् आढळावयाचें नाहीं, असें वाटतें, कीं ज्यानें स्वतः आचरिलें नाहीं, तें दुसऱ्यास हि करावयास सांगितलें नाहीं. दाखवा दुसरें उदाहरण कीं, ज्या महापुरुषानें २६३५० एवढी प्रचंड उपदेशपर ग्रंथसंख्या लिहून तींत एक हि गोष्ट अशी प्रतिपादिली नाहीं कीं, जी त्यांनीं स्वतः आचरिली नाहीं. धन्य महाराष्ट्राची आणि धन्यतर आमच्या मराठी सारस्वताची कीं, असें दुसरें उदाहरण येथें, तथें अथवा कोठें हि दाखवितां येत नाहीं. आणि म्हणून श्रीसमर्थांचें चरित्र आणि त्यांचें वाङ्मय पाहून त्यांच्या संप्रदायाचें स्वरूप निश्चित ठरविण्यांत मला यत्किंचित् हि धोका वाटत नाहीं. त्यांचें चरित्र आणि त्यांचें वाङ्मय यांच्यांत इतकी एकवाक्यता आहे कीं, त्यांच्या वाङ्मयाचा अर्थ त्यांचें चरित्र पाहून लावावा व चरित्रांतील अज्ञात प्रसंग त्यांच्या वाङ्मयावरून ठरवावे. हा महापुरुष जसें बोलला तसें वागला आणि जसें वागला तसें बोलला. त्यामुळें त्यांचें वाङ्मय हें च त्यांचें चरित्र आणि त्यांचें चरित्र तो च त्यांचा संप्रदाय.

श्रीसमर्थसंप्रदाय जाणण्यासाठीं श्रीमत् ग्रंथराज दासबोधाच्या बाहेर संचार करण्याची आवश्यकता नाहीं. संप्रदायाचीं सारीं लक्षणें ग्रंथराजांत आलीं

आहेत. त्यांच्या इतर वाङ्मयांत हि तीं च लक्षणें विखुरलेलीं आढळतात. कोणास माझें बोलणें अतिशयोक्तीचें वाटेल, पण मी तर निःशंकपणें असें हि म्हणूं इच्छितों कीं, अवघ्या २०५ मनाच्या श्लोकांत श्रीसमर्थांचें चरित्र हि आलें आणि त्यांचा संप्रदाय हि आला. हें माझें बोलणें मी सिद्ध करूं शकेन, पण वाचकांस च नम्र विनंति करितों कीं, केवळ माझ्या म्हणण्यावर विसंबून न रहातां, स्वतः च त्यांनीं ते २०५ श्लोक वाचून अनुभव घ्यावा; असो. मला येथें तूर्त इतकें च म्हणावयाचें आहे कीं, श्रीसमर्थांचें चरित्र आणि त्यांचें संपूर्ण वाङ्मय हे माझे मोठे आधार होत. पुढें एका प्रकरणांत त्यांच्या शिष्यप्रशिष्यांच्या वाङ्मयांत मी प्रत्यंतराचा शोध घेणार आहें, पण तो केवळ अशासाठीं कीं, श्रीसमर्थांचें चरित्र आणि वाङ्मय यांचा मी जो अर्थ करीत आहें तो बरोबर असल्याचा प्रत्यय येऊन माझें समाधान व्हावें.

या एकंदर वाङ्मयाच्या परिशीलनानें माझ्या मनावर जे संस्कार झाले आहेत, तो हि एक आधार च होय. ते संस्कार या ग्रंथांत उमटणार च. अशा वेळीं कदाचित् एखाद्या विधानाला किंवा विचाराला मला प्रत्यक्ष आधार सांगतां न आला तर वाचकांनीं क्षमा केली पाहिजे. माझें मन हा च अशा वेळीं माझा आधार मानावा लागेल. तथापि कांहीं तरी आधारावांचून न बोलण्याचा मी निश्चय करीत आहें.

ग्रन्थाचा शेवट करण्यापूर्वीं एक दोन प्रकरणांत संप्रदायाचें आजचें स्वरूप कसें आहे व त्याचें भवितव्य काय, याचा मी थोडक्यांत विचार करणार आहें, त्याला माझ्या अवलोकनाचा हि आधार घेणार आहें. गेल्या चाळीस पंचेचाळीस वर्षांत संशोधनार्थ श्रीसमर्थांचे मठ धुंडाळतांना, तसें च जांबेचें श्रीसमर्थमंदिर व धुळ्याचें श्रीसमर्थवाग्देवतामंदिर यांच्यासाठीं केल्या-पासून कलकत्त्यापर्यंत व काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्व देशभर विखुरलेल्या महाराष्ट्रीयांच्या आणि क्वचित् इतरांच्या भेटी घेत असतांना ज्या बऱ्या वाईट गोष्टी माझ्या नजरेस पडल्या व त्यायोगें माझ्या मनावर जे परिणाम घडले त्यांचें प्रतिबिंब त्या दोन प्रकरणांत उमटणें साहजिक आहे. त्यांत कोणाची निंदा आहे, असें समजूं नये. त्यांत दोषाविष्करण असेल, पण दोष कळल्यावांचून ते टाळतां तरी कसे यावे आणि सद्गुणांचा विकास कसा व्हावा ? तथापि कोणी ती निंदा समजतील, तर ती कोणा

तिऱ्हाइताची नसून माझी च मी निंदा करीत आहें, असें मानावें. पण ती निंदा नव्हे च मुळीं. ती एका आतुर जीवाची नुसती तळमळ होय, संप्रदायाचा उत्कर्ष व्हावा, देशाला बरे दिवस यावेत, सर्वांचें सारखें गोमटें व्हावें म्हणून एका दुर्बळ पण उतावीळ जीवानें प्रकट केलेली केवळ उत्कट भावना होय.

( ५ ) मी माझे आधार उधार ठेवीत नसतों. जेथल्या तेथें देत असतों. त्यामुळें माझ्या बोलण्यांत आणि लिहिण्यांत उतारे च फार असतात. वाचकांस आधार अन्यत्र पहावयास सांगण्यापेक्षां जेथल्या तेथें प्रत्यक्ष दाखविणें जास्त बरें, असें मला वाटत असतें. शिवाय एकादा सिद्धांत मी माझ्या ओबडधोबड भाषेंत सांगणें आणि प्रत्ययज्ञानी पुरुषाच्या तोंडून तो जसा आला असेल तसा सादर करणें, यांत महदंतर असणार. उताऱ्यांतील गोडी, भाव, सामर्थ्य, भेदकता माझ्या शब्दांत शतांशानें हि उतरण्याचा मला संभव वाटत नाहीं. श्रीसमर्थांच्या आणि त्यांच्या शिष्यप्रशिष्यांच्या मुखानें बोलणें शक्य आणि सुलभ असतां मी माझ्या भाषेंत कां बोलूं ? विचार त्यांचे, ते मी माझ्या भाषेंत कां सांगावे ? त्यांच्या विचारांचे दुवे जुळविण्यापुरता, फार तर, मी माझ्या भाषेचा उपयोग करीन. सांप्रदायिक लक्षणांची आपणांस जी माला गुंफावयाची आहे, त्या मालेसाठीं उपयोगांत आणलेलीं सर्व फुलें त्यांचीं, मधलें सूत तेवढें माझें. श्रीसमर्थहृदयाला आधार फक्त श्रीसमर्थांच्या च ग्रंथांचा होता. त्यांच्या जोडीला, या ग्रंथासाठीं त्यांच्या शिष्यप्रशिष्यांचे ग्रंथ प्रत्यंतरासाठीं घेणार आहें. तेव्हां न जाणों, श्रीसमर्थहृदयापेक्षां हि या ग्रंथांत उतारे जास्त च येतील असें वाटतें.

( ६ ) पूर्वाच्या दोन खंडांत आलेल्या कांहीं थोड्या तरी उताऱ्यांची या खंडांत पुनरुद्धृति होण्याचा फार संभव आहे. असें होणें अपरिहार्य आहे. अवताराला, हृदयाला, आणि संप्रदायाला, आधारास जर ते च ते ग्रंथ घेण्यांत आले आहेत, तर पुनरुद्धृति टाळणें शक्य नव्हे. एक च उतारा असला तरी त्याकडे मी तीन दृष्टींनीं पहातों. त्यांत त्यांचें प्रत्यक्ष चरित्र काय आहे, त्यांच्या हृदयाचें प्रतिबिंब कसें उमटलें आहे आणि सांप्रदायिक शिकवण कोणती आहे, या तिन्ही दृष्टींनीं त्या त्या वचनाकडे माझें लक्ष वेधलें जातें. त्यामुळें हें अगदीं सहज आहे कीं, तिन्हीं खंडांत तीं च तीं

वचनें थोडी फार तरी येतील च. पण अशी होणारी पुनरुक्ति वाचकांनीं क्षम्य मानली पाहिजे, कारण प्रत्येक ठिकाणीं त्या वचनाकडे पहाण्याची आपली दृष्टि भिन्न असते. अशा वचनांचीं अनेक उदाहरणें देतां येतील, पण माझें म्हणणें विशद करण्यासाठीं फक्त एक च उदाहरण देऊं या. गिरिधरांच्या हातच्या पदपदांतरांत श्रीसमर्थकृत पुढील १४२ वें पद आहे:

## रे रामा

संसारसासुरां तुवां बोळविलें ।
येथें बहुत दिवस कां टाकिलें रे रामा ॥

रात्रिदिवस तुझी वाट पाहे ।
मज अत्यंत संसारें गांजिलें रे रामा ॥ १ ॥

अंतर जाणोनि यावें झडकरि ।
तुझ्या वियोगें न कंठे क्षणभरी रे रामा ॥
तुजवांचुनि अंतीं कोण आहे ।
ऐसी अवस्था लागली अभ्यंतरीं रे रामा ॥ ध्रु० ॥

या लोकिकापासुनि मज सोडवावें ।
जरि तूं न येसि तरि म्यां काय करावें रे रामा ॥
नाहीं कोण्ही च माझे जिवलग ।
येथें कोणाच्या आधारें कंठावें रे रामा ॥ २ ॥

सुलभ जाणुनि धांव घातली रे ।
या लोकिकाची लाज म्यां टाकिली रे रामा ॥
आलों टाकुनि सर्व अभिमान ।
तुझ्या पाईं माझी वृत्ति गुंतली रे रामा ॥ ३ ॥

येकला येकट जालों रानभरी ।
तुजकारणें उदास सर्वांपरी रे रामा ॥
चित्त चंचळ जालें राहवेना ।
भांबावलों हिंडतों वनांतरीं रे रामा ॥ ४ ॥

रामी रामदास तेणें आस केली ।
ते तों आपण होउनि पुरविली रे रामा ॥

दुःख संसारींचें फार जालें ।
येथें आम्हां संकटीं धांव घालीं रे रामा ॥ ५ ॥

या पदांत श्रीसमर्थचरित्र आहे, त्याचप्रमाणें त्यांच्या हृदयाचें आविष्करण आहे आणि सांप्रदायिकांना धडा हि आहे, हें कोण नाकारील? चरित्र लिहितांना, त्यांच्या हृदयांत प्रवेश करतांना, किंवा संप्रदायाचीं लक्षणें ठरवितांना या पदाची आठवण झाल्यावांचून कशी राहावी? पदांतील तिसऱ्या आणि चवथ्या कडव्यांत त्यांचें आत्मचरित्र च आहे, हें कोणास दिसणार नाहीं? त्यांचें चरित्र लिहितांना या कडव्यांचा आधार घेतल्यावांचून कोण राहील? ध्रुवपदांतील च 'अंतर' म्हणजे हृदय आणि 'अभ्यंतरीं' म्हणजे हृदयांत, हें कोणाच्या लक्षांत येणार नाहीं? रामाची भेट व्हावी अशी इच्छा असेल तर संसाराची आसक्ति सुटली पाहिजे असा बोध आपल्या शिष्यांना पर्यायानें करण्याचा या एकंदर पदांतील श्रीसमर्थांचा गर्भित हेतु कोणाच्या नजरेंतून निसटूं शकेल?

तथापि, वाचकांस वचन देतों कीं, पुनरुक्ति न होईल याविषयीं मी सावधानता बाळगीन. इतक्या उपर झाली च तर ती वरील कारणामुळें होईल, त्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

( ७ ) भरतखंडांत अनेक साधुसंत होऊन गेले. त्यांपैकीं कित्येकांची ग्रंथरचना आहे. त्या ग्रंथांचा उपयोग जगानें करून घेतला, पण त्या सत्पुरुषांना त्याची जरुरी नव्हती. कांहीं थोड्यांना जगाची काळजी वाटून त्यांनीं त्यांच्यांत आपल्या तत्त्वज्ञानाचा हेतुपुरस्सर प्रचार केला. अशा थोड्यांपैकीं आपल्या महाराष्ट्रांत एकटे श्रीसमर्थ च संप्रदायप्रवर्तक होऊन गेले. त्यांची ग्रंथरचना हेतुपुरस्सर होती. त्यांना जगाच्या च काय पण विश्वाच्या कल्याणाची चिंता लागली होती. त्यांच्या शिकवणीला ऐहिक आणि पारलौकिक अशीं दोन्हीं अंगें होतीं. मला वाटतें, असे च तेवढे पुरुष संप्रदायप्रवर्तक होत असावेत.

( ८ ) असा हा जागतिक कल्याण साधून देणारा संप्रदाय आहे. त्याच्या लक्षणांच्या आणि इतर आनुषंगिक प्रश्नांच्या सविस्तर प्रतिपादनास आरंभ करण्यापूर्वीं, ग्रन्थ वाचण्याची सर्वांना बुद्धि व्हावी म्हणून या

ग्रन्थाच्या श्रवणाची फलश्रुति ग्रन्थारंभीं च सांगणें बरें. ती यथार्थ आहे कां व्यर्थ आहे, हें वाचकांनीं प्रत्यय घेऊन ठरवावें.

या ग्रन्थाच्या श्रवणमनानें

( १ ) झालें तें होऊन गेलें, आतां तरी आपणाला शहाणे करावें, अशी बुद्धि उत्पन्न होईल, ( २ ) संप्रदायाचें वास्तविक स्वरूप लक्षांत येऊन श्रीसमर्थांना सद्गुरु मानून संप्रदायांत प्रवेश करण्याची इच्छा होईल, ( ३ ) अनासक्त राहून प्रपंच कसा करावा याचा धडा मिळेल, ( ४ ) वर्णाश्रमधर्मांचें पालन करणें आपलें कर्तव्य होय, हा बोध होईल, ( ५ ) राम कैवारी करावा, असा ध्यास लागेल, ( ६ ) साऱ्या विश्वांत नारायण भरलेला आहे, असा प्रत्यय येऊन द्वेष, द्रोह, मत्सर, तिरस्कार, स्वार्थ, आक्रमण इत्यादि विकारांची बाधा होणार नाहीं, ( ७ ) 'आपण कोण' याचा उमज पडून 'अहं ब्रह्मास्मि' चा साक्षात्कार होईल, ( ८ ) जागतिक सुखशांतीचा स्थिर आणि शुद्ध मार्ग दिसूं लागेल, ( ९ ) संघटना करून त्या शुद्ध मार्गाचें ज्ञान जगास करून द्यावें, असें वाटूं लागेल, (१०) जिकडे तिकडे महाराष्ट्रधर्माचा प्रसार करावा, या आपल्या आज्ञेचें पालन झालेलें पाहून श्रीसमर्थांना संतोष होऊन त्यांचा महाराष्ट्रास आशीर्वाद मिळेल, (११) आपण सारे जण तर त्यांचे च म्हणवितों, तेव्हां त्यांचे विचार आपण विश्वासानें मानूं, यांत नवल नाहीं, पण जगांतील सर्व विचारवंतांना, तत्त्वज्ञान्यांना, राष्ट्रभक्तांना, राजकारणी पुरुषांना, सर्वांना च त्यांची विचारप्रणाली पटावी इतकी ती शुद्ध, निर्मल, सत्याधिष्ठित, अविवाद्य आहे, अशी खात्री होऊन, 'श्रीसमर्थ खरे जगद्गुरु होत' असे उद्गार प्रत्येक वाचकाच्या तोंडून आपोआप निघतील.

**इति श्रीसमर्थसंप्रदाय । जगदुद्धारार्थ प्रकट होय ।**
**त्याविण नसे अन्य उपाय । हा निश्चयो मानावा ॥**

# योजना

विषयानुरोधानें या ग्रन्थाचे स्वाभाविक तीन भाग पडतात.

श्रीसमर्थांच्या चरणांचा आश्रय मिळण्याला कांहीं तरी पूर्व तयारी करावी च लागत असेल. त्या पूर्व तयारींत ज्या गोष्टी येत असतील, तो पहिला भाग.

दुसऱ्या भागांत श्रीसमर्थवचनाधारें संप्रदायाच्या लक्षणांचा व शिष्यप्रशिष्यांच्या ग्रन्थांत त्या लक्षणांना मिळणाऱ्या प्रत्यंतराचा समावेश करूं, आणि शेवटच्या

तिसऱ्या भागांत, संप्रदायाचें स्वरूप तेव्हां कसें होतें, आतां कसें आहे व पुढें कसें व्हावें, याचें विवेचन करून ग्रन्थाचा शेवट करूं.

[ १ ]

# पूर्व तयारी

( १ ) आरंभींच्या चार गोष्टी

( २ ) मरणाचें स्मरण

( ३ ) संसाराची असारता

( ४ ) अनुताप—उपरति

( ५ ) शुद्ध कर्माचरण

( ६ ) श्रीसमर्थांना शरण

# ( १ ) आरंभींच्या चार गोष्टी

[ मरणाचें स्मरण—संसाराची असारता—अनुताप—कर्माचरण ]

**आधीं मरणाचें स्मरण व्हावें । मग संसारास समूळ विटावें ।**
**अनुतापदग्ध होऊन लागावें । कर्माचरणाला ॥**

प्रत्येक गोष्ट मी श्रीसमर्थांच्या मुखाकडे पाहून बोलणार. त्यांचें मुख म्हणजे त्यांचे ग्रन्थ. श्रीमत् दासबोधाकडे तर आपलें लक्ष प्रथम जाणार. दासबोध पहा, स्फुट काव्यें पहा, कोणतें हि स्वतंत्र पूर्ण प्रकरण पहा, फार काय, मनाचे अवघे २०५ श्लोक विचारांत घ्या, एक निर्विवाद गोष्ट आपल्या लक्ष्यांत येईल ती अशी कीं, श्रीसमर्थांच्या जवळ जाण्याला चार गोष्टींची आधीं तयारी असावी लागते. ( १ ) मरणाचें स्मरण आणि ( २ ) संसाराची असारता, या दोन मुख्य गोष्टी आणि त्यांच्या अनुरोधानें उत्पन्न होणारा ( ३ ) अनुताप व कांहीं तरी साधन म्हणून ( ४ ) कर्माचरण, अशा दोन आनुषंगिक गोष्टी. या चार गोष्टींची तयारी असल्यावांचून साधकाचें लक्ष श्रीसमर्थसंप्रदायाकडे लागणार नाहीं व श्रीसमर्थ हि अशाला जवळ करणार नाहींत.

प्रत्येकानें आपल्या मनाशीं असा विचार करावा कीं, मला एक दिवस घरदार, शेतीवाडी, बायकामुलें, स्नेहीसोबती, उद्योगधंदा, जन्मभर केलेला सर्व व्याप, प्रपंचाचा सारा पसारा येथल्या येथें सोडून जावयाचें आहे आणि, ज्या संसारांत मी इतका गुंतून पडलों आहें, तो तरी कोठें धड आहे, तो हि असार, क्षणभंगुर आहे. या दोन अपरिहार्य गोष्टी मनावर पूर्ण बिंबल्या तर आपोआप च, तिसरी गोष्ट—अनुतापयुक्त वैराग्य—प्रादुर्भूत होऊन चवथी गोष्ट—कर्माचरण—करण्याकडे मन लागेल. या चार गोष्टी साध्य झाल्याशिवाय शाश्वताचा शोध घेण्याची बुद्धि होणार च नाहीं.

हें मी म्हणत नाहीं, तो श्रीसमर्थांचा सिद्धांत आहे. या चार गोष्टी शिष्याच्या मनावर आधीं ठसविण्याचें श्रीसमर्थांचें धोरण त्यांच्या वाङ्मयांत सर्वत्र दिसून येतें.

(रा) नाहींपेक्षां मनाच्या श्लोकांत सुद्धां ज्ञानाचा उपदेश करण्यापूर्वी

जिवा कर्मयोगें जनीं जन्म जाला।
परी सेवटीं काळमूखीं निमाला।
महां थोर ते मृत्यपंथें चि गेले।
कितीयेक ते जन्मले आणि मेले॥ १४॥

मना पाहतां सत्य हे मृत्यभूमी।
जिता बोलती सर्वही जीव मी मी।
चिरंजीव हे सर्वही मानिताती।
अकस्मात सांडूनियां सर्व जाती॥ १५॥

मरे येक त्याचा दुजा शोक वाहे।
अकस्मात तोही पुढें जात आहे॥ १६॥

याप्रमाणें मरणाचें स्मरण करून देण्याचें, किंवा संसाराला विषाची उपमा देऊन

नव्हे सार संसार हा घोर आहे।
मना सज्जना सत्य शोधूनि पाहें॥ ६६॥

याप्रमाणें संसाराची असारता शोधून पाहण्यास सांगण्याचें, किंवा

नसे राम तें धाम सोडून द्यावें।
सुखालागि आरण्य सेवीत जावें॥ ४४॥

याप्रमाणें वनवासाच्या आणि वैराग्याच्या गोष्टी बोलण्याचें, किंवा

सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा।
सदा रामनामें वदे नित्य वाचा।
स्वधर्में चि चाले सदा उत्तमाचा।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ४८॥

विवेकें क्रिया आपुली पालटावी।
अती आदरें शुद्ध क्रीया धरावी॥ १०५॥

बरी स्नानसंध्या करी येकनिष्ठा।
विवेकें मना आवरीं स्थानभ्रष्टा॥ १०६॥

याप्रमाणें अनेक श्लोकांत शुद्ध कर्माचरणाकडे शिष्यांचीं मनें वळवून घेण्याचें श्रीसमर्थांना दुसरें काय प्रयोजन होतें ?

(म) संप्रदायांत प्रवेश मिळण्यापूर्वी या चार गोष्टी साध्य झाल्या पाहिजेत, हें श्रोत्यांच्या मनावर बिंबविण्याचें श्रीसमर्थांचें धोरण ग्रन्थराजांत तर विशेष च स्पष्टपणें दिसून येत आहे. नवविधा भक्तीपासून चवथ्या दशकाला आरंभ करण्यापूर्वी दुसऱ्या दशकाच्या शेवटीं, संसारांत सुख मानणारा मूर्खांतला परम मूर्ख होय, अशी प्रस्तावना करून तिसऱ्या दशकाच्या पहिल्या पांच समासांत एका बद्धाला पुढें करून त्याच्या संसाराचे धिंडवडे वर्णन करून दाखविण्यांत श्रीसमर्थांचा दुसरा कोणता हेतु असणार ? वाचून पहा ते पांच समास. त्या बिचाऱ्याच्या संसाराची कोण धूळधाण झाली ! तसलें तें संसाराचें तापदायक चित्र रेखाटण्यांत, संसाराची असारता पटून श्रोत्यांचें लक्ष परमार्थाकडे लागावें, हा च समर्थांचा हेतु असला पाहिजे, हें उघड आहे.

तिसऱ्याच्या नवव्याचा

संसार म्हणिजे सवें च स्वार।
नाहीं मरणास उधार।
मापीं लागलें शरीर। घडीनें घडी॥ १॥

असा आरंभ करून ५८ ओव्यांत, मृत्यु अपरिहार्य आहे, तो कोणाला टाळतां येत नाहीं, जन्मा आले तितुके गेले, राजे गेले रंक गेले, पंडित गेले अपंडित गेले, सर्व गेले, पण

असो ऐसे सकळ हि गेले। परंतु येक चि राहिले।
जे स्वरूपाकार जाले। आत्मज्ञानी॥ ५९॥

असा शेवट करून दाखविण्यांत त्यांना दुसरें काय सिद्ध करावयाचें होतें ? आणि त्या च प्रमाणें पुढच्या च दहाव्या समासाचा

संसार म्हणिजे माहापूर। माजी जळचरें अपार।
डंखूं धावती विखार। काळसर्प॥ १॥
आशा ममता देहीं बेडी। सुसरी करिताती तडातोडी।
नेऊन दुःखाचे सांकडी-। माजी घालिती॥ २

**अहंकारनक्रें उडविलें। नेऊन पाताळीं बुडविलें।**
**तेथुनियां सोडविलें। नवचे प्राणी ॥ ३**
**काममगरमिठी सुटेना। तिरस्कार लागला तुटेना।**
**मद मत्सर वोहटेना। भूलि पडिली ॥ ४**
**वासनाधामिणी पडिली गळां। घालून वेटाळें वमी गरळा।**
**जिव्हा लाळी वेळोवेळां। भयानक ॥ ५**

असा आरंभ करून संसाराचें भयानक स्वरूप वर्णन करून सांगण्यांत व अशा या संसारांत कोणी कोणाचा नसतो, दैवयोगानें चार माणसें एका घरांत जन्मास आलीं किंवा एकत्र नांदलीं म्हणून तीं आपलीं मानणें हा मूर्खपणा होय, असें बजावण्यांत त्यांचा दुसरा कोणता मतलब असणार? मतलब एक च, संसार हा असा दुःखदायक आहे, तो असार आहे, वैराग्यांत च सार्थकता आहे, हें पटून शिष्याला उपरति वाटून कांहीं तरी साधनें करून भगवंताला वश करून घेतलें पाहिजे, अशी त्यास बुद्धि व्हावी. पण आपण अनुमानानें बोलण्याचें कारण च नाहीं. या समासाचा हा च भावार्थ असल्याचें स्वतः श्रीसमर्थांनीं सांगितलेलें आहे. हा दहावा समास म्हणजे मूळचा, एकवीससमासींतील सहावा समास होय. एकवीस-समासीच्या एकविसाव्या समासांत मागील १ ते २० समासांपैकीं प्रत्येक समासांत कोणता विषय आला आहे, तें सांगितलें आहे. त्यांत या समासाविषयीं श्रीसमर्थ म्हणतातः

**प्रतिष्ठूनि वैराग्य सार। नश्वर आहे हा संसार।**
**सहावे समासीं विचार। ऐसा असे ॥ ए. २१-५**

या तिसऱ्या दशकाचा नववा समास आणि दहावा समास, या दोन समासांचें मला अति महत्त्व वाटतें. मी तर असें मानतों कीं, या दोन समासांवर श्रीसंप्रदायाची उभारणी झाली आहे. हे दोन समास म्हणजे संप्रदायाचा पाया होत. खरें म्हणजे इतकें ज्या समासांचें महत्त्व, ते दोन्ही समास मी येथें उद्धृत करावयास च पाहिजे होते, पण वाचक मला अगदीं च वेड्यांत काढतील, म्हणून भितों. तरी वाचकांस एवढी च विनंति करतों कीं, हा ग्रन्थ कृपा करून थोडा वेळ खालीं ठेवा, श्रीमत् दासबोध हातीं घेऊन ते दोन समास आधीं वाचून

पहा व मग पुन्हा या ग्रन्थाकडे वळा. त्या दोन समासांचें इतकें महत्त्व मी आज च मानावयास लागलों, असें नव्हे. शके १८२७ त प्रकाशित झालेल्या दासबोधाच्या प्रस्तावनेंत या च दोन समासांविषयीं मीं म्हटलें आहे कीं, या दोन "समासांत फार सामर्थ्य आहे.....बद्धाच्या ठिकाणीं मुमुक्षुत्व उत्पन्न करण्याचें वर्म या दोन समासांत आहे. आपला कळवळा येऊन श्रीसमर्थांनीं हे दोन समास लिहिले आहेत." या दोन समासांच्या जोडीला आज दुसऱ्या दशकाचा चवथा समास हि कृपा करून वाचा म्हणजे श्रीसमर्थांच्या चरणांपाशीं जाऊन बसण्याची आपली पूर्व तयारी पूर्ण झाली असें होईल. तो समास वाचल्यानें एकदम डोळे उघडतील, जन्म वाया चालला अशी उपरति होईल, मनाची मुक्त क्रिया सुटेल आणि कांहीं तरी विधियुक्त ब्रह्मकर्म करून काळ सार्थकीं लावावा, असें वाटूं लागेल.

सध्यां आपणांस येथें इतकें च पहावयाचें आहे कीं, श्रीमत् ग्रन्थराज दासबोधावरून हि असें मानतां येतें कीं, संप्रदायाकडे दृष्टि वळण्यापूर्वी मरणाचें स्मरण असणें, संसाराची असारता पटणें, अनुताप वाटणें, शुद्ध क्रिया करावी अशी बुद्धि होणें, या चार गोष्टी, श्रीसमर्थांच्या शिकवणी-प्रमाणें, पूर्व तयारींत मोडतात.

(दा) श्रीसमर्थांचें हें च धोरण त्यांच्या इतर हि लघु काव्यांत आणि स्फुट प्रकरणांत आपणांस अनेक ठिकाणीं पहावयास सांपडतें. एक दोन विशेष ठळक उदाहरणें देतों. 'अंतर्भाव' हें एक लहानसें लघु काव्य अवघ्या १२० ओव्यांचें आहे. तेवढ्यांत त्याचे सहा समास आहेत. त्याचा हि आरंभ, शिष्याला संसाराचा वीट आल्यापासून करून, मध्यंतरीं साधनें सांगून, शेवट ज्ञानप्राप्तींत केला आहे.

**स्वामी प्रपंचाचेनि गुणें। परमार्थासी आलें उणें।**
**ईश्वरआज्ञेप्रमाणें। क्रिया न घडे॥ १-६**

**प्रपंचें केलें कासावीस। घेऊं नेदी उमस।**
**तेणें गुणें उपजे त्रास। सर्वत्रांचा॥ ८**

**आतां असो हा संसार। जाले दुःखाचे डोंगर।**
**स्वामी अंतर्साक्ष विचार। सर्व हि जाणती॥ ९**

**तरी आतां काय जी करावें। कोण्या समाधानें असावें।**
**हें मज दातारें सांगावें। कृपा करूनी ॥ १०**

अशी शिष्याची प्रार्थना. प्रकरण लहानसें च आहे, पण अनुसरल्यास कृतार्थ करणारें आहे. पण तो प्रश्न येथें नाहीं. आपण वाचून पहाल च. आपल्या वाचण्यांत कदाचित् आधीं च आलें हि असेल. पुढें त्या शिष्याला श्रीसमर्थांनीं स्वधर्मरक्षण, अद्वैतश्रवण, नित्य नेम इत्यादि साधनें सांगून

**चत्वार देहाच्या अंतीं। उरली शुद्ध स्वरूपस्थिती।**
**तेणें गुणें तुझी प्राप्ती। तुज चि जाली ॥ ५-१३**

**जन्मला चि नाहीं अनंत। तयासी कैंचा येईल अंत।**
**आदिअंतीं निवांत। तो चि तूं आवघा ॥ १४ ॥**

येथवर नेऊन पोंचविलें आहे. या लहानशा प्रकरणांत सुद्धां संसाराची असारता प्रत्ययास आल्यावांचून शिष्याचें पाऊल पुढें पडलें नाहीं.

( स ) श्रीसमर्थांनीं ओवीशतें चौदा लिहिलीं, त्यांतलें पहिलें च शत संसाराचें आहे. उतारे न देतां, नुसती च विनंति करतों कीं, तें शत पहा आणि स्वतःची स्वतः च खात्री करून घ्या कीं, मरणाचें अखंड स्मरण असल्यावांचून, संसाराची असारता पटल्यावांचून, अनुताप उत्पन्न झाल्यावांचून आणि शुद्धकर्माचरण घडल्यावांचून श्रीसमर्थांच्या संप्रदायांत आपला प्रवेश होणें अशक्य आहे, श्रीसमर्थ आपणांस जवळ करणार नाहींत, चरणीं ठाव देणार नाहींत.

तेव्हां, आतां आपण स्वहितावर दृष्टि ठेवून या चार गोष्टींचा आधीं स्वतंत्र विचार करूं आणि मग श्रीसमर्थांना शरण जाऊं. ते अति दयाळु आहेत, त्यांना आपली दया आल्यावांचून राहणार नाहीं.

---

# ( २ ) मरणाचें स्मरण असावें

[ चार साध्यें—(१) संसाराविषयीं अनासक्ति—(२) साधनांची त्वरा—
(३) परोपकारार्थ देह झिजविणें—(४) अमर होणें ]

**आपणासि मृत्यु येणार आहे। हा उधाराचा न ठेवितां संशय।**
**वर्तमानीं च अनुभऊनि स्वयें। ज्ञानें अमर व्हावें॥** रा. सो. ८ १०/१८

हें मरणाचें स्मरण ठेवण्याचें, मेरुस्वामी अंतिम साध्य सांगत आहेत. तत्पूर्वीं तीन साध्यें साधलीं पाहिजेत, नंतर वरील चवथें शेवटचें साध्य होय.

( १ ) संसारांत आसक्त होऊन गुरफटलें जाऊं नये, म्हणून

( २ ) जन्मास येऊन जें कांहीं साधावयाचें असेल, तें साधण्याची त्वरा केली पाहिजे, म्हणून

( ३ ) या संप्रदायाचा मूळ पाया जो वीतराग, तो उत्पन्न होऊन परोपकारार्थ देह झिजविण्याची प्रवृत्ति व्हावी, म्हणून

आणि मेरुस्वामी म्हणतात त्याप्रमाणें

( ४ ) जिवंत असतां च मरणाची कल्पना करून ज्ञानानें अमर व्हावें व जन्ममरणाच्या फेऱ्यांतून कायमचें सुटावें, म्हणून

अशीं हीं चार साध्यें साधावीं म्हणून, आपणास एक दिवस मरावयाचें आहे, याचें विचारवंतानें सतत स्मरण ठेविलें पाहिजे.

( १ ) स्मरण ठेवावयाचें म्हणजे सर्व मरतात, त्याप्रमाणें मला हि मरावयाचें आहे, एवढी च कल्पना करणें नव्हे, तर त्या मरणाचा जो अर्थ कीं, माझ्यापुरतें तरी हें सर्व नश्वर आहे, तो मनावर बिंबवून घेऊन जगांत वर्तावें, म्हणजे निष्कामपणें कर्में करण्याचा धडा मिळेल व अनासक्तयोग आपोआप साधेल. मरणाचें सारखें स्मरण असलें म्हणजे काम, क्रोध, मद, मत्सर, दंभ, प्रपंच, या षड्रिपूंतून कोणता शत्रु डोकें वर काढून आपणास भुलवूं शकणार आहे? उद्यां मरावयाचें आहे, अशी

क्षणभर कल्पना करा—खरोखर मरावयाचें नाहीं, पूर्ण शंभर वर्षें जगण्याचा प्रत्येकाचा निर्धार असावा, पण असा निर्धार असून हि, एक दिवस मरावयाचें आहे, त्याचें प्रत्यहीं स्मरण ठेवून वागावयाचें आहे, म्हणून सुचवितों कीं, उद्यां मरावयाचें आहे, असें नुसतें मनांत आणा—आणि सांगा आज कसली इच्छा करणार, कोणावर रागावणार, कशाचा गर्व वाहणार ?

मरतां मद्र काशाचा । कोण पुसे तया मदा ॥ मद १४

अनंत अशा काळापुढें तुमच्या शंभर वर्षांची एका क्षणा इतकी तरी किंमत होईल काय? मरणाचें स्मरण असलें, म्हणजे वैराग्य उत्पन्न होणें सहज च आहे, आणि षड्रिपूंपैकीं दंभाचे वर्णनांत श्रीसमर्थांनीं हें स्पष्ट च सांगितलें आहे:

अखंड आठवावें रे । मरणाचें ध्यान अंतरीं ।
तेव्हां चि वैराग्य उठे । दंभ लोटे परोपरीं ॥ दंभ १२

एक दिवस हा देह अग्निसात् व्हावयाचा आहे, याची बरोबर जाणीव होईल तर पुष्कळ च दोष झडणार आहेत. सर्व कांहीं येथल्या येथें टाकून जावयाचें आहे, याचा नीट ठसा मनावर उमटला तर प्रपंचाचा हव्यास कोण करील ? कोणी करणार नाहीं, हें खरें, पण जगांत काय दिसतें ? जगांत निराळ दिसतें, पण त्याचें कारण मनावर ठसा बरोबर उमटलेला नसतो, दुसरें काय ?

आधीं च सर्व जाणावें । काये येतें समागमें ।
निर्वाणीं अंतीचा देवो । कोण्ही येकें चुकों नये ॥ प्रपंच १४

घर गांव ठाव माझा । सेत वाडे मळे गुरें ।
कन्या पुत्र वधु माझी । सर्व सांडुनि चालिला ॥ १५

माझें माझें म्हणे वेडा । स्वार्थबुद्धी वहुतसी ।
सर्व सांडुनि गेला रे । येकायेकी उठोनियां ॥ १६

प्रपंचें भुलला प्राणी । वेर्थ आयुष्य वेचलें ।
देव ना धर्म ना कांहीं । ऐसा हा साहावा रिपु ॥ १७

१ गळून पडतो, उडतो, नाहींसा होतो.

प्रपंचाकारणें कष्टी। सर्वस्वें वेचला जीवें।
कांहीं च वेचिलें नाहीं। सेवटीं हात झाडिले॥ १८

असें लाचार होऊन हात झाडीत जाण्यापेक्षां जो जिवंतपणीं च मरतो आणि मृत्यूवर मात करून जगतो, तो च खरा विवेकी. असा विवेक सतत अंतरीं जागृत रहावा, म्हणून श्रीसमर्थांना आम्हांस, केव्हां कठोर बोलून तर केव्हां कुरवाळून, सावध करावें लागत आहे.

कां रे भुललासी। सावध होईं॥ पूर्वार्ध २१

माझें माझें म्हणसी सवटीं सांडुनी जासी। कां रे० ॥ १ ॥
बहु दुःख पुढिलांचें दृष्टीं देखतोसी। कां रे० ॥ २ ॥
प्रपंचीं मैंदासी लुब्ध जालासी। कां रे० ॥ ३ ॥
जठरीं नव मास जतन केलासी। कां रे० ॥ ४ ॥
नित्य गासी ऐकसी लुलु सोडिनासी। कां रे० ॥ ५ ॥
रामदास सदा सांगतो तयासी। कां रे मानिनासी। सावध होईं ॥६॥

(१) शत वुरुषें वय नेमिलें। वर्षे
त्यांत बाळपण नेणतां गेलें।
तारुण्य अवघें वेचलें। विषयांकडे ॥ ११-३-३
वृद्धपणीं नाना रोग।
भोगणें लागे कर्मभोग।
आतां भगवंताचा योग। कोणे वेळे ॥ ४ ॥

म्हणून खरोखर वाट न पाहतां, मरणाचें स्मरण ठेवून, शरीर धडधाकट आहे तों च कार्यभागाची लगबग केली पाहिजे. पण, जगांत विपरीत च समज करून देण्यांत येत असतो कीं, हरिहरि करीत बसण्याला म्हातारपणीं पुष्कळ वेळ असतो, तारुण्यांत परलोकाची चिंता करीत न बसतां, ध्यानधारणेंत, पोथ्यापुस्तकांत, जपजाप्यांत, नामस्मरणांत, माळ ओढण्यांत वेळ न दवडतां, बायकापोरांच्या आणि स्वतःच्या ऐहिक सुस्थितीची च तेवढी काळजी करावी. भगवंताचें स्मरण न करतां विषयसेवनांत तारुण्य खर्च करणारे कितीसे तरुण वृद्धपणीं देवपूजेला लागलेले आढळतात, याचा विचार करावा. सर्व वृद्धांच्या चरित्राकडे पाहून मनाला पटलें पाहिजे कीं,

तारुण्यांत चैन करावी आणि म्हातारपणीं देवपूजेला लागावें, हा उपदेश खोटा आणि घातकी आहे. जन्मभर जें केलें नाहीं तें म्हातारपणीं होणें नाहीं. म्हातारपण हें म्हातारपणींच्या आपदा भोगण्यांत च जात असतें, तेव्हां परमेश्वरप्राप्तीसाठीं जीं कांहीं साधनें करावयाचीं असतील, तीं तारुण्यांत च केलीं पाहिजेत, असा श्रीसमर्थांचा सर्व तरुणांना उपदेश आहे. तो त्यांनीं शब्दांत केलेला शंभर ठिकाणीं तर आढळेल च, पण विशेष म्हणजे, तो त्यांनीं आपल्या कृतीनें तरुणांच्या पुढें मांडला आहे.

एका स्फुट प्रकरणांत त्यांनीं वृद्धावस्थेचें हुबेहुब वर्णन केलेलें आहे. त्याकडे तरुणांचें लक्ष जाऊन, जें काय पारमार्थिक हित साधावयाचें असेल तें साधण्याविषयीं त्यांनीं तारुण्य आहे तों च उतावीळ झालें पाहिजे.

देह्याचा भर्वसा नाहीं। तारुण्य चळतें जनीं।
वृद्धापीं विटंबे काया। रूप विद्रूप होतसे॥ स्फु. प्र. ९–१

केंस ते रेसिमा ऐसे। पुढें बुर्कुल होतसें।
टकलें पडती माथां। सेंडीचा ठाव जातसे॥ २

दुरूनीं ऐकिजे कानीं। ते कर्ण बधिरावले।
दुरूनी न्याहाळे डोळां। ते डोळे मंद जाहाले॥ ३

नासिकीं गळतें पाणी। जिव्हेची बोबडी वळे।
दात ते सर्व हि गेले। मान हाले निरंतरीं॥ ४

हाताच्या जाहाल्या कांबी। कोथळु पंजरु दिसे।
वांसाड निघालें मागें। सर्वांगीं मास सुकलें॥ ५

बर्गाड्या मोकळ्या जाल्या। पोटाची काचरी वळे।
कांटकें पोटऱ्या मांड्या। पायांची वेगडी वळे॥ ६

उदंड पाहिली पृथ्वी। उंबरा उंच जाहला।
पाळिलीं पोसिलीं होतीं। हांसती तें चि माणसें॥ ७

सरतो धरेना वारा। मळमूत्र चहुंकडे।
खोकितां वोकितां नाशी। नाना दुखें बळावलीं॥ ८

मागील आठवे सर्वै। दुख वाटे क्षणक्षणा।
आक्रंदे तो कणे कुंथे। आयुष्य न सरे कदा॥ ९

**सर्व येकीकडे जाती । हांसती खेळती सुखें ।**
**पाहातां न येती कोण्ही । आपलाल्या कामाकडे ॥ १०**

किती तंतोतंत हें वर्णन आहे ! कोणाकडे पाहून त्यांनीं हें वर्णन केलें आहे, कोण जाणे. माझ्या मनांत सहज येऊन गेलें कीं, माझी अजून इतकी अवस्था झाली नाहीं. समर्थांनीं अगदीं च ९०।८५ वर्षांचा म्हातारा वर्णनाला घेतलेला दिसतो; असो.

**ऐसें हें दुःख वृद्धापीं । कळलें पाहिजे जना ।**
**परत्र साधणें आधीं । तारुणीं च उठाउठी ॥ ११ ॥**

हा सिद्धान्त खरा व वरील वर्णन वाचून त्या सिद्धान्ताकडे तरुणांचें लक्ष जावो.

( ३ ) एक दिवस मरावयाचें आहे याचें अखंड स्मरण असलें, म्हणजे संसाराविषयींची आसक्ति सहज च नाहींशी होऊन वैराग्य उत्पन्न होईल आणि त्यामुळें शक्य तों देह परोपकार करण्यांत झिजवावा, अशी बुद्धि होईल. मग दुसऱ्याच्या दुःखानें हा दुःखी होईल आणि सुखानें सुखी होईल, त्याच्यांत आपपरभाव रहाणार नाहीं, सारें जग कसें सुखी होईल, ही च एक चिंता त्याला लागेल. श्रीसमर्थचरित्रांत हें च आपण पहातों आणि त्यांचा उपदेश हि तसा च आहे.

**जिणें हें दों दिसांचें । पाहतां शाश्वत कैंचे ॥ ध्रु० ॥**
**शरीर संपत्ति कांहिं न राहे । सावध होउनि पाहें ॥ १**
**कितेक होतें कितेक जातें । येथें कोण राहातें ॥ २**
**दास म्हणे सत्कीर्ति करावी । सृष्टि सुखें चि भरावी ॥ ३**

याचा विस्तार पुढें संप्रदायाच्या लक्षणांत येणार च आहे, पण येथें मला एकदम सांगून टाकावेंसें वाटतें कीं, "सृष्टि सुखें चि भरावी" हें च श्रीसमर्थसंप्रदायाचें प्रमुख लक्षण होय. पण आज जगांत जिकडे तिकडे काय दिसत आहे ? श्रीसमर्थांना तें पाहवेल काय ? श्रीसमर्थांचें ऐकावयाचें तर सांप्रदायिकांवर ही केवढी मोठी जबाबदारी येऊन पडत आहे.

( ४ ) कोणाला हि मरणाचें दुःख जाणवलें म्हणजे 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' यांतून कायमचें कसें सुटावें, याची विवंचना लागेल.

मरणाचें दुःख काय सामान्य आहे ? मृत्युसमयीं दुसऱ्याची काय अवस्था होते, ती आपण पहातों. आपल्या हि वांट्याला ती एक दिवस यावयाची च असते.

**कठिण दुःख सोसवेना । प्राण शरीर सोडिना ।**
**मृत्यदुःख सगट जना । कासाविस करी ॥ १७-६-२७**

ती स्थिति काय वर्णावी !

**नाना अवेवहीन जालें । तैसे चि पाहिजे वर्तलें ।**
**प्राणी अंतकाळीं गेले । कासाविस होउनी ॥ २८**

डोळे गेले, कान गेले, जीभ आडवी पडली, हातपाय गार झाले, काय शिल्लक उरलें ? अंतर्यामीं काय दुःख होत असतें, तें कोणी सांगावयास येत नाहीं ! असह्याच्य स्थितींत शेवटचा श्वास जातो आणि प्राणी सुटतो. सुटतो म्हणजे कायमचा मुक्त होत नाहीं. पुन्हा कोणत्या तरी योनींत जन्म घेण्याला आणि तें च तें दुःख भोगण्याला मोकळा होतो. आपला अंतकाळ इतरांच्याहून कांहीं निराळा असणार काय ?

**अंतकाळ दैन्य दीन । सकळिकांस तत्समान ।**
**ऐसें चंचळ अवलक्षण । दुःखकारी ॥ ३०**

**अंतकाळ आहे कठीण । शरीर सोडीना प्राण ।**
**बराड्यासारिखें लक्षण । अंतकाळीं ॥ ३१**

विचार केला तर, असला अंतकाळ वारंवार व्हावा, हें कोणास इष्ट वाटेल ? मरणाचें दुःख बरोबर जाणवलें तर, त्यांतून कायमचें मुक्त व्हावें, अशी कोण इच्छा करणार नाहीं ? जन्मास आलों आहे तेव्हां मरणार हें खचित, पण तें आतां एकदां च मरावें, वारंवार मरणें नको, असें कोणास वाटणार नाहीं ? वर्षांमागें वर्ष कसलें आणि शतकामागें शतक तरी कसलें, युगानुयुगें लोटत असतात आणि याचे जन्ममरणाचे फेरे चालले च असतात ! तरी याच्या मागच्या घालमेली आणि उलाढाली कांहीं केल्या सुटत नाहींत. इतकें मन निगरगट्ट होतें कीं काय, न कळे ! दुसरा कोणता उपाय आहे ? कोण आमच्या हृदयांत एकदम प्रकाश पाडील ? आपला आपण च विचार केला पाहिजे. मनश्चक्षूंपुढें गेलेलीं मन्वंतरें उभीं

करावीं आणि पुढें जाणारीं युगानुयुगें मनांत आणावीं आणि मग, फार तर शंभर वर्षें टिकणाऱ्या प्रस्तुतच्या आयुष्याकडे आणि त्या आयुष्यांत केलेल्या आणि करीत असलेल्या भिकारड्या व्यापाकडे पहावें आणि विचार करावा. मीं आजवर कैक जन्म घेतले आहेत आणि त्या सर्व जन्मांत संसार करीत च आणि मरत च आलों आहे, हें जर खरें आहे, तर या च जन्माचा आणि त्यांतील स्त्रियापुत्रमित्रादिकांचा इतका मोह कां वाटावा ? मागचें कांहीं आठवत नाहीं, पुढें काय वाढून ठेवलें आहे त्याची कल्पना नाहीं, मग चालू जन्मांतील च सुखदुःखावर जीव इतका लोधून कां पडावा ? हा देह पडल्यावर पुढें या जन्मांतील कांहीं आठवण राहणार आहे काय ? या जन्मांतील बायका-पोरांची, घरादाराची, शेतीवाडीची, जातीपातीची, गांवाची, प्रांताची, देशाची, तेव्हां कांहीं विचारपूस करणार आहेस काय ?

अहा रे मना हें तुला कां कळेना ।
वृथा सीणसी लोभ तूझा ढळेना ।
जिणें सर्व जाईजणें दों दिसांचें ।
विचारीं जनीं आपुलें काय कैचें ॥ करुणा० २७–४

म्हणे दास ऊदास होईं मना रे ।
बहूसाल चिंता नको कामना रे ।
स्वभावें चि होणार तें होइना कां ।
अकस्मात जाणार तें जाइना कां ॥ ५

त्याची तूं चिंता कां करावीस ? या जंजाळांतून कसें सुटावयाचें, एवढा च विचार तूं कर. एकदा मेलास कीं सुटलास, असें थोडें च आहे ? पुनःपुन्हा जन्मास यावें आणि मरावें, म्हणजे या इतक्या आत्महत्या च घडतात, असें श्रीसमर्थ म्हणत आहेत :

येकदां मेल्यानें सुटेना । पुन्हा जन्मोजन्मीं यातना ।
आपणास मारी वांचविना । तो आत्महत्यारा ॥ १८–७–९

प्रतिजन्मीं आत्मघात । कोणें करावें गणीत ।

तेव्हां आतां जन्ममृत्यु कायमचे टळून चिरंजीव कसें होऊन राहूं, याच्या विचारास लागलें पाहिजे.

तो विचार मृत्यूच्या समासांत श्रीसमर्थांनीं सांगून ठेवलेला आपण मागील प्रकरणांत च पाहिला आहे :

> असो ऐसे सकळ हि गेले। परंतु येक चि राहिले।
> जे स्वरूपाकार जाले। आत्मज्ञानी॥ ३-९-५९

तें स्वरूपाकार कसें व्हावें?

> चिरंजीव होये राघवीं मिळतां।
> तेथें पाहों जातां मृत्य नाहीं॥ स्फु. ओ. १५-१०
> नाहीं जन्म मृत्य नाहीं येणें जाणें।
> स्वरूपीं राहाणें सर्व काळ॥ ११

सर्व साधु संत चिरंजीव होऊन ज्या ठिकाणीं जाऊन राहिले आहेत असें तें ठिकाण श्रीसमर्थांनीं आपणांस कितीदां तरी दाखविलेलें आहे. श्रीसमर्थांची भेट घेण्याची, हे मना, तुला तळमळ लागली आहे ना? सावध होऊन कर निश्चय, तेथें च श्रीसमर्थांचें हि तुला दर्शन घडेल.

> रामपाईं जन्म मृत्य आडळेना।
> दास म्हणे मना सावधान॥ स्फु. ओ. ३७-६

तें ठिकाण गांठण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्रयत्न हि फारसा कठीण नाहीं. कठीण आहे विश्वासानें प्रयत्न करण्याचें मनांत येण्याचें! श्रीरामसमर्थचरणांपुढें एक च लोटांगण घालून सर्वस्व अर्पण करावें, यांत कठीण काय आहे? लोटांगण घालण्याचें कठीण नाहीं, त्याप्रमाणें सर्वस्व अर्पण करण्याचें हि कठीण वाटावयास नको. आपलें सर्वस्व घेऊन रामाला किंवा समर्थांना तरी काय करावयाचें आहे? सर्वस्वावरील आपलें ममत्व उडालें म्हणजे सर्वस्व श्रीरामसमर्थार्पण झाल्यासारखें च आहे. महिन्याचा पांचशें रुपये पगार हातीं पडला म्हणजे मातृपितृभक्त आज्ञाधारक मुलगा तो पगार बापाजवळ आणून देतो आणि मग दर रविवारीं एक आणा, किंवा आतां दोन आणे लागले तरी ते बापाजवळून मागून घेतो. असें नातें श्रीरामाशीं आणि श्रीसमर्थांशीं जोडावें, म्हणजे मग पुढची चिंता आपणांस मुळीं च करणें नको.

असें श्रीसमर्थांचें मला, तुम्हांला आणि सर्वांना आश्वासन आहे.

साधक भावें नमस्कार घाली ।
त्याची चिंता साधूस लागली ।
सुगम पंथें नेऊन घाली ।
जेथील तेथें ॥ ४-६-२४

समर्थें ज्याचा अंगिकार केला ।
कोण बोलों शके तयाला ?
माझ्या रामासी जो शरण गेला ।
तो कळीकाळासी वंद्य ॥ ए. १५-५६

याप्रमाणें श्रीरामसमर्थांना शरण जाऊन मरणाला जिंकून अमर होऊन रहावें. मरणाचें अखंड स्मरण ठेवून वागावयाचें तें यासाठीं !

---

## ( ३ ) संसाराची असारता

[ ( १ ) संसार म्हणजे अहंकार आणि रडारड—( २ ) संसार म्हणजे स्वप्न—( ३ ) संसार म्हणजे विष—( ४ ) संसार म्हणजे ओकारी—( ५ ) मग असला नासका संसार करण्यास आम्हांस परवानगी देतात ती कां ?—( ६ ) श्रीसमर्थ शिष्यांस धारेवर धरीत आहेत—( ७ ) स्वतःचें उदाहरण देतात—( ८ ) त्यांचा सिद्धान्त—( ९ ) आपलें कर्तव्य— ]

संसार मिथ्या ऐसा कळला । ज्ञान समजोन निघोन गेला ।
तेणें जन पावन केला । आपणा ऐसा ॥ १४-७-२५

( १ ) संसार म्हणजे माझें माझें करणें, हें माझें तें माझें, आई माझी बाप माझा, भाऊ माझा बहीण माझी, मुलगा माझा मुलगी माझी, माझी सून माझा जावई, माझें घर माझें शेत, माझी संपत्ति माझें वैभव, माझा गांव माझा देश, इत्यादि अहंकाराखालीं चूर होऊन राहणें, याचें नांव संसार. हा असला संसार आपण सर्व जण जन्मभर मन लावून करीत च असतों.

ऐसें माझें माझें म्हणतां । अभिमानें वोझें वाहातां ।
आयुष्य वेचलें अवचिता । मरोन गेला ॥ पं. स. १-९

मग पुन्हा जन्म, पुन्हा संसार, पुन्हा मृत्यु. याप्रमाणें सारखे फेरे करीत जीव चालला आहे. स्वहिताची गांठ कोणत्या च जन्मांत पडत नाहीं. स्वहित राहूं

घ्या दूर, पण ज्या सुखासाठीं म्हणून जीव धडपडत असतो, तें सुख तरी त्याला प्राप्त होत असतें काय? या ना त्या कारणामुळें, आज ना उद्यां सर्वत्र रडारड चाललेली असते. एकविसाव्या करुणाष्टकांत असलें रडक्या संसाराचें चित्र रेखाटण्यांत आलें आहे.

**नसे आंथराया नसे पांघराया। नसे धाम ना दृढ छाया निजाया।**
**नसे अन्न खाया नसे रम्य जाया। वृथा सीण संसार कर्तीं रडाया॥ १**

**नसे द्रव्य कांहीं घरीं धान्य नाहीं। बहू वेष्टिला कामक्रोधादि देहीं।**
**पराधेनता वेळ नाहीं मराया। वृथा सीण संसार कर्तीं रडाया॥ २**

**मनासारिखा मित्र तोही मिळेना। परत्रीक तें ज्ञान पोटीं वसेना।**
**सदा कोप आरोप संतप्त काया। वृथा सीण संसार कर्तीं रडाया॥ ३**

**मनासारिखा सोइराही मिळेना। मनीं पाहतां चित्तशुद्धी असेना।**
**उणें बोलती सर्व कांहीं छळाया। वृथा सीण संसार कर्तीं रडाया॥ ४**

**म्हणे दास हे आस कैसी पहा हो। सुखाची बहू होतसे श्लाघ्यता हो।**
**पुढें जाहली सर्व काया पडाया। वृथा सीण संसार कर्तीं रडाया॥ ५**

मरे तों जीव आशा करीत असतो सुखाची आणि प्राप्ति होत असते दुःखाची! या अष्टकांतील सर्व च वैगुण्यें किंवा अशा च सारखीं आणखी इतर, सर्वांच्या च वाट्याला येतात असें नव्हे, पण त्यांतून कोणी सर्वथैव सुटत असेल, असें मात्र नव्हे. याप्रमाणें संसाराच्या कष्टमय स्वरूपाचा उल्लेख श्रीसमर्थांनीं किती तरी ठिकाणीं केलेला आढळेल.

(२) संसाराला त्यांनीं सतरा ठिकाणीं स्वप्नाची उपमा दिली आहे. ग्रन्थराजांतील सहाव्याचा अनुर्वाच्य समाधानाचा दहावा समास सर्वांच्या परिचयाचा असणार. त्यांत

**स्वप्नीं स्वप्नाचा विचार। तो तूं जाण हा संसार।**
**येथें तुवां सारासार। विचार केला॥ ६-१०-५१**

असें म्हटलें आहे. म्हणजे आधीं च संसार स्वप्नवत् आहे, त्यांत आणखी मी असें केलें आणि तसें करतों, असें म्हणणें, म्हणजे तें स्वप्नांतलें स्वप्न होय. संसार हें पहिलें स्वप्न आणि मी यंव करतों आणि त्यंव करीन, मी गुरु केले आहेत, मी साधनें करीत असतों, मी आतां शहाणा झालों, मला ज्ञान झालें,

असें मानणें हें दुसरें स्वप्न – स्वप्नीं स्वप्न – होय. खरें शहाणपण, खरें ज्ञान, खरी जागृति, याच्या पलीकडे आहे.

जागृती या पैलिकडे । तें सांगणें केवि घडे ।
जेथें धारणा चि मोडे । विवेकाची ॥ ५९

पुढच्या च दशकाच्या पहिल्या समासांत ते म्हणतात :

संसार हा चि दीर्घ स्वप्न । लोभें वोसणाती जन ।
माझी कांता माझें धन । कन्या पुत्र माझे ॥ ७–१–२०

माझें माझें म्हणून जें जें वाटणें तें तें सर्व स्वप्नांतलें वाटणें होय. अशा स्वप्नांत च कोट्यवधि जीव आयुष्य कंठीत असतात, ऐंशीं, नव्वद, शंभर वर्षें पावेतों जगत असतात, तरी पण केव्हां च जागे होत नाहींत. त्यांना आपण स्वप्नांत आहोंत, हें च उमगत नसतें, सारें खरें च भासत असतें, आणि अशा अवस्थेंत च – जागे न होतां च – मरत हि असतात.

देहबुद्धिअहंकारें । निजेले घोरती घोरें ।
दुःखें आक्रंदती थोरें । विषय सुखाकारणें ॥ ७–१–२३
निजेले असतां च मेले । पुन्हा उपजतां च निजेले ।
ऐसे आले आणि गेले । बहुत लोक ॥ २४
निद्सुरेपणें चि सैरा । बहुतीं केल्या येरझारा ।
नेणोनियां परमेश्वरा । भोगिले कष्ट ॥ २५
तया कष्टाचे निर्शन ।

व्हावया आत्मज्ञान पाहिजे, हें उघड आहे, पण तत्पूर्वी हि मी म्हणेन

तया कष्टाचें निरसन । व्हावया धरावे श्रीसमर्थचरण ।
तेणें आपुलें अज्ञान । समूळ निरसेल ॥

याप्रमाणें संसाराला स्वप्नाची उपमा दिलेली अनेक स्फुट ओव्यांत, पदपदांतरांत, लघु काव्यांत अनेकदां आढळते. उतारे देण्याचा मोह मला अनावर होत असतो, हें वाचकांच्या लक्ष्यांत येऊन चुकलें च आहे. तथापि वाचकांचा फार अंत न पाहतां दोन अभंग, एक पद व एक दोन वचनें त्यांच्या निदर्शनास आणतों.

१ स्वप्नांत बरळतात. २ झोपेच्या गुंगींत.

## ( १ ) अभंग

स्वप्न हा संसार माईक वेव्हार । म्हणोनि साचार मानूं नये ॥ स्फु. ओ. १०६/१
मानूं नये सर्व जायाचें आपुलें । ज्याचें त्यानें नेलें दुःख काये ॥ २
दुःख काये आतां स्वप्नसुख जातां । साच तें तत्त्वता दृढ धरी ॥ ३
दृढ धरी मना जानकीजीवना । तेणें समाधाना पावसील ॥ ४
पावसील निजस्वरूप आपुलें । जरी तें घडलें रामदास्य ॥ ५
रामदास्य घडे बहुतां सुकृतें । कांहीं पुण्य होतें पूर्वजांचें ॥ ६

गोड स्वप्न पडत असतां एकदम जाग आली तर वाईट वाटतें. स्वप्नांतल्या सुखाकडे च मन जातें. आश्चर्य च म्हणावयाचें, पण असें घडतें खरें. स्वप्नांतलें सुख एकदम नाहींसें झाल्याचें दुःख व्हावें, हें नवल आहे. संसाराचें हि हुबेहुब असें च आहे. संसारांतील सुखदुःखें भोगीत च असावें, त्यांपासून दूर होणें च नको, असें वाटत असतें.

## ( २ ) दुसरा अभंग

सपनीच्या सुखें सुखावला प्राणी । थोर जाली हाणी जागृतीसी ॥ स्फु. ओ. ७६/१
जागृतीसी नाहीं सपनीचें सुख । तेणें जालें दुःख बहुसाल ॥ २
बहुसाल खेद मानिला अंतरीं । वायां झडकरी जागा जालों ॥ ३
जागा जालों म्हणे वायां अवचिता । निजोनि मागुता सुख पाहे ॥ ४
सुख पाहे पुन्हा स्वप्नीचें न दिसे । भयानक दिसे प्राणियासी ॥ ५
प्राणियासी दुःख जाहालें मागुतें । जागा जालियातें सर्व मिथ्या ॥ ६
मिथ्या सुख दुःख स्वप्नाचा वेव्हार । तैसा हा संसार नाथिला चि ॥ ७
नाथिला चि जाय क्षण आनंदाचा । सर्व चि दुःखाचा क्षण जाये ॥ ८
क्षण येक मना राघवीं सावध । तेणें नव्हे खेद दास म्हणे ॥ ९

श्रीसमर्थांचा हा उपदेश संसार करून भागलेल्या वृद्धांनीं ऐकून काय उपयोग ? पश्चात्तापाला मात्र कारण व्हावयाचें. तरुणांनीं तो ऐकावा, त्याचा विचार करावा आणि वेळीं च सावध व्हावें.

## ( ३ ) पद

तारुण्याचा कोण भर्वसा । वेचूं नको वयेसा रे रे रे रे ॥ ध्रु०
हात पाय हें वागतां बरें । कोण्ही कामा न ये दुसरें ।
दुःख होईल तें येकसरें रे रे रे रे । बहु सावध असतां बरें रे ॥ १

कोण समयो येईल कैसा। याचा न कळे कीं भर्वसा।
काळ मांडुनी बैसला फांसा रे रे रे रे। येकायेकी होईल वळसा रे॥ १
स्वप्न संसार बाजीगरी। नेणतयासी वाटे खरी।
व्यर्थ काये तूं भरसी भरीं रे रे रे रे। हे अवघी च वोडंबरी रे॥ ३
येक वाढती येक मोडती। येक उगे चि चर्फडिती।
हित जातें हातीचा हातीं रे रे रे रे। दास म्हणे धन्य संतसंगती रे॥ ४

रामदास्य घडेल, मन राघवचरणीं जडेल, सत्संगति लाभेल, तर च या स्वप्नाची कल्पना होऊन निजस्वरूपीं जागृतीचा लाभ होईल. एकवीसमासीच्या दोन ओव्यांत हा च बोध आहे.

## ( ४ ) ओव्या

स्वप्न सत्य चि वाटे निद्रिस्ता। परी निशेष लटिकें जागृती येतां।
जागृतीस स्वप्नभयवार्ता। बोलों चि नये॥ ए. १६–५३
तैसा संसार हा दीर्घ स्वप्न। मध्यें माया दिसे माहा विघ्न।
स्वरूपजागृती आलियां निर्विघ्न। मुळीं च आहे॥ ५४

( ३ ) संसार करणें म्हणजे विष भक्षण करणें होय. विष खाऊन अमर होण्याची इच्छा करणें आणि संसारांत सुखाची अपेक्षा करणें, दोन्ही सारखीं च. दोन च आधार पुरे व्हावेत :

**पहिला आधार** मनाच्या श्लोकाचा—

नव्हे सार संसार हा घोर आहे।
मना सज्जना सत्य शोधूनि पाहे।
जनीं वीष खातां पुढें सूख कैचें।
करीं रे मना ध्यान या राघवाचें॥ ६६

**दुसरा आधार** एकवीससमासीचा—

प्रपंचीं आणि परम सुख। पावेन म्हणेल तो मूर्ख।
जैसें परमान्नीं मिश्रित विख। सेवितां मृत्य पावे॥ २०–९

( ४ ) याहून हि त्यांनीं एका अभंगांत संसाराला अति किळसवाणी उपमा दिली आहे. त्यांना संसार म्हणजे ओकारी वाटते, आम्हांस वाटत नाहीं. हा च त्यांच्यांत आणि आमच्यांत फरक होय.

**येतां संसारासी जाल्या दुःखरासी। कोणाला असोसी कासयाची॥ स्फु.ओ. ३७/१**
**पात्र कोण्ही येक भरला वमक। खायाचा विवेक तेथें कैचा॥ २**
**विषय नासका कळला असका। सुख नाहीं येका देवेंविण॥ ३**
**देवेंविण येका सर्व कांहीं फोल। वासना गुंतेल कोणे ठाईं॥ ४**
**कोणे ठाईं आतां असोसी राहिली। वासना गुंतली रामपाईं॥ ५**

त्यांच्या मतें संसाराचें स्वरूप च हें असें आहे, तें निराळें कोठून होणार?

**संसार मुळीं च नासका। विवेकें करावा नेटका।**

तरी तो नीट थोडा च होतो?

**नेटका करितां फिका। होत जातो॥ १९-१०-२८**
**ऐसा याचा जिनसाना। पाहातां कळों येतें मना।**

तो तसा नसता आणि सुखमय असता, तर थोरथोरांनीं तो कां टाकला असता, असा त्यांनीं एका ठिकाणीं सवाल च केला आहे. इतर थोरांचा हवाला त्यांनीं द्यावा, हें ठीक च आहे. आपणांपुढें प्रत्यक्ष त्यांचें च उदाहरण आहे.

थोरांच्या या गोष्टी अपवादात्मक होत. शंभर लक्ष माणसांत असला अपवाद चार दोन शतकांत एकादा च आढळावयाचा. बाकी सारीं माणसें संसारांत गुंतून च पडणार. हें जाणून ते इतकें च म्हणतात कीं, हा असला संसार तुम्हांला सोडवत नसेल तर सोडूं नका, पण त्याचें स्वरूप ओळखून तो करा आणि परमार्थाला, श्रीसंप्रदायाला, शुद्ध मार्गाला अगदीं च विसरून जाऊं नका. दोन्ही साधा.

(५) संसार स्वप्नवत् असार आहे, तें विष आहे, ती ओकारी आहे, इतका त्यांना संसाराविषयीं तिटकारा असतां तो करण्यास ते आम्हांस परवानगी देतात, ती काय म्हणून? ती केवळ आमचा अधिकार व पात्रता हीं पाहून. संसार सोडा म्हटल्यानें कोणी सोडीत नाहीं, हें त्यांना दिसत होतें. म्हणून जेथें जेथें संसार करावा, अशीं त्यांचीं वचनें आढळतील, तेथें तेथें ते नाइलाजानें संसार करण्यास परवानगी देत आहेत, असें समजावें. इंद्रियें स्वभावतः बहिर्मुख असतात, तीं अंतर्मुख करण्याचें सामर्थ्य फार च थोड्यांत असतें. सामान्य माणसें प्रपंच सोडूं शकत नाहींत, हें जाणून,

करावयाचा च तर तो निदान नेटका, नेमका करा, न्यायनीतीनें करा, अनासक्त राहून करा, असें ते सांगत असतात. पण त्यांचीं असलीं सवलतीचीं वचनें आमच्या सारख्यांच्या फार पथ्यावर पडतात. आम्ही नेमकीं तीं हुडकून काढून, आमच्या वर्तनाला श्रीसमर्थांचा आधार आहे म्हणून तीं पुढें करीत असतों. आम्हांला आधार च पाहिजे असेल तर सप्तसमासीच्या एका समासांत फार समर्पक उपमा आली आहे. पण याप्रमाणें आपल्या मनाची समजूत काढतां आली, तर तेवढ्यानें आपण आपली फसवणूक करून घेऊं, पण त्यानें खरा अनासक्त योग आम्हांस साध्य होईल काय ? ती उपमा अशी आहे : जमिनींत पुरलेलें द्रव्य सुरक्षित असल्यावर वरच्या वरदळीनें काय बिघडतें ? तद्वत् आमची परमार्थाची बैठक ठाम असल्यावर संसार करण्यानें तींत काय कमीपणा येणार आहे ? बैठक ठाम असल्यावर कमीपणा येणार नाहीं हें खरें, पण प्रश्न असतो तो ठाम बैठकीचा. ती ठाम असते का ?

> **उपाधीमध्यें चि असावें । परी विवेकें निघोनि जावें ।**
> **मनापासून नसावें । उपाधीमध्यें ॥** सप्त० ५–१८
>
> **मनोगत अवघें परब्रह्मीं । शरीर वर्ते मायाभ्रमीं ।**
> **तयास संसारउर्मी । बाधूं न सकती ॥ १९**
>
> **ठेवणें अवघें वांचलें । वरील वरदळेनें नेलें ।**
> **तरी तयाचें काये गेलें । कांहीं च नाहीं ॥ २०**
>
> **तैसी वरदळ हे उपाधी । परमार्थाची सदृढ बुद्धी ।**
> **त्याची जाली कार्यसिद्धी । सकळ कांहीं ॥ २१**

ही उपमा कोणीं पुढें करावी ? ती कोणाच्या तोंडीं शोभून दिसेल ? श्री एकनाथ महाराज, श्री तुकाराम महाराज, अशा सारख्या थोर प्रपंची सत्पुरुषांच्या तोंडीं शोभेल, का आधारासाठीं टपलेल्या आमच्या सारख्यांच्या ? सामान्य माणसांनीं ढोंग न माजवितां कुबुद्धि टाकली, आसक्ति सोडली, सन्मार्ग धरला आणि नीतिन्यायानें सुखाचा संसार केला, म्हणजे पुरे.

(६) या ठिकाणीं मी अत्यन्त उत्कटत्वानें वाचकांस विनवितों कीं, कृपा करून आतांचें आतां पुस्तक काढून एकवीससमासींतील अकरावा माधवीचा समास सावकाश वाचा, नाहीं पेक्षां त्या समासाच्या ८२ व्या ८२ ओव्या मला येथें उतरून घ्याव्या लागतील. जरूर वाचा. एरव्हीं श्रीसमर्थ

पुष्कळ लडिवाळपणानें शिष्यांशीं बोलत असले, तरी या समासांत कठोर वृत्ति धारण करून ते शिष्यांना धारेवर धरीत आहेत. ते रागानें म्हणत आहेत, तुम्हांला किती रे सांगावें ?

जरी प्रपंच शाश्वत जाणतों । तरी तुम्ही आम्ही यासी च धरितों ।
हा अशाश्वत म्हणोनि रडतों । तुम्हा भोंवता ॥ ए. ११–५९

तुम्ही कैसे रे परमार्थी ।
परघातकी आणि आपस्वार्थी ।
डोळे झांकूनि दोहीं अर्थी ।
नागवलेती कीं रे ॥ ६०

पूर्वी संतसमुदाये होता ।
त्याची क्रिया हि ऐकता ।
परी कांहीं तऱ्ही वर्तता ।
तयासारिखे तुम्ही ॥ ६८

तुम्ही शिष्य न व्हा रे परमार्थ बुडवणें ।
झुरता प्रतिष्ठे कारणें ।
शेवटीं प्रतिष्ठा टाकूनि जाणें ।
न घडे नेणों तुम्हांसी ॥ ७३

इतके रागावलेले व शिष्यांना इतकें लावून आणि टाकून बोलतांना मी श्रीसमर्थांना कधीं पाहिलें नव्हतें.

(७) असें हें एकंदर संसाराचें चित्र व संसारी लोकांची केविलवाणी दशा पाहून च आपलें मन उदास होऊन आपण संसाराकडे पाठ फिरविली, असें श्रीसमर्थांनीं ६० वें करुणाष्टक व १९ वें स्फुट प्रकरण यांचा शेवट करतांना ध्वनित केलें आहे.

## (६०) सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें ।

अनेक दिव्यांबर रत्नमाळा । सिंहासनीं फांकति रम्य कीळा ।
शरीर तें ही लागे तजावें । सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें ॥ १

सर्वत्र हें वैभव ईश्वराचें । अनुमात्र तें ही नाहीं जिवाचें ।
जन्मासि येतां उघडें चि यावें । सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें ॥ २

मध्यें चि हें सर्व निर्माण जालें । ऋणानुबंधें सकळै मिळाले ।
अज्ञानयोगें ममता भ्रमावें । सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें ॥ ३

जितां जिवातें बहुसाल चित्तीं। करणें घडे हो धन हांव कीर्ती।
कटीसूत्र तें ही तोडूनि द्यावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ ४
माता पिता ईतर थोर थोरें। देहांतकाळीं मिळती अपारें।
कौतूक तेहीं सकळैं पहावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ ५
शरीरपांगें बहु सीण जाला। सखीं म्हणोनी बहुसाल केला।
तेहीं समस्तीं सुखें रहावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ ६
तारुण्यकाळीं मद आवरेना। वृद्धाप्यकाळीं कांहीं स्मरेना।
स्वहीत तें ही लोभें चुकावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ ७
सांडूनियां वोळखि ईश्वराची। जन्मूनि चिंता केली जयांची।
निष्ठूर तेहीं सकळैं फिरावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ ८
संसारचिंता ऐसी कराया। दुःखानळें व्याकुळ सर्व काया।
दुजयासि जातां दुःखें रडावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ ९

दुसऱ्यांची ही अशी स्थिति पाहून आणि ऐकून

ऐकोन हें दास उदास चित्तीं। सीतापती वांचुनि कोण अंतीं।
वायां प्रपंचीं वृथा सिणावें। सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें॥ १०

## ( १९ ) स्फुट प्रकरण

देहाचा भर्वसा नाहीं। वैभवाचा असोचिना।
देश काळ वर्तमानें। सर्वही होत जातसे॥ १
संगती चालिले सर्वै। मागें पुढें हळु हळु।
देखतां देखतां होतें। कळतें न कळे कसें॥ २
देसोदेसीचे राजे। नाना श्रीमंत जाणते।
किती आले किती गेले। कोण जाणे कळेचिना॥ ३
संसार नेटका वाटे। सत्य नेमस्त आपुला।
पाहातां पाहातां पुढें। कळतां कळतां कळे॥ ४
बोलतां चालतां जातें। सार आयुष्य वेंचतें।
कळेना भुलवी माया। माझें माझें वृथा वृथा॥ ५
सोडीना सोडवीना रे। कोण्हीही पाहातां जनीं।
पुरता तूर्त चालावें। कोण्ही कोण्हा पुसों नये॥ ६
ऐसें हें चालतें आतां। मायाही चालते सवें।
धूर्त ते पावले खुणे। भ्रमिष्टें भुलली जनीं॥ ७

**दिसतें काये सांगावें। लोक जाती मरोनियां।**
**उपजले वाढले मेले। आले गेले किती किती॥ ८**

**संसार नासका आहे। विटंबे भलते सदा।**
**मन तें सांवरेना कीं। उभाउभी खडाखडी॥ ९**

अशी दुसऱ्यांची स्थिति पाहून स्वतः श्रीसमर्थांनीं गिरिकंदरें सेविलीं किंवा जनांत वागून हि आपली उदासवृत्ति सोडली नाहीं.

**यालागीं मोकळी वृत्ती। असली पाहिजे सदा।**
**धन्य ते जाणती ज्ञानी। उदास गिरिकंदरीं॥ १०**

**आटाआटी जनामध्यें। आरडाचीरडा निघे।**
**उदासवृत्तिचा योगी। न लिंपे असतां जनीं॥ ११**

(८) तात्पर्य, श्री समर्थांचा हा सिद्धान्त आहे व तो त्यांनीं त्रिवार उच्चारिला आहे.

(१) **तैसा संसारें दुःखला। त्रिविध तापें पोळला।**
**तो चि येक अधिकारी जाला। परमार्थासी॥ ३-६-७**

(२) **जो संसारदुःखें दुखवला। जो त्रिविध तापें पोळला।**
**तो चि अधिकारी जाला। परमार्थविषीं॥ ५-३-३४**

(३) **जो संसारदुःखें दुखवला। जो त्रिविध तापें पोळला।**
**तो चि येक अधिकारी जाला। परमर्थविषईं॥** चतु० १-१६

(९) या व मागील प्रकरणांतील विचार इतके सामान्य आणि समजण्यास सुलभ आहेत कीं, ते आचरण्यांत आणण्याला तितके च सुलभ असते तर ते शिष्यांच्या मनावर बिंबविण्यासाठीं श्री समर्थांना इतका खटाटोप करावा लागला नसता. एका पदांत तर निराश होऊन ते म्हणत आहेत, तुम्ही ऐकत च नाहीं तर त्याला मी तरी आतां काय करूं !

**संसारीं सुख म्हणतां लाज नाहीं। वायां पडिलों प्रवाहीं।**
**माझें माझें हें चि पिसें लागलेसें। विचारितां नव्हे कांहीं॥** ध्रु. पू. १०९

**कन्या पुत्र माये बाप आणि बंधु। अवघीं आपुलीं मानिलीं।**
**ऋणानुबंध संगतीचा तुटोनि गेला। तेणें वृत्ती दुखवली॥ १**

**जितुके आले तितुके गेले येकले चि। ऐसें तुम्ही हि जाणता।**
**जाणत चि लालुचेची आस मोठी। तरी मी काये करूं आतां॥ २**

इतक्यांत च आपण त्यांचें रागाचें बोलणें ऐकलें, आणि या ठिकाणीं निराशेचे उद्गार ऐकत आहोंत. आपण त्यांचें ऐकत नाहीं म्हणून त्यांना याप्रमाणें निराशेचे उद्गार काढावयास लागावे याचें आपणांस थोडें तरी दुःख होऊन आपण संसाराचें यथार्थ स्वरूप ओळखून अनुतापयुक्त अंतःकरणानें त्यांना शरण जाऊन त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें गेलें पाहिजे, म्हणजे ते आपला अंगीकार करतील यांत तिळमात्र संदेह नको.

---

## ( ४ ) अनुताप आणि उपरति

( १ ) पश्चात्ताप—( २ ) कोण कोणाचा—( ३ ) अनुतापाची दशा—
( ४ ) अनुताप आणि उपरति—( ५ ) अनुताप कशानें होईल—
( ६ ) श्रवण—( ७ ) नुसतें शब्दज्ञान फोल—( ८ ) प्रत्ययज्ञानी—
( ९ ) राघवाचा धर्म—(१०) परवाना

**अनुताप तेथें विरक्ति । भावार्थ तेथें भक्ति ।**
**निर्विषय तेथें मुक्ति । स्वानंद तेथें स्वरूप ॥** सो. ८–११–६२

( १ ) सार्थक न होतां नरदेह पडला, तर पुन्हा चौऱ्यायशीं लक्ष योनी फेरे फिरावे लागणार, हा नुसता विचार मनांत आला, तर अंगावर शहारे आले पाहिजेत. पण तसा विचार हि कधीं मनांत येत नाहीं व जीव कासावीस होत नाहीं, इतकी जन्ममरण आणि संसार हीं आमच्या अंगवळणीं पडलेलीं असतात. कोणत्या कां देहांत होईना, कुत्र्याच्या मांजराच्या, डुकराच्या गाढवाच्या, इत्यादि कोणाच्या कां देहांत होईना, आम्ही असे इतक्या वेळां संसार करीत आणि मरत आलों आहोंत कीं, आतां आम्हांस जन्ममरणाचें कांहीं च वाटेनासें झालें आहे. पण जाणत्यांनीं आणि निष्ठावंतांनीं सावध होऊन विचार केला पाहिजे. केव्हां तरी शुद्धीवर येऊन आपणांस पश्चात्ताप झाला पाहिजे.

( २ ) संसाराची असारता मनाला पटली आणि मागची पुढची कांहीं हि कल्पना नसतां, एक दिवस, हें सर्व सोडून देऊन मला चालतें

व्हावयाचें आहे, माझे डोळे मिटावयाचे आहेत, हें मनांत आलें म्हणजे आज तरी प्रत्येकाचे डोळे उघडले पाहिजेत. या भवसागरांत कोण कोणाचा आहे ? ज्यांना मीं आजवर माझीं म्हणून मानलीं तीं सर्व माणसें मला टाकून कोठें गेलीं ? कोठें गेली माझी आई, जिचे प्रेमाश्रु मीं आशीर्वाद मानले, जिचा संतोष मीं माझ्या ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाचा पाया मानिला, ती माझी आई आज कोठें आहे, याचा मला पत्ता हि नसावा काय ? मी तरी तिच्यावांचून जीव कसा ठेवला ? ही च कां तिची मला आणि माझी तिला माया होय ? वडील हि गेले, बंधु गेले, बहिणी गेल्या, हीं सारीं देवमाणसें गेलीं, आणि मी च एकटा करंटा मागें कसा राहिलों ? हे सर्व कोठें गेले ? वरचे एकवीस स्वर्ग आणि खालचीं सप्त पाताळें यांत कोण कोठें गेले कांहीं पत्ता नाहीं ! असे दुःखाचे विचार शिष्याचे मनांत उद्भवतात तों च श्री समर्थ त्याला शुद्धीवर आणतात:

**कर्मयोगें सकळ मिळालीं । येके स्थळीं जन्मास आलीं ।**
**तें तुवां आपुली मानिलीं । कैसीं रे पढतमूर्खा ॥** ३-१०-५१

महाराज, ३×१० वाचून मन उतावीळ होत आहे, कंठ सद्गदित होत आहे, डोळे भरून येत आहेत ! मागचें आठवून पश्चात्ताप होत आहे, पुढची कल्पना होऊन मन भीतीनें ग्रस्त होत आहे. आपल्या चरणावांचून कोठें आधार दिसत नाहीं. मी आतां आपले चरण सोडणार नाहीं. आपण मला आतां किती हि 'हडं' 'हडं' केलें, तरी आपलें तें झिडकारणें माझी परीक्षा पहाण्यापुरतें च आहे, असें समजून मी जास्त च लगट करीन.

( ३ ) इतका भाव पाहिजे, निश्चय पाहिजे, पश्चात्तापानें अंतःकरण दग्ध होऊन सद्गुरूस शरण गेलें पाहिजे. या च स्थितीचें वर्णन ५×८ त आहे तें येथें उद्धृत करण्याविषयीं मन ओढ घेत आहे. वाचकांपैकीं कोणी कोणी तरी विचारतील च कीं, यांत तुमचें काय आहे ? पण मीं कोठें माझें शहाणपण मिरवावयास निघालों आहें ? माझें सारें भांडवल म्हणजे श्री समर्थांचीं वचनें. तीं किंचित् कोणी दृष्टिआड करतील म्हणून त्या वचनांकडे विषयानुरोधानें आणि कारणापुरतें, संदर्भासह वाचकांचें लक्ष वेधून घ्यावयाचें, एवढें च माझें काम असतें. वाचकांच्या लक्षांत अद्यापपर्यंत आलें नसल्यास मी त्यांना आणखी एक गुप्त गोष्ट कळवितों कीं, मधून मधून माझें

म्हणून जें किंचित् गद्यांत लिहिणें असतें त्याचें हि मूळ शोधूं गेल्यास बहुधा श्री समर्थांच्या च पद्यांत आढळेल.

श्री समर्थांच्या कृपेला पात्र होण्यापूर्वीं जो अनुताप वाटला पाहिजे, त्याची दशा कशी असते ती आपण श्री समर्थांच्या च मुखांतून निघालेली ऐकली पाहिजे.

संसारदुःखें दुखवला । त्रिविध तापें पोळला ।
निरूपणें प्रस्तावला । अंतर्यामीं ॥ ५-८-३

जाला प्रपंचीं उदास । मनें घेतला विषयत्रास ।
म्हणे आतां पुरे सोस । संसारींचा ॥ ४

प्रपंच जाईल सकळ । येथील श्रम तो निर्फळ ।
आतां कांहीं आपुला काळ । सार्थक करूं ॥ ५

ऐसी बुद्धि प्रस्तावली । पोटीं आवस्ता लागली ।
म्हणे माझी वयेसा गेली । वेर्थ चि आवघी ॥ ६

पूर्वीं नाना दोष केले । ते अवघे चि आठवले ।
पुढें येऊनि उभे ठेले । अंतर्यामीं ॥ ७

आपले दोष आछ्यादिले । भल्यांस गुणदोष लाविले ।
देवा म्यां वेर्थ च निंदिले । संत साधु सज्जन ॥ १०

निंदे ऐसे नाहीं दोष । ते मज घडले कीं विशेष ।
माझे अवगुणीं आकाश । बुडों पाहे ॥ ११

नाहीं वोळखिले संत । नाहीं अर्चिला भगवंत ।
नाहीं अतित अभ्यागत । संतुष्ट केले ॥ १२

नाहीं कष्टविलें शरीर । नाहीं केला परोपकार ।
नाहीं रक्षिला आचार । काममदें ॥ १४

भक्ति माता हे बुडविली । शांति विश्रांति मोडिली ।
मूर्खपणें म्यां विघडिली । सद्बुद्धि सद्वासना ॥ १५

आतां कैसें घडे सार्थक । दोष केले निरार्थक ।
पाहों जातां विवेक । उरला नाहीं ॥ १६

कोण उपाये करावा । कैसा परलोक पावावा ।
कोण्या गुणें देवाधिदेवा । पाविजेल ॥ १७

**नाहीं सद्भाव उपजला । अवघा लोकिक संपादिला ।**
**दंभ वरपंगें केला । खटाटोप कर्माचा ॥ १८**

**पोटीं धरूनि अभिमान । शब्दीं बोले निराभिमान ।**
**अंतरीं वांछूनियां धन । ध्यानस्त जालों ॥ २०**

**व्युत्पत्तीनें लोक भोंदिले । पोटासाठीं संत निंदिले ।**
**माझे पोटीं दोष भरले । नाना प्रकारीचे ॥ २१**

**सत्य तें चि उच्छेदिलें । मिथ्य तें चि प्रतिपादिलें ।**
**ऐसें नाना कर्म केलें । उदरंभराकारणें ॥ २२**

**ऐसा पोटीं प्रस्तावलों ।**

म्हणजे पुढचा मार्ग मोकळा होतो. आयुष्यांत जितक्या लवकर असा अनुताप उत्पन्न होईल, तितकें बरें. लवकर तितकें खरें च बरें, पण केव्हां ना केव्हां तरी प्रत्येकाचें लक्ष आपल्या गत आयुष्याकडे वळून त्याला सिंहावलोकन घडलें पाहिजे. नरदेहाचें सार्थक कशांत आहे त्याकडे लक्ष जाऊन, माझ्या आयुष्याचीं, देवा, इतकीं वर्षें गेलीं, पण ध्येयप्राप्तीच्या दृष्टीनें माझ्या हातून कांहीं च कर्म घडलें नाहीं, उलट जें घडलें तें मला ध्येयापासून दूर दूर नेणारें च घडत गेलें, असा पश्चात्तापाचा विचार ज्या दिवशीं कोणाच्या हि मनांत उद्भवतो, तो त्याच्या भाग्याचा पहिला दिवस होय. त्या दिवसापासून त्याच्या भाग्याला सुरुवात होते. फार च थोड्यांच्या आयुष्यांत असा दिवस उजाडत असावा असें वाटतें. पश्चात्तापानें शुद्धि होते म्हणतात, तें कांहीं खोटें नव्हे. पश्चात्तापासारखें प्रायश्चित्त नाहीं.

**परमार्थाचें जन्मस्थान । तें चि सद्गुरूचें भजन ॥ ७-१०-३८**

असें श्री समर्थांनीं सांगितलें आहे आणि मी म्हणतों, अनुताप हें सद्गुरूभजनाचें जन्मस्थान होय. आधीं अनुताप झाला पाहिजे. जन्म वाया गेला, वाया चालला, असा अनुताप वाटल्यावांचून सद्गुरूची आठवण हि होणार नाहीं. आतांपर्यंतचा सारा काळ दुश्चित्तपणांत च गेला, आतां आपलें कसें होणार, अशी कल्पना परम भाग्यानें मनांत आली म्हणजे मग सहज च श्री समर्थांचें स्मरण होणार.

**अंतरीं अनुतापें तापले । तेणें अंतर शुद्ध जालें ।**
**पुढें सद्गुरुवचनें निवाले । सच्छिष्य ऐसे ॥ ५-१०-५०**

(४) अनुताप आणि उपरति यांत फारसा फरक केलेला दिसत नाहीं. तसा केला च तर उपरति म्हणजे बाह्य विषयापासून पराङ्मुख होण्याची बुद्धि व अनुताप म्हणज़े कृत कर्माबद्दल पश्चात्ताप. वाल्मीकिस्तवनाच्या समासांत हे दोन्ही शब्द श्री समर्थांनीं एकत्र उच्चारिले आहेत.

उपरति आणि अनुताप । तेथें कैंचें उरेल पाप ॥ १६-१-११

(५) अनुताप कसा उत्पन्न व्हावा ? का केवळ भाग्यानें ? भाग्य अतर्क्य असतें व त्याची अनुकूलता सदैव असावी लागते. तथापि, असें सुचविणें चुकीचें होणार नाहीं कीं, श्रवणानें अनुताप वाटूं लागणें शक्य आहे. नेहमीं सत्पुरुषांचीं चरित्रें कानीं पडत गेलीं, तर केव्हां तरी मनांत येईल च कीं, मग आपण तरी आपला जन्म वाया कां दवडावा, थोडेंसें तरी आचरण त्यांच्यासारखें कां न करावें. श्रवण हें केव्हां हि इष्ट च असतें. श्रीसमर्थांनीं त्याचें महत्त्व फार मानलें आहे. परमार्थाचें त्यांनीं तें एक च एक व्यापक साधन सांगितलें आहे.

सकळ जीवां येक पैस । जयास बोलिजे आकाश ।
सकळ जीवांचा वास । येका परब्रह्मीं ॥ ७-८-२९

तैसें सकळ जीवांस मिळोन । सार येक चि साधन ।
तें हें जाण श्रवण । प्राणीमात्रासी ॥ ३०

नाना देश भाषा मतें । भूमंडळीं असंख्यातें ।
सर्वांस श्रवणापरतें । साधन चि नाहीं ॥ ३१

श्रवणें घडे उपरती । बद्धाचे मुमुक्ष होती ।
मुमुक्षाचे साधक अती । नेमेसीं चालती ॥ ३२

साधकाचे होती सिद्ध । आंगीं बाणतां प्रबोध ।
हें तों आहे प्रसिद्ध । सकळांस ठाउकें ॥ ३३

इत्यादि.

जेथें नाहीं नित्य श्रवण । तें जाणावें विलक्षण ।
तेथें साधकें एक क्षण । क्रमूं नये सर्वथा ॥ ४४

जेथें नाहीं श्रवणस्वार्थ । तेथें कैंचा हो परमार्थ ।
मागें केलें तितुकें वेर्थ । श्रवणेविण होये ॥ ४५

**तस्मात् श्रवण करावें। साधन मनीं धरावें।**
**नित्यनेमें तरावें। संसारसागरीं ॥ ४६**

इत्यादि.

(६) श्रवणांत सर्व कांहीं येतें. बाह्य श्रवण, अंतरीं मनन आणि चित्ताला निदिध्यास या सर्व साधनांना अनुतापाचें फळ आलें च पाहिजे. अनुतापानंतर भक्ति, विवेक, वैराग्य आणि शेवटीं गुरुचरणाची जोड, असा क्रम लागलेला असतो.

**अनुतापें भक्ति विवेक वैराग्य।**
**घडे त्याचें भाग्य काय सांगों** ॥ स्फु. ओ. ७९/६

**समाधान होतें श्रवणमननें।**
**सगुण भजनें अनुतापें** ॥ स्फु. ओ. २३६/४

**अनुतापें त्याग तो चि येक योग।**
**देवाचा संयोग दास म्हणे ॥ ५**

असें अनुतापाचें महत्त्व आहे. श्रवणादि आधींचीं साधनें, त्यांचें फळ अनुताप आणि नंतर सद्गुरुकृपेपर्यंत क्रमशः प्रगति, असा हा साधनमार्ग होय. कठीण आहे अनुताप वाटणें. संसाराची, वैभवाची, विषयध्यासाची एक प्रकारची धुंदी असते. पूर्वजांच्या पुण्याईनें ती धुंदी उतरली पाहिजे. कोणत्या हि कारणानें कां होईना, ती धुंदी उतरल्यावांचून आणि, अरे रे, इतकें आयुष्य आपण वायां दवडिलें, असा पश्चात्ताप झाल्यावांचून परमार्थमार्गावर पाऊल पडणें केवळ अशक्य होय.

**शिष्य पाहिजे केवळ। विरक्त अनुतापी ॥ ५–३–२०**

तो या साठीं. ज्याला अनुताप झाला नाहीं, अशा कोणा हि भोजनभाऊ शिष्याला श्री समर्थचरणांजवळ थारा मिळत नसे. अनुतापावांचून सत्संगतीची आवड उत्पन्न होणार नाहीं. अनुतापानें अंतःकरण तापलें पाहिजे. तापविल्यानें सोनें जसें शुद्ध होतें तसें अंतःकरण तापून शुद्ध झालें, म्हणजे मग सद्गुरुवचनांचा त्यावर वर्षाव होऊन तें निवतें, शांत होतें. अनुतापाची महती इतकी अनुपम आहे कीं, अनुतापानें खरोखर तप्त होऊन व देवाच्या कृपेसाठीं प्राण फुटतो कीं काय, असें होऊन, अत्यंत व्याकुळतेनें श्री समर्थांना एक जरी हांक मारली, तरी ते कृपा करतील, असा विश्वास वाटतो. पण

तो अनुताप, त्यांच्या भेटीसाठीं वाटणारी ती प्राणांतिक तळमळ किंवा ती व्याकुळता कोठून आणावी !

(७) एकाद्याला शब्दज्ञान झालें, ब्रह्म काय आणि माया काय, पिंड-ब्रह्मांडाची उत्पत्ति कशी झाली, पंचीकरण म्हणजे काय, इत्यादि विषयांचें शाब्दिक प्रतिपादन करणें त्याच्या हातचा मळ झाला, पण त्याच्या अंतःकरणांत अनुतापाचा लवलेश हि नसेल, संसाराविषयींची त्याची आसक्ति यत्किंचित् हि कमी झाली नसेल, तर त्याचें तें सारें ब्रह्मज्ञान कवडीमोल होय. केवळ शब्दज्ञान, खूप खोल पण कोरड्या विहिरीसारखें समजावें. कोणाला च त्याचा उपयोग होत नाहीं — स्वतःला च नाहीं, तर दुसऱ्याला कोठून होणार? हे केवळ शब्दज्ञानी बहुधा पाषांडी, आचारहीन, क्रियाभ्रष्ट, विषयासक्त, एकंकारप्रवर्तक असतात, असा जगाला आजपर्यंत अनुभव आलेला आहे.

**सर्वभावें सदा सगुणी भजावें । कोरडें त्यागावें शब्दज्ञान ॥** श. ४–७०
**शब्दज्ञान भक्ति संसारीं आसक्ति । त्या नांव विभक्ति सत्य जाण ॥ ७१ ॥**
**सत्य जाण मनें आधार घेतला । सुखें सुखावला विषयांच्या ॥ ७२ ॥**
**विषयांचें सुख चोरूनि अंतरीं । त्याग दुराचारी उच्छेदीतो ॥ ७३ ॥**
**उच्छेदित आहे भक्ति सगुणाची । वाट साधनाची मोडतसे ॥ ७४ ॥**
**मोडतो आचार कर्म कुळाचार । करी भ्रष्टाकार पापरूपी ॥ ७५ ॥**
**पापरूपी नर जाणावा साचार । करी येकंकार शब्दज्ञानें ॥ ७६ ॥**
**शब्दज्ञानगाथा अहंतेच्या माथा । तेणें तो सर्वथा आवरेना ॥ ७७ ॥**
**आवरेना तोंडीं धरितां पाषांडी । वेदाज्ञा हि मोडी आंगबळें ॥ ७८ ॥**
**तोंडबळें बापा क्रिया न संडावी । आसक्ति दंडावी वीतरागें ॥ ७९ ॥**
**वीतरागें मन मोकळें करावें । सुख न धरावें संसाराचें ॥ ८० ॥**
**संसारीचें सुख नासिवंत आहे । जाईजणें पाहे विचारूनि ॥ ८१ ॥**
**विचारूनि पाहीं आसक्ति मनाची । दुर्दशा ज्ञानाची करूं नको ॥ ८२ ॥**
**करूं नये मुक्तक्रियेचा निश्चयो । तेणें होतो क्षयो साधनाचा ॥ ८३ ॥**

याप्रमाणें अनुतापावांचूनचें नुसतें शब्दज्ञान घोर अनर्थाला कारण होत असतें.

**आलया संसारीं अनुतापेंवीण ।**
**शब्दज्ञान सीण वाउगा चि ॥** शत ११–५

(८) अनुताप, वैराग्य, कर्माचरण, उपासना, नित्यनियम, चिंतन, वगैरे सर्व ज्ञानाच्या पूर्वींच्या पायऱ्या आहेत. पण जाणत्याला विचारून च मार्गाला लागणें बरें. उगीच कोणाच्या तरी नादीं लागून कांहीं अपाय नसला तरी फसगत करून घेऊं नये. बुवा म्हणविणारा प्रत्येक जण संत असतो च, असें धरून चालूं नये. असा इशारा त्या काळीं हि द्यावा लागला होता, तेथें हल्लींच्या काळाविषयीं बोलावयास च नको. अति सावध राहिलें पाहिजे. प्रत्ययाचा जाणता पहावा आणि त्याचे पाय धरावे. आपणांस मात्र एवढ्या पंचाइतींत पडण्याचें कांहीं च कारण नाहीं. आपला तोडगा पूर्वी च ठरलेला आहे.

सगट संत म्हणों नये । म्हणतां मोडतो उपाये ।
अज्ञानासी कळे काये । अवघा होतसे अपाये ॥ धु॰ उ. २९

जाणता वैद्य भेटे । रोगव्याधी सर्व तुटे ।
रोकडी सप्रचीत । लोक आनंदें दाटे ॥ १

कर्ममार्ग उपासना । थोर आधार जना ।
न्याये नीति विवंचना । मुख्य आधार ज्ञाना ॥ २

अनुतापें उदासीन । तेणें शोभतें ज्ञान ।
हरिकथा निरूपण । दास म्हणे सावधान ॥ ३

(९) राघवाचा धर्म, महाराष्ट्राचा धर्म, आणि श्री समर्थसंप्रदाय हे तिन्ही समानार्थी शब्द होत, असें मी मानतों. पुढील पदांत श्री समर्थांच्या जीवींचें आर्त आणि श्री रामापाशीं मागणें, हीं तर आहेत च, पण त्यांत तुम्हाआम्हांला वाटावा तो अनुताप हि आहे आणि त्याबरोबर श्री समर्थांचा उपदेश हि आहे. या चार हि गोष्टींकडे आपलें लक्ष जावें, आपणांस त्यांचें चिंतन घडावें व मला स्फुरला नाहीं तो अर्थ आपण त्यांतून काढावा.

राघवाचा धर्म जागो । कीर्ति अद्भुत माजो ।
ठाईं ठाईं देवाळयें । भक्तमंडळी साजो ॥ धु॰ गि. ११७

शक्ति आहे तों चि फावे । दोन्ही लोक साधावे ।
यह लोक परलोक । शत्रु सर्व रोधावे ॥ १

लोककल्याणाच्या आड येणारे ते इहलोकींचे शत्रु व परमार्थाच्या आड येणारे कामक्रोधादि हे परलोकींचे शत्रु होत.

**संसारींचें दुःख मोठें । हें मि कोणाला सांगों ।**
**जन्म गेला तुजविणें । आणिका काय मि मागों ॥ २**

**मागता समर्थांचा । तेणें कोणा मागावें ।**
**रामेविण कोण दाता । कोणामागें लागावें ॥ ३**

इतरांपुढें अकारण तोंड कां वेंगाडावें !

**रामदास म्हणे देवा । आतां पुरे संसार ।**
**असंख्य देणें तुझें । काय देतिल नर ॥ ४**

(१०) पूर्व तयारींत अनुतापाचें महत्त्व किती आहे, हे येथपर्यंत आपण थोडक्यांत पाहिलें. किंबहुना हें म्हणणें यथार्थ ठरेल कीं, अनुतापावांचून बाकीची सारी तयारी वायां जाण्याचा संभव फार आहे. अनुताप वाटणें हा परमार्थाचा पाया वाटतो. श्री समर्थमंदिरांत प्रवेश मिळविण्याचा तो परवाना आहे.

**अनुदिन अनुतापें तापलों देवराया ।**
**परमदिनदयाळा नीरसी मोहमाया ।**
**अचपळ मन माझें नावरे आवरीतां ।**
**तुजविण सिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥**

**भजनरहित रामा सर्व ही जन्म गेला ।**
**स्वजनजनधनाचा वेर्थ म्यां स्वार्थ केला ।**
**रघुपति मति माझी आपुलीसी करावी ।**
**सकळ तजुनि भावें कास तूझी धरावी ॥ २ ॥**

**विषयजनित सूखें सौख्य होणार नाहीं ।**
**तुजविण रघुनाथा वोखटें सर्व कांहीं ।**
**रविकुळटिळका रे हीत माझें करावें ।**
**दुरित दुरि हरावें सस्वरूपीं भरावें ॥ ३ ॥**

**तनु मनु धनु माझें राघवा रूप तुझें ।**
**तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें ।**
**प्रचळित न करावी सर्वथा बुधि माझी ।**
**अचळ भजनलीळा लागली आस तूझी ॥ ४ ॥**

**चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ।**
**सकळ स्वजनमाया तोडितां तोडवेना ।**

घडि घडि बिघडे हा निश्चयो अंतरीचा ।
म्हणउनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥ ५ ॥

जळत हृदय माझें जन्म कोट्यानकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ।
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधु ।
षडरिपुकुळ माझे तोडि याचा विरोधु ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ।
सिणत सिणत पोटीं पाहिली वास तुझी ।
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे ।
तुजविण मज नेते जंबुकी वासना रे ॥ ७ ॥

सबळ जनक माझा राम लावण्यपेटी ।
म्हणउनि मज पोटीं लागली आस मोठी ।
दिवस गणित बोटीं प्राण ठेऊनि कंठीं ।
अवचट मज भेटी होत घालीन मीठी ॥ ८ ॥

इत्यादि सर्वतोमुखीं झालेलें १४७ वें अष्टक हा च तो परवाना होय. तें अष्टक नुसतें म्हणून दाखविल्यानें श्री समर्थचरणीं ठाव मिळणार नाहीं. तें तर आपण सर्व जण नेहमीं म्हणून दाखवीत च असतों. पण तेवढ्यानें कार्य होणार नाहीं. त्या अष्टकांतील अनुताप आपणांस खरोखर झाला आहे हें श्री समर्थांच्या निदर्शनास आणून दिलें पाहिजे. असा हा अनुतापाचा परवाना मंदिराच्या दरवाजावर दाखवावा आणि थेट श्री समर्थचरणांपाशीं जाऊन बसावें. कोणी अटकाव करूं शकणार नाहीं.

# (५) शुद्ध कर्माचरण

(१) कर्माची आवश्यकता—(२) कर्मे कोणतीं—(एक) स्नानसंध्यादिद्वारा स्वधर्मरक्षण, (दोन) अद्वैतश्रवण, (तीन) नित्य नियम—(३) पण कर्मांत च गुरफटून हि जाऊं नये—(४) कर्में करावयाचीं तीं निष्ठापूर्वक करावीं—(५) ज्ञान्यानें हि कर्में वर्ज करूं नयेत—(६) नुसतें शब्दज्ञान फोल होय—(७) उपसंहार

**सांगा शुद्ध क्रियेविण। परमार्थी तरला कोण॥**

## (१) कर्माची आवश्यकता

कर्म, उपासना आणि ज्ञान हें आपल्या धर्माचें त्रिकांडात्मक स्वरूप होय. त्याचा कोणाला वीट आला असेल, तर त्यांनीं खुशाल पाखंडी बनून स्वतःला आणि आपल्या अनुयायांना, त्यांना इष्ट वाटत असेल त्या स्थळीं नेऊन सोडावें. कालमाहात्म्य आणि प्राक्तन यांच्या पुढें कोणाचें च कांहीं चालत नाहीं. पण ज्यांचा आपल्या थोर पूर्वजांवर विश्वास असेल, स्वधर्मावर श्रद्धा असेल, ज्यांना उपासनेंत अनिर्वाच्य आनंदाचा अनुभव येत असेल, त्यांनीं शुद्ध आचार अवश्य पाळला पाहिजे. सर्व कांहीं शुद्ध असावें, केवळ आपल्या मनास येईल तसें नसावें. जेथें ज्ञानाच्या मागें सुद्धां विमल हें विशेषण लावण्यांत येणार आहे, तेथें क्रिया तरी शुद्धतेच्या निर्बंधांतून कशी सुटेल? पाखंडी लोक हि क्रिया करीत च असतात, पण ती त्यांची क्रिया मनःपूत असते, विध्युक्त नसते. क्रिया हि विहित असावी लागते. मनाच्या श्लोकांत हि

**अती आदरें शुद्ध क्रीया करावी।**

असा च मनाला उपदेश आहे. शुद्ध क्रियेवांचून गति नाहीं. श्रीसमर्थ विचारतात—

**शुद्ध क्रियेवीण। परमार्थी तरला कोण॥** ए. २०–२७

संसाराची असारता आणि देहाची नश्वरता हीं मनाला पटलीं म्हणजे मग, आपलें भवितव्य तरी काय आहे, असा प्रश्न पडून विचारी मनुष्याचें

मन साधनांकडे वळलें च पाहिजे. त्याच्या लक्ष्यांत नीटसें न येवो, पण कांहीं तरी कर्म करावें, स्नानसंध्या तरी नीट करावी, निदान निवांत होऊन एकांतात बसावें, ध्यान धारणा चिंतन करावें, कांहीं तरी साधनें करावीं, ज्ञानेश्वरीची महती कानावरून गेलेली असते, ती तरी पहावी, दासबोधाची प्रतिष्ठा सर्व जण गातात, तो तरी वाचावा, असें हें ना तें, कांहीं तरी करावें, अशी त्याला बुद्धि होते. सद्गुरूची कृपा व्हावयाची असेल तेव्हां होईल, अशा विश्वासानें तो साधनें करू लागतो.

शिष्यांना साधनें करण्याविषयीं उपदेश करण्याचा श्रीसमर्थांना कधीं कंटाळा वाटला नाहीं. मनाच्या श्लोकांपैकीं शेवटचा श्लोक पाहिला तरी लक्ष्यांत येईल कीं, मनाच्या श्लोकांचीं अंतर्मुख होऊन मनोभावें पारायणें करणाऱ्याच्या आंगचे आधीं दोष झडून त्याच्या ठिकाणीं साधनें करण्याची पात्रता येते आणि मग ज्ञान-वैराग्य-सामर्थ्य यांची प्राप्ति होऊन त्याला आत्मनिवेदन घडतें. हा च उपदेश आणि हा च क्रम, न जाणों, शंभर ठिकाणीं सांगण्यांत आला असेल, आपण किती ठिकाणचा पाहूं शकूं ?

श्रीमत् दासबोधांत कर्माची आवश्यकता अनेकदां प्रतिपादलेली आढळेल :

**आधीं कर्माचा प्रसंग । कर्म केलें पाहिजे सांग ।**
**कदाचित पडिलें व्यंग । तरी प्रत्यवाय घडे ॥ ११-९-१**
**आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार ।**
**आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥ १७-१०-२५**

मानपंचकाच्या तिसऱ्या मानांत

**आधीं तें करावें कर्म । कर्ममार्गें उपासना ।**
**उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्ष चि पावणें ॥** मा. पं. ३-१

असा च क्रम आहे. कर्म आणि उपासना यांच्या मधला एक दुवा अध्याहृत असतो. तो दुवा एका स्फुट ओवींत स्पष्ट केलेला आढळतो. कर्मानें चित्तशुद्धि होते आणि मग उपासना घडते आणि नंतर च सद्गुरूची कृपा होऊन ज्ञानप्राप्ति होते :

**कर्मं चित्तशुद्धी होऊनिया गेली ।**
**मग उपासिली उपासना ॥** स्फु. ओ. ७०-१

**उपासनामीसें देव ठाईं पडे ।**
**संदेह चि उडे येकसरा ॥ ९**

याप्रमाणें कर्मापासून आरंभ करून क्रमाक्रमानें साधक मोक्षपदापर्यंत जाऊन पोंचतो :

**मोक्षपद ज्ञानें रामदासीं जालें ।**
**बंधन तुटलें संसाराचें ॥ १०**

एका सवाईत ( करुणाष्टकें वगैरे २१४–११ ) तर हा उपदेश त्यांनीं आपल्या सहीनिशीं निक्षून केला आहे :

**आधीं कर्मांचा प्रसंग शुध उपासना मार्ग**
**ज्ञानें उधरती जग येथें संदेह नाहीं ।**
**देहेनिर्शन करावें माहांवाक्यें विवरावें**
**तेणें संसारीं तरावें काळ नासतो आही ।**
**ज्यास नाहीं येणें जाणें नाहीं जन्म ना मरणें**
**सद्य पाविजे श्रवणें दास म्हणे हे सही ॥**

( ‘ मार्ग ’ ऐवजीं ‘ मग ’ असेल काय ? )

यांतील ‘ सही ’ शब्द महत्त्वाचा आहे. तो शब्द तिसऱ्या कडव्यांत योजतां यावा म्हणून व पहिल्या कडव्याचा शेवटचा शब्द ‘ नाहीं ’ पाहून मधल्या कडव्यांत प्रासासाठीं ‘ आहे ’ चें ‘ आही ’ करावें लागलें आहे, तरी त्याची श्रीसमर्थांनीं पर्वा केली नाहीं. सही म्हणजे मान्य, निश्चित, जणूं प्रतिज्ञा च. ‘ दास म्हणे हे सही ’ म्हणजे ‘ समर्थ म्हणतात, यांत कालत्रयीं हि बदल व्हावयाचा नाहीं.’

एका पदांत पापी कोणाला समजावें, तें सांगतांना स्नानसंध्येला फांटा देणाऱ्यांची आठवण झाल्यावांचून राहिली नाहीं. मुख्य पापी कोण ?

**मुख्य पापी तो चि जाणा । ज्यासी देव चि मानेना ।**
**भाव भक्ति क्रिया नाहीं । न्याय नीति आवडेना ॥** ध्रु० ३. २०

**ज्ञान नाहीं ध्यान नाहीं । समाधान तें हि नाहीं ।**
**श्रवण मनन नाहीं । निजध्यास तो हि नाहीं ॥ १**

**स्नानसंध्या आवडेना । दानधर्म घडेना ।**
**वासना बरी नाहीं । नित्यवंतासी पडेना ॥ २**

इत्यादि. नित्यवंत म्हणजे नित्य नियमानें स्नानसंध्यादि कर्मे आचरणारा, असा अर्थ करावा. पण बहुधा 'नीतिवंत' ऐवजीं 'नित्यवंत' शब्द पडला असावा, असें वाटतें.

याच्या उलट, पुण्यवंत कोण?

**तो चि येक पुण्यवंत। जया अंतरीं भगवंत।**
**काया वाचा जीवें प्राणें जगदीशाचा शरणांगत॥** ध्रु० उ. २१
**कर्मकांड उपासना। अधिकार त्या ज्ञाना।**
**उदासीन दंभ नाहीं। भ्रष्टाकार करीना॥ ३**

वगैरे.

## (२) कर्मे कोणतीं?

कर्माचरण हें पुण्यवंताचें लक्षण होय, असें ठरल्यावर कोणतीं कर्मे करावीं, असा पुढचा प्रश्न साहजिक उद्भवतो. 'अंतर्भाव' प्रकरणांत नेमका हा च प्रश्न शिष्यानें श्रीसमर्थांना विचारला आहे व त्याचें त्यांनीं उत्तर दिलें आहे. त्यांनीं तीन गोष्टी करावयास सांगितल्या आहेत: (एक) स्नानसंध्यादि-द्वारा स्वधर्मरक्षण, (दोन) अद्वैतश्रवण आणि (तीन) नित्य नियम.

### (एक) स्वधर्मरक्षण

ब्राह्मणापुरता स्वधर्मरक्षणाचा विचार केला तर स्फुट श्लोक ५५ यांत जीं ब्राह्मणाचीं कर्मे सांगितलीं आहेत, तीं केलीं पाहिजेत. कर्म करणें कोणाला टळत नाहीं. मोठा पाखंडी झाला तरी त्याच्या मागचें कर्म सुटत नाहीं. मग कर्म करणें जर अपरिहार्य असेल, तर तें विध्युक्त करणें च योग्य नव्हे काय?

**देह्यासि कर्म लागलें। विध्योक्त चालतां भलें।**
**बहुत कर्म शोभलें। भले तयास लाभलें॥** स्फु. श्लो. ५५–२

**प्रमीत शौच्य आच्मनें। विध्योक्त स्नान तर्पणें।**
**त्रिकाळ सांग मार्जनें। दिनेषु वन्हि पूजनें॥ ३**
**स्वधर्म कर्म सांग तें। नसे कदापि वेंग तें।**
**चुकों नये चुकों नये। चुकीस प्रत्यवाय ये॥ ४**

**स्वहा स्वधा परोपरीं। अखंड शास्त्र वीवरी।**
**सुसीळ न्यायवंत तो। बहु जनासि मान्य तो॥ ५**
**प्रयोग याग वेदिका। प्रसंग जाणता निका।**
**यथाविधी परायणु। समर्थ तो चि ब्राह्मणु॥ ६**

या कार्यक्रमांत स्नानसंध्येला अग्रस्थान दिलेलें आहे, पण ती च स्नानसंध्या आमची सुटत चालली आहे व सुटावी म्हणून मुद्दाम प्रयत्न होत आहेत. ज्याच्याकडे पाहून एकादे वेळीं एकाद्याच्या मनांत, न जाणों, निवांत बसून शांतपणें संध्या करूं, असें येईल, यासाठीं असला मोह उत्पन्न होऊं नये म्हणून गळ्यांत सूत्रपाश च नसावा व असल्यास तो तोडून टाकावा, असली आत्मघातकी प्रवृत्ति, हळुहळु कां होईना, पण ब्राह्मणसमाजांत पसरत चालली आहे. ब्राह्मणाचें सामर्थ्य त्याच्या कर्माचरणांत आहे, असें श्रीसमर्थ म्हणत आहेत आणि तें च सामर्थ्य गमावण्याच्या उद्योगास ब्राह्मण लागले आहेत. दुर्दैव आहे, दुसरें काय म्हणावें? अशा अधोगतीच्या काळांत श्रीसमर्थाविषयीं प्रेमादर बाळगणारांनीं तरी, स्वतःचीं आणि इतरांचीं स्थानभ्रष्ट झालेलीं मनें विवेकानें आवरून धरलीं पाहिजेत. समर्थांचें म्हणवावयाचें आणि त्यांचें ऐकावयाचें नाहीं, हें बरें नव्हे. या स्नानसंध्येवर श्रीसमर्थांचा केवढा भर! धर्मावरील संकट दूर झालेलें पाहून त्यांना झालेला आनंद, आनंदवनभुवनी प्रकरणांत ज्या शब्दांनीं व्यक्त करण्यांत आला आहे, ते शब्द विचारांत घ्या. त्यांच्या आनंदानें

**उदंड जाहालें पाणी। स्नान संध्या करावया।**
**जप तप अनुष्ठानें। आनंदवनभुवनीं॥** स्फु. प्र. ५८-३६

या शब्दांचें रूप धारण केलें, याचें महत्त्व ध्यानांत आणा. ज्या कर्मांचें श्री समर्थांना इतकें महत्त्व वाटतें, तें कर्म आम्ही सोडावें, हा समर्थद्रोह होणार नाहीं काय, याचा सर्वांनीं विचार करावा. स्वामीद्रोहाला श्रीसमर्थांनीं केवढी जबर शिक्षा सांगून ठेवली आहे :

**स्वामीद्रोह जया घडे। तो यावच्चंद्र नरकीं पडे।**

आणि आपलें राष्ट्र हल्लीं ज्या स्थितींत खितपत पडलें आहे, त्याहून आणखी घोर नरक निराळा कोणता असणार? त्या नरकांतून सुटावयास द्रोहाचरण थांबावयास नको काय? त्या नरकांतून सुटण्याला

**तयास उपाव चि न घडे । स्वामी तुष्टल्यावांचुनी ॥** ५-३-७३

त्यांची आज्ञा पाळण्यानें त्यांचा संतोष होणार आहे. स्नानसंध्येंत पवित्रपणा आहे, तो पुण्यमार्ग आहे, ती केव्हां हि सोडूं नये, म्हणून श्रीसमर्थांनीं स्पष्ट शब्दांत किती तरी ठिकाणीं आज्ञा करून ठेवलेली आहे. कांहीं थोडीं आपण पाहूं.

( १ ) २×२ हा उत्तम लक्षणांचा समास होय. त्यांत श्रीसमर्थ आज्ञा करितात—

**स्नानसंध्या सांडूं नये । कुळाचार खंडूं नये ।**
**अनाचार मांडूं नये । चुकुरपणें ॥** २-२-३४

( २ ) १२×१० त उत्तम पुरुषाचें वर्णन करतांना, अशा पुरुषाचे ठिकाणीं जे उत्तम गुण असतात ते सांगतांना पहिला च गुण सांगतात—

**स्नानसंध्या देवार्चन । येकाग्र करावें जपध्यान ।**
**हरिकथा निरूपण । केलें पाहिजे ॥** १२-१०-४

( ३ ) सगुणध्यानांत वर्णन चाललें आहे सिंहासनाधिष्ठित श्रीरामरायाचें, पण न जाणों, तें वर्णन करीत असतांना मनापुढें उभा राहिला असेल प्रसंग श्रीशिवरायाच्या राज्याभिषेकाचा. त्याच्याशीं आपणांस येथें कांहीं कर्तव्य नाहीं. येथें आपणांस सध्यां इतकें च पहावयाचें आहे कीं, ह्या वर्णनांत ब्राह्मणांचा उल्लेख करतांना पहिलें लक्षण दर्शविलें आहे तें स्नानसंध्येचें—

**बैसलीं ब्रह्मवृंदें निर्मळें । स्नानसंध्या आचारशीलें ॥** सगुण० ५५

( ४ ) पारपत्याधिकारी कसे असावेत हें मानसपूजा प्रकरणांत सांगतांना त्यांच्या पवित्रतेचें लक्षण म्हणून स्नानसंध्येचा उल्लेख केला आहे—

**न्यायनीतिमर्यादेचे । स्नानसंध्यापवित्रतेचे ।**
**सत्यवादी बहुतांचे । अन्याय क्षमिती ॥** मानस० २-७

( ५ ) श्रीसमर्थसंप्रदाय म्हणजे श्रीसमर्थोपदिष्ट शुद्ध मार्ग होय, हें आपण या ग्रन्थाच्या गर्भभागांत पहाणार च आहोंत. तो च पुण्यमार्ग होय. त्याचीं लक्षणें ठरलेलीं, पण श्रीसमर्थवाङ्मयांत सर्वत्र विखुरलेलीं आहेत. त्यांत स्नानसंध्येचा समावेश केलेला आढळेल—

**प्रखर वैराग्य उदासीन। प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान।**
**स्नानसंध्या भगवद्भजन। पुण्यमार्ग ॥ ११-४-१८**

(६) या च पुण्यमार्गाचा प्रचार सर्वत्र करण्याची पराकाष्ठा केली पाहिजे अशी आज्ञा त्यांनीं विरक्ताच्या लक्षणांत केलेली आहे—

**पुण्यमार्गाचा विस्तार। बळें चि करावा ॥ २-९-१९**
**स्नान संध्या जप ध्यान। तीर्थयात्रा भगवद्भजन।**
**नित्य नेम पवित्रपण। अंतरशुद्ध असावें ॥ २०**

(७) असा हा पुण्यमार्ग सोडून स्नानसंध्येला फांटा देणें हें तमोगुणाचें लक्षण होय—

**स्नानसंध्या नेम नसे। स्वधर्मीं भ्रष्टला दिसे।**
**अकर्तव्य करितसे। तो तमोगुण ॥ २-६-२५**

पण, समतेच्या नांवावर या च तमोगुणाची तरफदारी करण्यांत येत असते.

(८) याच्या उलट, स्नानसंध्येची आवड असणें, हा सत्त्वगुण मानला आहे—

**स्नानसंध्या पुण्यसीळ। अभ्यांतरींचा निर्मळ।**
**शरीर वस्त्रें सोज्वळ। तो सत्त्वगुण ॥ २-७-१२**

(९) कर्म, उपासना, वैराग्य, गुरुपरंपरा, ज्ञान इत्यादि लक्षणांवर आतांपासून आपली दृष्टि खिळलेली असावी, कारण पुढच्या भागांत या च लक्षणांचा आपणांस विस्तार करावयाचा आहे. सध्यापुरतें आपलें लक्ष स्नान-संध्येकडे लागलें आहे, एवढें च—

**काळ सार्थक चि करावा। संतसंग बरा धरावा रे रे रे रे ॥** ध्रु० ॥ उत्तरार्ध ३१९

**स्नानसंध्या कर्म करावें। कांहीं वैराग्य हि धरावें।**
**कांहीं हरिभजनीं भरावें रे रे रे रे। कांहीं ज्ञान हि विवरावें रे ॥ १**

**दास म्हणे हें कळेना। गुरु केल्यावीण निवळेना।**
**मन चंचळ हें वळेना रे रे रे रे। ज्ञान नसतां भोग टळेना रे ॥ ४**

(१०) संसारी माणसाचा संसार व्यर्थ कशानें जातो व धन्य कशानें होतो, याचें वर्णन ९१ व ९२ या दोन स्फुट प्रकरणांत आलें आहे. त्यांत संसार धन्य होण्याला पहिली च गोष्ट सांगितली आहे, ती स्नानसंध्येची—

**स्नानसंध्या टिळे माळा । अंतरनिष्ठ उपासना ।**
**नित्यानित्य विवेकानें । धन्य संसार होतसे ॥** स्फु. प्र. ५२-१

( ११ ) श्रीसमर्थ आपल्या शिष्यांना आणि महंतांना सर्व देशभर संचारार्थ पाठवीत, तेव्हां त्यांनीं कसें वागावें, याविषयीं ज्या बहुमोल सूचना करीत, त्यांपैकीं बऱ्याचशा ३ ज्या स्फुट प्रकरणांत आलेल्या आहेत. त्या महत्त्वाच्या प्रकरणाकडे आपलें पूर्वीं लक्ष गेलेलें च आहे व पुढें हि जाणार च आहे. आज येथें एवढें च पहावयाचें कीं, त्यांत हि पहिली सूचना आहे, ती अशी—

**स्वदेश राहिला मागें । विदेश लागला पुढें ।**
**आचार राखणें आधीं । स्नानसंध्या पवित्रता ॥** स्फु. प्र. ३-२

सांगा, किती विस्तार करावा ? प्रतिज्ञेनें शंभर तरी वचनें सादर करतां येतील. जो थोडासा तरी वर विस्तार केला, तो एवढ्या च साठीं कीं, इतकें ज्या स्नानसंध्येचें श्रीसमर्थांना अगत्य वाटतें, त्या बाबतींत आपली वृत्ति मात्र अलीकडे चळल्यासारखी व्हावी, हें आपल्या बऱ्याचें लक्षण नव्हे, असें सर्वांच्या लक्ष्यांत यावें ! त्या वेळचीं आणि आतांचीं कारणें भिन्न भिन्न असतील, पण श्रीसमर्थांच्या वेळीं हि समाजाला असा च भ्रम झालेला होता कीं काय, न कळे. २×४ हा समास वाचून माझ्या मनांत हा विचार येतो. त्या समासाची मला कितीदां तरी आठवण होते ! मागें झाली च असेल, आतां होत आहे व पुढें हि होणार च. आधीं च नरदेह श्रेष्ठ, त्यांत आणखी ब्राह्मणकुळांत जन्म आणि त्यांत पुन्हा स्नानसंध्यादि पुण्यमार्गाची आवड, म्हणजे केवढी पुण्याई म्हणावयाची ! पण,

**हें कांहीं च न धरी जो मनीं ।**
**तो मृत्युप्राय वर्ते जनीं ।**
**जन्मा येऊन तेणें जननी ।**
**वायां च कष्टविली ॥** २-४-१४

स्नान नाहीं संध्या नाहीं, भजन नाहीं पूजन नाहीं, भक्ति नाहीं भाव नाहीं, देव नाहीं धर्म नाहीं, नीति नाहीं न्याय नाहीं, आचार नाहीं विचार नाहीं, निष्ठा नाहीं नेम नाहीं, कर्म नाहीं उपासना नाहीं, तात्पर्य, मनाची मुक्त क्रिया हें च ज्यांच्या जीविताचें धोरण, असे लोक जिवंत असून मेलेले समजावे. तीं जिवंत प्रेतें होत.

**ऐसे प्रकारीचे पाहातां जन। ते जीत चि प्रेतासमान।**
**त्यासीं न करावें भाषण। पवित्र जनीं॥ १-४-२६**

## (दोन) अद्वैतश्रवण

अद्वैत म्हणजे अहं ब्रह्मास्मि आणि त्वमपि तत्. या अद्वैतासंबंधानें बोलावयाचें तर आपल्या भारतभूचें भाग्य इतकें थोर आहे कीं, जगांतल्या कोणत्या हि पुढारलेल्या आणि मागसलेल्या भाषांतून अद्वैत तत्त्वज्ञानाचे ग्रंथ नाहींत इतके आपल्याकडे संस्कृतांत आणि मराठींत आहेत. संस्कृतापुरतें हें विधान जगमान्य झालेलें आहे आणि मराठीपुरतें मान्य होण्याच्या मार्गांत आहे. ज्या परस्थांच्या नजरेला श्रीमत् ज्ञानेश्वरी आणि श्रीमत् दासबोध हे ग्रंथ पडतात त्यांना त्या ग्रंथांचें वेड लागल्याचें आम्हांस ठाऊक आहे. उपनिषदांतील तत्त्वज्ञान समजावें म्हणून जसें संस्कृत शिकावें असें परभाषेच्या लोकांना वाटतें तसें ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास यांचे ग्रंथ समजावे म्हणून मराठी शिकावें अशी बुद्धि परप्रांतीयांत हळुहळु प्रादुर्भूत होऊं लागली आहे, हें मी पहात आहे. ही संस्कृतांतील आणि मराठींतील अद्वैत ग्रंथांची संपत्ति इतकी विपुल आहे कीं, ती सारी पूर्ण शंभर वर्षांच्या एका आयुष्यांत पाहून हि होणार नाहीं. म्हणून प्राक्तनानुसार ज्याच्या हातीं जो ग्रंथ पडेल तो च त्यानें आपल्या हृदयाशीं धरावा, त्यांतील तत्त्वज्ञान समजून घ्यावें, तें आत्मसात करावें आणि जन्माचें सार्थक करावें. मग तो ग्रंथ संस्कृत असो किंवा प्राकृत असो. आम्हां श्रीसमर्थसांप्रदायिकांना समर्थवाङ्मय च पुष्कळ आहे. संस्कृतांत त्याहून निराळें कांहीं नाहीं. त्यांच्या वाङ्मयांतील कोणतें हि लहान मोठें प्रकरण आम्हांस उद्धरून नेऊं शकेल. फार काय सांगावें, मनाचे अवघे २०५ श्लोक जवळ राहूं दिले तर एकादा जन्मभर एकांतवासांत मौन धारण करून बसण्यास तयार होईल. इतकें सामर्थ्य त्या अवघ्या २०५ श्लोकांत आहे, मग सारें च समर्थ-वाङ्मय अहोरात्र उशाशीं बाळगावयास सांपडलें तर त्यास आणखी काय पाहिजे असें वाटणार आहे? सातव्या दशकाच्या नवव्या समासांत उगीच नाहीं श्रीसमर्थांनीं अद्वैत ग्रंथांची इतकी प्रशंसा केली! अलिकडे कित्येकांना ती अतिशयोक्ति वाटते. त्यांना वाटूं द्या आणि त्यांना आपल्या आवडीच्या वाङ्मयांत यथेच्छ विहार करूं द्या. इतरांनीं परमार्थासाठीं ज्ञानेश्वरांची भावार्थ-दीपिका, एकनाथांचें भागवत, तुकारामांचे अभंग आणि समर्थांचा दासबोध

यांचा च किंवा यांपैकीं कोणत्या हि एका ग्रंथाचा सारखा निदिध्यास घ्यावा. त्यांत हि एकाद्यास श्रीगुरुचरणापाशीं बसून अद्वैतचर्चा श्रवण करण्यास मिळाली, तर त्यासारखें दुसरें भाग्य नाहीं.

जेथें संशय तुटती । होये आशंका निवृत्ती ।
अद्वैतग्रन्थ परमार्थी । श्रवण करावे ॥ ७-९-५

जो मोक्षाचा अधिकारी । तो परमार्थपंथ धरी ।
प्रीति लागली अंतरीं । अद्वैतग्रन्थाची ॥ ६

जेणें सांडिला इहलोक । जो परलोकींचा साधक ।
तेणें पाहावा विवेक । अद्वैतशास्त्रीं ॥ ७

आत्मज्ञानी येकचित्त । तेणें पाहाणें अद्वैत ।
येकांत स्थळीं निवांत । समाधान ॥ २७

बहुत प्रकारें पाहातां । ग्रंथ नाहीं अद्वैतापरता ।
परमार्थास तत्त्वता । तारूं च कीं ॥ २८

इतर जे प्रपंचिक । हास्य विनोद नवरसिक ।
हित नव्हे तें पुस्तक । परमार्थासी ॥ २९

जेणें परमार्थ वाढे । आंगीं अनुताप चढे ।
भक्ति साधन आवडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३०

परंतु

जेथें नुपजे विरक्ती भक्ती । तो ग्रंथ चि नव्हे ॥ ३५

ती केवळ करमणूक होय. ती करमणूक करून घेणारांची संख्या मोठी असणार हें उघड आहे. प्रभुकृपेला पात्र झालेले असतील तेवढे च अद्वैताकडे वळतील.

अद्वैतचर्चा अति श्लाघ्यवाणी ।
सांडूं नका रे वदली पुराणीं ।
अद्वैतशास्त्रीं ठेवा प्रभूचा ।
अलभ्य हा रे सकळांसि कैचा ॥ करुणा ६२-७

## ( तीन ) नित्य नियम

कर्मे कोणतीं करावीं, या प्रश्नाच्या उत्तरांतील तिसरी बाब म्हणजे नित्य आचरावयाचे कांहीं नियम अवश्य पाहिजेत. नित्य नियमांत नऊ दहा

गोष्टींचा अंतर्भाव होतो : (१) एकांतांत एकाग्र चित्तानें उपास्याचें ध्यान करावें,

**उपासनामूर्तिध्यानीं । अथवा आत्मानुसंधानीं ।**
**नाहीं तरी श्रवणमननीं । निरंतर ॥ १४-७-१६**

असा काळ जावा, (२) सांग मानसपूजा करावी, (३) नेमलेला असेल तो जप करावा. 'नेमलेला असेल तो' असें कां म्हणावें ? नेमलेला आहे च. स्वत: श्रीसमर्थांनीं एका ठिकाणीं मोघम व दुसऱ्या एका ठिकाणीं उघडपणें जपाचा मंत्र सांगितला आहे व तो कसा कोठें आणि केव्हां जपावा, याविषयीं स्पष्ट सूचना देऊन ठेवल्या आहेत, त्यांचा विचार आपण अन्य प्रसंगीं करूं. (४) सूर्याला नमस्कार घालावे, (५) मारुतीचें दर्शन घ्यावें, (६) नियमित ग्रन्थावलोकन करावें, (७) वाचल्याचें मनन करावें, (८) सद्गुरु भजनापरतें कांहीं । मोक्षदायक दुसरें नाहीं ॥ हें जाणून प्रेमभरें सद्गुरुभजन करावें, (९) सारखा निदिध्यास घ्यावा आणि (१०) मुखांत अखंड नाम असावें.

नामस्मरणावर सर्व च सत्पुरुषांनीं अति भर दिलेला असतो. श्रीसमर्थ-वाङ्मयांत तर शेकडों—नव्हे—हजारों ठिकाणीं नामस्मरणाचें महत्त्व वर्णिलेलें आढळेल. इतकें सोपें आणि अत्यंत परिणामकारक साधन दुसरें कोणतें आहे ?

**साधन हें बरवें सकळ जनीं । साधन हें बरवें ॥** ध्रु० पू. १०
**नामें महादोष जाती । पुढें संताची संगती जनीं ॥ १**
**नामें होये चित्तशुद्धी । नामें होये दृढबुद्धी जनीं ॥ २**
**रामदास सांगे खूण । नाम सिद्धाचें साधन ॥ ३**

या साधनाचें फळ फार मोठें आहे.

**जपे रे मना राम राम जपे ॥** ध्रु० गि. ६७
**जपतां नाम पुरती काम । काळ न पाहे कोपें रे ॥ १**
**संकट वारी दुरित निवारी । जळती महा पापें रे ॥ २**
**गिरिकंदरें वनें अघोरें । सिणसी करितां तपें रे ॥ ३**
**म्हणे दास जन हें चि हें साधन । बहु गोड बहु सोपें रे ॥ ४**

यापेक्षां हि दुसऱ्या एका पदांत पारलौकिक फळाबरोबर फार मोठें ऐहिक हि फळ सांगितलें आहे.

**नाम चि कारण रे महा भये। नामें निवारण रे॥** ध्रु० पू. ९
**नाना संकटीं निर्वाणीं। युध्यकाळ समरंगणीं॥ १**
**दुःख संसारीचें जना। अथवा येमाची यातना॥ २**
**रामीरामदास म्हणे। गर्भवास येणें जाणें॥ ३**

साधन इतकें सोपें, पण त्याचें फळ इतकें मोठें, म्हणून कदाचित् कोणी या साधनाविषयीं साशंक होईल, यासाठीं एका पदांत त्याच्या फलप्राप्तीचीं श्रीसमर्थांनीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. तीं आपण पाहूं म्हणा ! पण, प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें च उदाहरण आपल्यापुढें असतां, या साधनावर आमचा विश्वास बसण्याला आम्हांस दुसऱ्यांच्या दाखल्यांची काय जरुरी आहे ?

**नामामध्यें उत्तम रामनाम रे। रामनामें तुटतो भवभ्रम रे।**
**नासे तम सदा सुखसंभ्रम रे। मोक्षपंथा जावया अनुक्रम रे॥** ध्रु. गि. ९०
**वीष घेतां शंकरा श्रम जाला रे। बहुविध उपाय तेणें केला रे।**
**केला परि सर्व हि वेर्थ गेला रे। रामनामें प्रचीतीनें निवाला रे॥ १**
**वाल्हा कोळी पातकी भूमंडळीं रे। अपसव्य नामानें लावी टाळी रे।**
**तत्काळ चि पातकां जाली होळी रे। रामकथा विख्यात तिही ताळीं रे। २**
**शुकासाठीं कुंटणी रामवाणी रे। उदंड चि महिमा तो पुराणीं रे।**
**रामनाम उत्तम पुण्यखाणी रे। अंतकाळीं चुकवी ताणाताणी रे॥ ३**
**रामदास तो सांगतो उदास रे। रात्रिदिवस धरावा निजध्यास रे।**
**कोण्ही येकें हा करावा अभ्यास रे। फळद्रूप होताहे विश्वास रे॥ ४**

'कोण्ही येकें' असें कां म्हणता, महाराज ? आपण प्रत्येकास च तशी आज्ञा करावी. आपल्यावर अविश्वास करील, आपल्या आज्ञेचें उल्लंघन करील, असा कोण पतित आहे? 'कोण्ही येकें' ऐवजीं 'प्रत्येकानें' असा पाठ मी सुचवीन. प्रत्येक समर्थभक्तानें हा अभ्यास सतत ठेवला पाहिजे. ज्याला हा अभ्यास नसेल, तो सांप्रदायिक तरी कसा मानावयाचा ?

नामस्मरणाच्या गुणगौरवाला अंत नाहीं. 'सगुणध्यान' प्रकरणाचा शेवट करतांना श्रीसमर्थांनीं, जणूं, शापवाणी च उच्चारली आहे.

**हो कां ज्ञाते विरक्त भक्त। हो कां साधु जीवन्मुक्त।**
**हो कां भाविक सावडे भक्त। नामेंवीण वृथा॥** सगुण० ११२

सकळांमध्यें थोर । तो नाम जपे शंकर ।
तेथें मानव तें किंकर । बापुडें किती ॥ ११४

नामें होय चित्तशुद्धी । नामें तुटे देहबुद्धी ।
नामें होय कार्यसिद्धी । निजध्यासें ॥ ११५

नामें स्वहित फावे । नामें निश्चयो दृढावे ।
नामस्मरणें सीघ्र पावे । देवाधिदेव ॥ ११६

ऐसें हें रामनाम । परम गुह्य विश्रामधाम ।
मथून काढिलें वर्म । शतकोटीचें ॥ ११७

श्रोत्यांचें लक्ष वेधून घेऊन बजावून सांगतात :

सावध ऐका श्रोते जन । परम गुह्य माहां गहन ।
नाममात्रें होती दहन । पापरासी ॥ ११८

येदर्थीं संशयो धरी । तो माहां पापी दुराचारी ।
तयास प्राप्त येमपुरी । विकल्पें होये ॥ ११९

ही शापवाणी ऐकून तरी प्रत्येकानें शुद्धीवर आलें पाहिजे; असो. असे हे दहा नियम नित्य पाळावयाचे आहेत. सर्व सत्पुरुषांचे अनुभवाचे बोल बाजूस सारून कोणी हि स्वतःच्या शहाणपणाच्या घमेंडींत किंवा कसल्या हि भ्रमांत न राहतां हे नियम श्रद्धापूर्वक सतत पाळले तर श्रीसद्गुरुकृपा झाल्यावांचून राहणार नाहीं, असें श्रीसमर्थांचें आश्वासन आहे.

## ( ३ ) पण कर्मांत च गुरफटून हि जाऊं नये

आमरण कर्मं केलीं पाहिजेत हें जरी खरें असलें, तरी कर्मांत च सारखें गुरफटून हि रहावयाचें नाहीं. आरंभ कर्मापासून करून शेवट ज्ञानांत झाला पाहिजे, इकडे अवश्य लक्ष पाहिजे. कर्मठांचें बहुधा तसें नसतें. केवळ कर्म करीत च राहणें हें कांहीं अंतिम ध्येय नव्हे. कर्मापाशीं च मुक्काम करावयाचा नसतो. कर्म करीत च मरावयाचें नसतें. कर्म करणें ही केवळ पहिली पायरी आहे. वर सांगितलेल्या कर्माच्या दहा बाबी, वाटल्यास, तितक्या पायऱ्या मानाव्या. त्यावरून चढून जाऊन सद्गुरुपद म्हणजे च ब्रह्मपद गांठावयाचें असतें.

**उपासना कर्म हें आधीं पाळावें ।**
**मग सांभाळावें ब्रह्मज्ञान** ॥ स्फु. ओ. ६–११

श्रीसमर्थवाङ्मयांत कोठें कोठें कर्माचा निषेध केलेला आढळतो. तो पाहून क्षणभर चित्त घोटाळ्यांत पडतें. पण थोडा विचार केला म्हणजे कळतें कीं, तो केवळ कर्मं करण्याचा व त्यांत च सार्थकता मानून राहण्याचा निषेध असतो. याचें एक ठळक उदाहरण म्हणून १०० वा अभंग पाहण्यासारखा आहे. उपास करून पोट भरत नसतें, प्रजा धुंडाळून राजाची गांठ पडत नसते, निर्धनाच्या संगतींत राहून द्रव्यप्राप्ति होत नसते, इत्यादि दृष्टान्त देऊन श्रीसमर्थ म्हणतात, तद्वत्

**ब्रह्म साधावया कर्ममार्गें गेला ।**
**तंव कर्में केला कासावीस** ॥ स्फु. ओ. १००–४

व्यथा एक आणि औषध अगदीं निराळें, किंबहुना उलटें च, तशासारखें हें होत आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, कर्माची मुळींच आवश्यकता नाहीं. कर्म करीत करीत प्रचीति आली पाहिजे.

कर्म कांहीं सर्वस्व नव्हे, एवढा च यांतून बोध घ्यावयाचा. एक जण मरे तों कर्म करीत च राहिला; ज्ञानापर्यंत जाऊन पोंचला च नाहीं आणि दुसरा शेंडी उपटून, जानवें तोडून, भ्रष्टाकार माजवीत च राहिला, तर ज्ञानाच्या दृष्टीनें या दोघांची हि एक च गत होय.

**कर्म कचाट करीत चि मेला ।**
**नांतरि भ्रष्ट अनर्गळ जाला ।**
**दोघ हि येक पदाप्रति जाती ।**
**ज्ञानरहीत सदा लथ खाती** ॥ क. १८६–३

याचें तात्पर्य सरळ आहे. ज्ञानाचा टप्पा गांठला पाहिजे, प्रचीति आली पाहिजे, नाहीं तर कर्माचा सारा खटाटोप व्यर्थ जातो. कर्म करीत असतां हि ध्येयावर अचल दृष्टि असली पाहिजे.

**प्रचीतीविण जें केलें । तें तें अवघें वेर्थ गेलें ।**
**प्राणी कष्टकष्टीं चि मेलें । कर्मकचाटें** ॥ १८–८–२०
**कर्मावेगळें न व्हावें । तरी देवास कासया भजावें ।**
**विवेकी जाणती स्वभावें । मूर्ख नेणे** ॥ २१

## (४) कर्में करावयाचीं तीं निष्ठापूर्वक केलीं पाहिजेत

आपणांस कर्मांत च गुरफटून रहावयाचें नाहीं हें जरी खरें, तरी कर्में जीं करावयाचीं तीं अत्यंत निष्ठापूर्वक केलीं पाहिजेत, नाहीं तर त्यांचें फळ जें ब्रह्मपदप्राप्ति तें पदरीं पडणार नाहीं. कर्माचरणांत दंभ नसावा, त्यांत लोकेषणेचा दुरून हि संपर्क नसावा. या लोकेषणेला फार भ्यायलें पाहिजे. तिनें मोठमोठ्यांना भुरळ पाडून रसातळास पोंचविल्याचीं अनेक उदाहरणें आपण पाहिलीं आहेत व प्रत्यहीं पहात असतो. स्नानानें जसें शरीर बाह्यत: निर्मळ होतें, तसें संध्यादि कर्में निष्ठापूर्वक केल्यानें अंत:करण निर्मळ होतें व अशा निर्मळ अंत:करणांत च वास करावा, असें श्रीसमर्थांच्या मनांत येईल. स्वत: श्रीसमर्थ काय सांगतात तें ऐका. माझ्या मनाचा ओढा श्रीसमर्थांचे शब्द माझ्या कानीं पडावे व मी ते वाचकांस ऐकवावे, इकडे असतो; पण यावर कांहीं जणांचा आक्षेप असतो कीं, यांत तुमचें काय असतें ? मी वारंवार कबूल करीत आलों आहे कीं, यांत माझें कांहीं नसतें. श्रीसमर्थांच्या च अन्नावर मी पोसला जात आहे व तुम्हांस हि त्या च अन्नावर धष्टपुष्ट करावें, असा माझा मनोदय असतो. समर्थ सांगतात :

**निष्ठावंत ज्ञान पूर्ण समाधान। मग संध्यास्नान सफळीत॥** स्फु. ओ. २३ –७
**सफळीत संध्या संदेह नसतां। निसंदेह होतां समाधान॥ ८**
**समाधान नाहीं स्नानसंध्या काइ। लोकिकाचे ठाईं लोकलाज॥ ९**
**लोकलाज सर्व लोकीक चि केला। देव दुऱ्हावला वरपंगें॥ १०**
**वरपंगें देव कदा सांपडेना। निष्ठेचा घडेना भक्तिभाव॥ ११**
**भक्ति ते भावेची भाव तो जायाचा। कर्म लोकिकाचा खटाटोप॥ १२**
**खटाटोपें कदा देव पाविजेना। निश्चयो घडेना शाश्वताचा॥ १३**
**शाश्वताचा शोध अंतरीं असतां। सर्व हि पाहातां निरार्थक॥ १४**
**निरार्थक तीर्थें निरार्थक व्रतें। दास म्हणे जेथें ज्ञान नाहीं॥ १५**

याच्यापुढें येणारा महत्त्वाचा जो दुसरा भाग – सांप्रदायिक लक्षणांचा – त्याकडे सारखें लक्ष ठेवून च आपलें प्रतिपादन पहिल्यापासून चाललें आहे. तीं लक्षणें बीजरूपानें पूर्व तयारींत असणार च. बीजांत जसा वृक्ष असतो, तद्वत् आमच्या पूर्व तयारींत पुढील लक्षणें आहेत. त्यामुळें या प्रतिपादनांत पुढील

भागांतील विषय मधून मधून डोकावत आहेत; असो. निष्ठापूर्वक भक्तिभावानें स्नानसंध्यादि कर्मे घडलीं पाहिजेत. त्यावांचून ज्ञान नाहीं व ज्ञानावांचून समाधान नाहीं. भक्ति समजणें अगदीं सोपें आहे, फक्त खरी भक्ति घडणें अति कठीण आहे. कोणी हि सांगेल, भक्ति नवविधा आहे, श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं इत्यादि श्लोक म्हणून हि दाखवील, पण जी भक्ति श्रीसमर्थांनीं श्रीरामाची केली, श्रीतुकाराम महाराजांनीं श्रीविठ्ठलाची केली, किंवा कल्याणादिकांनीं श्रीसद्गुरूची केली, ती भक्ति समजणें कठीण, कोणा हि वाग्दुर्बलानें बोलून दाखविणें त्याहून कठीण व प्रत्यक्ष करणें तर सर्वांत कठीण. अशा स्थितींत मजसारख्यास इतकें च म्हणतां येईल कीं, श्रीसमर्थादिकांचीं वचनें पाहून प्रत्येकानें प्राक्तनानुसार साधेल तशी भक्ति केली पाहिजे.

आपण जी भक्ति करणार ती आणखी कोणास समजो वा न समजो, खरें म्हणजे न च समजो, ती देवास समजली म्हणजे पुरें आहे. देवाला समजण्यास कठीण जात नाहीं. वरपांग भाव आणि खरा भाव इतरांपासून आपण लपवून ठेवूं शकूं, देवापासून लपवून ठेवतां येणार नाहीं. श्रीसमर्थ निश्चयपूर्वक सांगत आहेत, अविश्वास न करावा.

**जया अंतरीं भाव होईल जैसा ।**
**तयालागि तो देव पावेल तैसा ।**
**यदर्थीं कदा संशयोही असेना ।**
**अभावें तरी देव तो पालटेना ॥** रामायण १३–८१

**देव हा करुणाकर । न म्हणे लाहान थोर ।**
**जाणतो अंतर । भाविकाचें रे ॥** गि. ४१

या सिद्धांताचीं पुराणप्रसिद्ध उदाहरणें अनेक आहेत. त्यांतलें आपल्याला एक पुरें होईल.

**कृपाळुवें रघुवीरें । खादलीं भिल्लीचीं बोरें ।**
**उच्छिष्ट आदरें । अंगीकारी रे ॥** ध्रु० गि. ४३

**वैभवीं चाड नाहीं । देवातें भाव चि गोड ।**
**पुरवितो कोड । अनन्याचे रे ॥ १**

**दुल्लभ ब्रह्मादिकासी । सुल्लभ वानरासी ।**
**काय तयापासीं । भावेंविण रे ॥ २**

रामी रामदास म्हणे। देव हा दयाळुपणें।
उठवितो रणें। वानराचीं रे ॥ ३

श्रीसमर्थवचनांवर विश्वास टाकून अनन्य भक्तिभावानें कर्में आचरीत असावें, एवढें च निष्ठावंतांचें काम आहे. श्रीसमर्थांची कृपा संपादन करण्याचा दुसरा मार्ग नाहीं.

## ( ५ ) ज्ञान्यानें हि कर्में वर्ज करूं नयेत

ज्ञान म्हणजे सायुज्यता ( पं. यो. २-१२ ), ज्ञान म्हणजे आत्मनिवेदन ( मा. पं. ३-५ ), ज्ञान म्हणजे 'अहंब्रह्मास्मि' चा साक्षात्कार ( ५-६ ). हें ज्ञान ज्याला झालें तो ज्ञानी. अशा ज्ञान्यानें हि कर्में सोडूं नयेत. हा सिद्धान्त मान्य करतांना कोणाच्या हि मनाला शंका वाटण्याचें कारण नाहीं. लोकमान्य आणि श्रीसमर्थ या उभयतांची शिकवण आणि चरित्रें हीं या सिद्धान्ताला पोषक आहेत. गीतारहस्याहून दासबोधरहस्य फारसें निराळें नाहीं. दासबोधाचा गीतारहस्याला विरोध नाहीं. सातव्या दशकाच्या सहाव्या समासांत दासबोधरहस्य सामावलें आहे. पुढील भागांत प्रसंगोपात त्याकडे आपलें लक्ष जाईल च. लोकमान्य आणि श्रीसमर्थ या उभयतां महापुरुषांचीं चरित्रें या सिद्धान्ताचें उत्कृष्ट समर्थन करीत आहेत. या उभयतांचीं चरित्रें डोळ्यापुढें आणावीं आणि निशंकपणें म्हणावें कीं, कोणी किती हि मोठा ज्ञानी आणि साक्षात्कारी झाला तरी त्यानें कर्माचरण सोडलें च पाहिजे, असें नाहीं.

श्रीसमर्थांनी कर्में कां केलीं ? चांगलें स्वतःच्या संसारांतून निसटले असतां सर्व जगाचा संसार माथीं धारण कां केला ? सर्व देशभर संचार करण्याचें काय कारण होतें ? ठिकठिकाणीं मठ स्थापन करण्याची यातायात कां केली ? चाफळास नवीन च देवालय उभारून श्रीरामाची स्थापना करण्याची काय आवश्यकता भासली ? गांवोगांवीं मारुती स्थापिले ते कां ? सर्वत्र उत्सव सुरू केले ते कशासाठीं ? हजारों कां लाखों कोण जाणे, पण एवढा मोठा शिष्यांचा समुदाय कां केला ? कोणता हेतु मनांत धरून धूर्त, तार्किक, विचक्षण अशा तीक्ष्ण बुद्धीच्या शिष्यांना देशाच्या चार हि दिशांना संचारार्थ पाठविले ? श्रीशिवरायाला आपला बहिश्चर प्राण कां मानले ? त्यांचें चरित्र आठवून त्याहून विशेष करून दाखवावें असें प्रोत्साहन श्रीसंभाजी-

महाराजांना कां दिलें ? थोडक्यांत म्हणजे त्यांनीं साऱ्या विश्वाच्या कल्याणाची चिंता आमरण वाहिली ती कां ? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें एका शब्दांत द्यावयाचीं तर 'जगदुद्धारार्थ' असें म्हणतां येईल. आणि म्हणून आपण हि निर्धास्तपणें सिद्धान्त प्रतिपादन करूं शकूं कीं, कोणी किती हि मोठा ज्ञानी झाला, तरी त्यानें कर्में सोडतां कामा नये, जगाच्या कल्याणासाठीं, लोकांना मार्ग लागावा, सद्बुद्धि सुचावी, सुस्थिति प्राप्त व्हावी, 'सृष्टि सुखें चि भरावी,' 'अवघे चि सुखी असावे,' म्हणून त्यानें उपाधी विस्तारल्या पाहिजेत आणि स्वतःच्या आचरणानें लोकांना धडा घालून दिला पाहिजे. ज्याला कर्में करावयाचीं नसतील त्यानें जगाच्या नजरेस सुद्धां पडूं नये, मग लोकांना उपदेश करणें दूर च राहिलें, त्यानें हिमालयांत निघून जावें. क्रियाभ्रष्ट ज्ञानी कदाचित् स्वतः उद्धरून जात असेल, पण तो लोकांत वावरूं लागला आणि स्वतःला ज्ञान नसतां हि लोक त्याचें च अनुकरण करूं लागले तर ते मात्र अधोगतीला जात असतील. यासाठीं ज्ञान्यानें हि कर्में वर्ज करूं नयेत, हें च श्रेयस्कर होय.

**उद्धरती जन करितां साधन । क्रियेचें बंधन आचरतां ॥** शत ३–७५
**आचरतां साधु जना होये बोधु । लागतसे वेधु भक्तिभावें ॥ ७६**
**भक्तिभावें देवप्रतिष्ठापूजन । कथा निरूपण मोहछाव ॥ ७७**
**मोहछाव साधुभक्तीचें लक्षण । करी तीर्थाटण आदरेंसीं ॥ ७८**
**आदरेंसीं विधी करणें उपाधी । लोकिकीं सुबुद्धी लागावया ॥ ७९**
**लागावया भावें सत्क्रिया भजन । करीतो सज्जन मुक्तिदाता ॥ ८०**
**मुक्तिदाता साधु तो चि तो जाणावा । जेणें संपादावा लोकाचार ॥ ८१**
**लोकाचार करी तो जना उद्धरी । ज्ञाता अनाचारी कामा नये ॥ ८२**
**नये नये निंदूं जनीं जनार्दन । म्हणोनि सज्जन क्रियावंत ॥ ८३**
**क्रियावंत साधु विरक्त विवेकी । तो चि तो लोकिकीं मान्य आहे ॥ ८४**
**मान्यता सत्क्रिया लोकीक सोडील । तो चि उद्धरेल जन नाहीं ॥ ८५**
**जना नाहीं मान्य तो सर्वअमान्य । म्हणोनियां धन्य क्रियावंत ॥ ८६**
**क्रियाभ्रष्ट तेणें लोकिकां सोडावें । आणि वसवावें ब्रह्मारण्य ॥ ८७**
**ब्रह्मारण्य सेवी तो साधु येकला । जना नाहीं आला उपेगासी ॥ ८८**
**उपेगासी येणें जना पूर्णपणें । तयाचीं लक्षणें निरोपीलीं ॥ ८९**

हीं 'तयाचीं लक्षणें निरोपिलीं' म्हणजे कोणाचीं? स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाचीं? वरील उताऱ्यांतील ७५ ते ८१ कडव्यांत जीं दहा पंधरा लक्षणें सांगितलीं आहेत, तीं सांगतांना श्रीसमर्थांचें लक्ष स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाकडे तरी गेलें होतें काय? ७७ व्या कडव्यांतील देवप्रतिष्ठापूजन, कथा, निरूपण, महोत्सव यांचा संबंध उघड उघड चाफळास श्रीरामाची स्थापना करून श्रीसमर्थांनीं जो उत्सव सुरू केला, त्याच्याशीं आहे. नुसती मूर्तीची प्राणप्रतिष्ठा नव्हे, तर त्या मूर्तीचें पूजन म्हटलें आहे, आणि श्रीसमर्थचरित्रांत ही गोष्ट नमूद आहे कीं, श्रीसमर्थ स्वतः मूर्तीची पूजा हि करीत. असले हे श्रीसमर्थचरित्राशीं जाऊन भिडणारे उल्लेख पाहिले म्हणजे कोणाला हि अत्यंत कौतुक वाटून आनंद होणें स्वाभाविक आहे. मला नेहमीं च ही मोठी अपूर्वता वाटत असते कीं, श्रीसमर्थांच्या वाङ्मयांत इथून तिथून सर्वत्र श्रीसमर्थ च स्वतः नटून राहिले असावेत. त्यांचें संपूर्ण वाङ्मय म्हणजे त्यांचें आत्मचरित्र च होय, हें त्रिवार सत्य आहे. श्रीसमर्थांना पहावयाचें तर त्यांना त्यांच्या वाङ्मयांत च पाहिलें पाहिजे, हा माझा आग्रह दिवसानुदिवस दृढ होत चालला आहे. विचार, उच्चार आणि आचार यांच्यांत इतकी एकवाक्यता दुसऱ्या कोणाच्या हि चरित्रांत क्वचित् च आढळून येत असेल.

वाटल्यास, या ठिकाणीं हें विषयांतर मानावें, कारण तूर्त आपणांस येथें इतकें च पहावयाचें आहे कीं, ज्ञानोत्तर हि कर्म आचरणें विशेष श्रेयस्कर होय.

**जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानी। निःसंदेह मनीं सर्वकाळ ॥** स्फु. ओ. २३७
**मिथ्या देहेभान प्रारब्धा आधेन। राखे समाधान पूर्णपणें ॥ २**
**आवडीनें करी कर्म उपासना। सर्वकाळ ध्यानारूढ मन ॥ ३**
**जाणे ब्रह्मज्ञान स्वयें उदासीन। मानितो वमन द्रव्यदारा ॥ ४**
**पदार्थाची हाणी होतां नये काणी। जयाची करणी बोला ऐसी ॥ ५**
**दास म्हणे धन्य सर्वांसी जो मान्य। जयाचा अनन्य समुदाव ॥ ६**

या लहानशा अभंगांत (१) पूर्ण समाधान, (२) निःसंदेहता, (३) देहाची प्रारब्धाधीनता, (४) कर्मोपासनारति, (५) मनाची अखंडध्यानारूढ स्थिति, (६) उदासीनता, (७) द्रव्यदारेविषयीं पराङ्मुखता, (८) लाभा-

लाभाविषयीं समभाव, (९) बोले तैसा चाले, (१०) लोकमान्यता, (११) अनुयायी वर्गाची अनन्यता, असे ज्ञानी पुरुषाचे अकरा गुण गोविले आहेत. यांत हि वाचकांस श्रीसमर्थांचा च साक्षात्कार होणार आहे, पण प्रस्तुत विवेचनाच्या दृष्टीनें 'आवडीनें करी कर्म उपासना' या गुणाकडे त्यांनीं मुद्दाम लक्ष पुरवावें.

निस्पृहलक्षणांच्या समासांत श्रीसमर्थांनीं आपल्या महंतशिष्यांना ज्या शंभर सूचना देऊन ठेवल्या आहेत, त्यांत हि

(१) आचारभ्रष्ट होऊं नये। १४-१-७
(२) शुद्धमार्ग सोडूं नये। १६
(३) नित्य नेम सांडूं नये। २२
(४) कर्ममार्ग सांडूं नये। २७
(५) साधन भजन खंडूं नये। २७
(६) भजनमार्ग मोडूं नये। ६१
(७) सगुणभक्ति सोडूं नये। ६२
(८) वर्णसंकर करूं नये। ७६

इत्यादि अनेक सूचना, शुद्ध कर्ममार्गाविषयीं केलेल्या आहेत. आणखी किती करावयास पाहिजे होत्या? कर्ममार्गाविषयीं जेथें शिष्यांनीं इतकी दक्षता बाळगिली पाहिजे, तेथें गुरूवर जास्त च जबाबदारी येऊन पडते. गुरु तर

विशेष आचारें निर्मळ। स्वधर्माविषईं॥ ५-२-४६

असला पाहिजे. त्यानें स्थूळ क्रियेचें साधन सांभाळिलें पाहिजे. पूर्वारंभ प्रकरणांत श्रीसमर्थांनीं सद्गुरु ओळखण्याची जी खूण सांगितली आहे, तींत हि

क्रियेसहित ब्रह्मज्ञान।

हें एक लक्षण आहे च.

आणि या सर्वांपेक्षां हि, स्वतःस सर्व वर्णांचे गुरु समजणाऱ्या ब्राह्मणांनीं कर्माचरणाविषयीं अति दक्ष असावयास पाहिजे, हें काय सांगावयास पाहिजे? पण या ब्राह्मणांविषयीं त्या काळीं सुद्धां श्रीसमर्थांनीं जे दुःखोद्गार काढलेले सर्वत्र प्रसिद्ध आहेत (१४-७-२९ ते ४०) ते च आज हि तंतोतंत लागू पडण्यासारखी ब्राह्मणांची स्थिति आहे, याचें कोणास हि दुःख होईल.

## ( ६ ) नुसतें शब्दज्ञान फोल होय

**आचार उपासना सोडिती । ते भ्रष्ट अभक्त दिसती ।**
**जळो तयांची महंती । कोण पुसे ॥ ५-२-५६**

स्वतःस ज्ञानी म्हणवून घेऊन आचार आणि उपासना सोडणारांचा किती कठोर शब्दांत, श्रीसमर्थांनीं या ठिकाणीं निषेध केला आहे! आग लागो त्यांच्या मोठेपणाला, जे क्रियाकर्म सोडून समाजांत भ्रष्टाकर माजवितात! यावरून स्नानसंध्यादि कर्माचरणाविषयीं श्रीसमर्थांचा किती कटाक्ष असे, तो दिसून येत आहे. ज्याला विमल ज्ञान झालें आहे, तो शुद्ध क्रिया कधीं च सोडणार नाहीं. ज्ञानी म्हणवून घेऊन जो गळ्यांतलें जानवें तोडतो, त्याला भ्रम झाला आहे, म्हणून समजावें. त्याला शुद्ध ज्ञान झालेलें नसतें, केवळ शब्दज्ञान झालेलें असतें. क्रिया ही शुद्ध ज्ञानाची कसोटी च समजावी. क्रियेवांचून नुसतें शब्दज्ञान फोल होय. पोपटाची लटपटपंची आणि शब्दज्ञान्याचें तर्कट, दोन्हीं सारखीं च. क्रिया असली आणि शब्दज्ञान नसलें, तरी एक वेळ चालेल. परंतु घरोघरीं नुसते शब्दज्ञानी झाले आणि घरीं अथवा दारीं ताम्हनपळी जन्मांत पाहण्यांत न आल्यामुळें घरांतील मुलें ताम्हनाला बशी आणि पळीला चमचा समजूं लागलीं, तर त्या कोरड्या शब्दज्ञानानें सार्थक कसें व्हावें? आतां च तेवढे क्रियाशून्य शब्दज्ञानी जन्मास आले आहेत आणि त्या काळीं नव्हते, असें समर्थांच्या उद्गारावरून दिसत नाहीं. त्या काळीं समर्थांनीं आपल्या शिष्यांना जो उपदेश केला तो आज हि आपण मानला पाहिजे.

**शब्दज्ञान उदंड बोलती । परी क्रिया कोण्ही च न करिती ।**
**तैशा तूं हि गा व्युत्पत्ती । करूं नको ॥ ए. १५-५७**

**शब्दज्ञान व्यर्थ चि गाथा । येथें आलें क्रियेच्या माथा ।**
**क्रिया न करितां सर्वथा । फोल चि अवघें ॥ ५८**

आधीं क्रिया करून दाखवावी, प्रचीति घ्यावी आणि मग च बोलावें. अशा च बोलण्याला किंमत असते.

**क्रियेविण शब्दज्ञान । तें चि श्वानाचें वमन ।**
**भले तेथें अवलोकन । कदापी न करिती ॥ १२-१०-३०**

येथें आलें क्रियेच्या माथा। या च शब्दांत हा उपदेश आत्माराम या लघु काव्यांत हि श्रीसमर्थांनीं केलेला आहे.

**श्रवण आणि मनन। या ऐसें नाहीं साधन।**
**म्हणोनी हें नित्य नूतन। केलें पाहिजे॥** आत्मा० ४-५

**जैसें ग्रंथीं बोलिलें। तैसें चि स्वयें पाहिजे केलें।**
**येथें क्रियेच्या माथां आलें। निश्चितार्थें॥** ६

तर च श्रीसमर्थस्वरूप असे आत्माराम आणि दासबोध ग्रन्थ वाचण्याचा उपयोग. ग्रंथ वाचून शब्दज्ञान करून घेऊन समाजांत व्याख्यान करतां न आलें तरी चालेल, पण वाचलेलें थोडें तरी आचरणांत उतरलें पाहिजे.

**बरी स्नानसंध्या करी येकनिष्ठा।**

हा श्लोक समारंभांत म्हणून दाखवून बक्षिस मिळवितां न आलें तरी चालेल, पण प्रत्यहीं निष्ठेनें स्नानसंध्या घडली पाहिजे.

शब्दज्ञान म्हणजे आपण बोलतो त्याचा अर्थ न उमगतां गंभीरपणें बोलण्याची हातोटी. शब्दज्ञान म्हणजे न जिरलेलें अन्न. त्याच्या आधारावर आचार सोडणें हें पाखंड मत होय.

**शब्दीं सर्व आत्मा म्हणावें।**
**आणि आचार सांडुनी भलतें चि करावें।**
**तें पाषांड मत जाणावें।**
**विवेकी असेल तेणें॥** ए. १८-५८

पण असा विवेक फार थोड्यांत असतो. कोणत्या हि काळीं पाखंडमताचा च सुळसुळाट फार झालेला असतो व अशा पाखंडी शब्दज्ञान्यांच्या जाळ्यांत भोळेभाबडे तेव्हां च अडकले जातात. हे पाखंडी मोठे धूर्त असतात. त्यांचें शब्दज्ञान पाहून इतरांस भुरळ पडण्याचा फार संभव असतो. क्रियेपासून ते स्वतः चळलेले असतात आणि त्यांच्या शब्दज्ञानाला भाळलेले भाविक लोक त्यांच्या सारखें च वागूं लागतात आणि दोघे हि शुद्ध ज्ञानाला अंतरतात.

या पाखंडी लोकांजवळ अशी काय जादु असते कीं, जिच्या योगानें ते भोळ्या भाबड्यांना आपल्या नादीं लावतात ? जादु दुसरी कोणती च नसून

त्यांचें शाब्दिक पांडित्य आणि बंधनरहित वर्तन. पाखंड्याला बंधन कसलें च नसतें, ना मनाचें ना जनाचें, ना आगमाचें ना निगमाचें. मनसोक्त स्वेच्छाचार करण्याला त्याला पूर्ण मोकळीक असते आणि अनुयायांसह सरळ नरकांत जाऊन पडतां येतें. वास्तविक पाहतां बंधन, नियम, शिस्त, यांच्या वांचून कोणता च व्यवहार यशस्वी होत नसतो. राज्यांत कसलें च बंधन नसेल, तर असलें राज्य क्षणभर तरी टिकेल काय ? सामान्य दृष्टान्त कां ध्यानात ? घर मोकळें टाकून चालेल काय ? मुंजीबंधनावांचून द्विजत्व प्राप्त होईल काय ? फार काय, पण शरीराचा हि बंद ढळला तर चहुंकडे घाण होऊन फजिती होण्याला वेळ लागतो काय ? मग परमार्थ च तेवढा बंधनावांचून, साधना-वांचून, नित्य नियमावांचून, कर्माचरणावांचून कसा साधावा ?

> **परमार्थासी बोलिलें साधन । तें चि साधन मानिलें बंधन ।**
> **तरी मोकळेपणें पतन । सिद्ध चि आहे ॥** सप्त० ३–८
> **बंधनेंवीण जो प्राणी । त्याच्या संसाराची घाणी ।**
> **त्याचे घरीं घेतां पाणी । प्रशस्त न वटे ॥ ९**
> **पवित्रपणाचा कंटाळा । म्हणे मी असेन मोकळा ।**
> **मग त्या अपवित्रा वोंगळा । कोण पुसे ॥ १०**
> **मुक्त होवया कारणें । बोलिलीं नाना निरूपणें ।**
> **तें निरूपण त्यागणें । पुढें कैसें ॥ १२**
> **शास्त्राधार अवघा सोडिला । म्हणिजे प्राणी पाषांडी जाला ।**
> **मग कोण गती तयाला । कळत चि आहे ॥ १३**
> **याकारणें जे कोण्ही भले । ते निरूपणपंथें चि चालिले ।**
> **साधन करित चि गेले । भक्तिपंथें ॥ १५**
> **हें किती म्हणोनि सांगावें । ज्यासी जें रुचेल तें चि बरवें ।**
> **परी केल्या कर्माचें फळ भोगावें । लागेल पुढें ॥ १६**
> **ऐसें जाणोनि विवेकी । क्रिया करावी नेटकी ।**

येथें च हें प्रकरण संपवावें, नाहीं ? श्रीसमर्थांना किती शिणवावें ? आमच्या-साठीं त्यांनीं किती उरस्फोड करावी ?

केवळ शब्दज्ञानानें कोणी तरल्याचें उदाहरण नाहीं. क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे. केव्हां हि आणि कोणत्या हि अवस्थेंत क्रियाभ्रष्ट होऊं नये.

क्रियाभ्रष्ट ते नष्ट समजावे. श्रीसमर्थांना पुसावें. दुसऱ्या कोणाच्या नादीं लागूं नये.

**भला तो चि जो मुख्य आचार राखे।**
**गुरु देव लोकीक वेदांसि धाके।**
**करूं ये बरें कर्म जें तें करीतो।**
**महावाक्य तत्त्वादिकें वीवरीतो॥** क. ७७–३

**क्रियेवीण पाषांड तें नोबलावें।**
**क्रियेवीण थोतांड तें ही तजावें।**
**सदा सर्वदा भक्तिपंथें चि जावें।**
**सुपुत्रें बळें पूर्वजां उद्धरावें॥** क. ११८–१

श्रीसमर्थांनीं आपली आणखी किती काळजी करावी? महाराष्ट्र त्यांचा अखंड ऋणी होऊन राहील. पूर्वजांना उद्धरावें, यांत स्वतःचा उद्धार आला च. एऱ्हीं जो स्वतः उद्धरला नाहीं, ज्याला स्वतःचा आणि स्वतःबरोबर आपल्या समाजाचा आणि राष्ट्राचा उद्धार करतां आला नाहीं, तो पूर्वजांना काय उद्धरणार?

## (७) उपसंहार

तात्पर्य, क्रिया हें सर्व उद्धाराचें मूळ होय. निष्ठापूर्वक कर्में करावीं, पाखंडी शब्दज्ञान्यांच्या ज्ञानगाथेला भुलून त्यांच्या नादीं लागूं नये, श्रीसमर्थ-चरणीं भाव ठेवावा, ते आपली केव्हां हि उपेक्षा करणार नाहींत, हा विश्वास असूं द्यावा, भ्रमचक्रांत गुंतून पडलेलें जग आणि त्या च चक्रांत सांपडलेला समाज कांहीं हि करो, श्रीसमर्थांचे म्हणविणारांनीं तरी त्यांनीं प्रतिष्ठिलेल्या साधनमार्गाचा अवलंब करावा. तो पिपीलिकामार्ग असला तरी त्या च मार्गानें गेल्यास, हळुहळु कां होईना, तो साधकास शेवटपर्यंत नेऊन पोंचविल्याशिवाय राहणार नाहीं. याविषयीं संशय नसावा. भाव असूं द्यावा, पराकाष्ठेचा भाव असावा. आपल्या ठिकाणचा निग्रह आणि किंचित् धारिष्ट हीं त्यांच्या प्रत्ययास आलीं कीं, उलट मग ते आपल्या पाठीस लागून आपणांस चरणापाशीं ठाव देतील. तसें त्यांचें आश्वासन आहे. देव आणि गुरु यांत फरक मानूं नये. जैसा देव तैसा गुरु, असें शास्त्रांत आहे.

येका भावार्थासाठीं । देव लागे भक्तां पाठीं ।
भाव नसतां जगजेठी । प्राप्त नाहीं ॥ ए. ७–८

निग्रहनेमाचें बळ । असतां प्राप्ति तत्काळ ।
देहाशा करी डळमळ । तेणें निग्रह भ्रष्ट ॥ १३

जेथें निग्रहेंसीं धारिष्ट वसे । तेथें देव सन्निध चि असे ।
सोडी संशयाचें पिसें । येतद्विषईं ॥ १४

देह पडे कां देव जोडे । ऐसी हाव आंगीं जडे ।
तेणें गुणें वैराग्य चढे । माहा प्रबळ ॥ १७

देहपांग निःशेष भंगे । तेव्हां प्रातीसी वेळ न लगे ।
देव भक्तां पाठीं लागे । नाभी नाभी म्हणोनी ॥ १८

बाळक आपणासी रक्षूं नेणे । म्हणोनि मातेसी लागे रक्षणें ।
तें चि बाळक शाहाणें । होतां माता विसंबे ॥ १९

तैसा भक्त भगवंतीं प्रेमा । लाऊनि उलंघी देहसीमा ।
तयाचा सांभाळ आत्मयारामा । करणें घडे नेमस्त ॥ २०

इतकी आपली पूर्व तयारी झाल्यावर श्रीसमर्थ आपला अंगिकार करतील, अशी आशा करण्याला जागा होते. या पूर्व तयारींतील पहिल्या तीन क्रिया मानसिक आहेत. त्या क्रियांचा साक्षी ज्याचा तो. चवथ्या कर्माचरणांत मानसिक भाग मुळीं च नाहीं, असें नाहीं, पण विशेष भाग बाह्य, शारीरिक आहे. पण यांपैकीं कोणती हि क्रिया मानसिक असो वा शारीरिक असो, ती श्रीसमर्थांच्या नजरेंतून निसटूं शकत नाहीं. आपण जगाला फसवूं शकूं, श्रीसमर्थांना फसवूं शकणार नाहीं. त्यांना आपल्या सर्व अंतर्बाह्य भावना कळतात. तेव्हां कांहीं एक मागें राखून न ठेवतां अनन्य भावानें आपण आतां त्यांना शरण जाऊन त्यांची प्रार्थना करूं व चरणापाशीं ठाव मागूं.

## ( ६ ) सद्गुरुचरणासी । शरण । सद्गुरुचरणासी

( १ ) त्या काळच्या वृद्धतरुणांना चिंता—( २ ) अवताराची अपेक्षा, श्रीशिव-समर्थावतार—( ३ ) आज हि श्रीसमर्थ आहेत—( ४ ) ते च असें सांगून गेले—( ५ ) तरुणांनीं वेळेवर उमगावें—( ६ ) श्रीसमर्थांचा आधार घ्यावा—( ७ ) कल्याणांच्या मध्यस्थीनें श्रीसमर्थांच्या दारीं पुकारा.

**वाटे सकळ हि त्यजावें । कांहीं सार्थक करावें ।**
**तरी मज देवाधिदेवें । मार्गीं लाविजे ॥** ए. ७–५८

( १ ) हें सारें सोडून एक दिवस जावयाचें आहे, कोठें जावयाचें आहे आणि काय व्हावयाचें आहे, हें कांहीं ठाऊक नाहीं, हा विचार सतत मनांत घोळूं लागला, संसाराची असारता पटून मन विटलें, आयुष्याचीं इतकीं वर्षें निघून गेलीं, कांहींच साधन घडलें नाहीं, असा पश्चात्ताप वाटून स्नानसंध्येला लागला, म्हणजे पूर्व तयारी होऊन श्रीसमर्थचरणाजवळ जाऊन बसण्याचा अधिकार आला, असें समजावें. त्या काळीं तर विचारवंताचें मन उद्विग्न होऊन त्याला अनुताप वाटण्याला आणखी किती तरी भयंकर परिस्थिति कारणीभूत होत असली पाहिजे. त्या काळीं तर भोंवतालीं सर्वत्र धर्माचा उच्छेद चालला होता, देवालयें उध्वस्त होत होतीं, मूर्ति भंग पावत होत्या आणि सात्त्विक, विचारी मनाला हि अत्यंत संतप्त करून सोडणारी गोष्ट, म्हणजे स्त्रिया भ्रष्टविल्या जात होत्या ! ही स्थिति कशी पालटावी, कोणाला पुसावें, कोणाचे पाय धरावे, कोण धर्माचें रक्षण करील, अबलांच्या रक्षणार्थ कोण धांवून येईल, क्षुद्र ऐहिक लाभासाठीं आपण होऊन धर्मभ्रष्ट होणाऱ्या स्वार्थांधांना कोण ताळ्यावर आणील, इत्यादि तळमळीच्या विचारांनीं तत्कालीन जाणत्या स्वाभिमानी स्त्रीपुरुषांच्या मनांत निःसंशय काहूर माजत असलें पाहिजे.

( २ ) हें हि संभवतें कीं, वृद्धांना केवळ आपल्या एकट्या जीवाचें सार्थक कसें व्हावें, ही च एक तळमळ लागत असेल, तर तीबरोबर तरुणांना हरएक बाबतींत च राष्ट्राच्या सुस्थितीची विशेष चिंता वाटत असेल. तात्पर्य, वृद्ध आणि तरुण अशा सर्वांचें च चित्त त्या काळीं परमेश्वराकडे लागलें

असेल. गुरुकृपेवांचून जीवाचा उद्धार होणार नाहीं, म्हणून वृद्धांना सद्गुरूची अपेक्षा वाटूं लागली असेल, तर तरुणांना

अकस्मात धाडी आली । कांता बंदीं धरून नेली
वस्तभाव हि गेली । प्राणियाची ॥ ३-५-२८
तेणें दुःख जालें भारी । दीर्घ स्वरें रुदन करी ।
मनीं आठवे सुंदरी । गुणवंत ॥ २९
तव तिची वार्ता आली । तुमची कांता भ्रष्टली[1] ।
ऐकोनियां आंग घाली । पृथ्वीवरी ॥ ३०
सव्य अपसव्य लोळे । जळें पाझरती डोळे ।
आठवितां चित्त पोळे । दुःखानळें ॥ ३१
द्रव्य होतें मेळविलें । तें हि लग्नास वेचलें ।
कांतेसी हि धरून नेलें । दुराचारीं ॥ ३२

असले सतत चहूंकडून कानावर येणारे संतापकारक प्रकार कसे आणि केव्हां थांबणार,

येक देव दुराचारीं । फोडिला बळें ॥ ६-६-३४
येक देव जापाणिला । येक देव उदकीं टाकिला ।
येक देव नेऊन घातला । पायातळीं ॥ ३५

या दंतकथा नव्हत, प्रत्यक्ष आपल्या समोर घडणारे प्रकार आहेत, ते केव्हां बंद पडणार, तात्पर्य,

म्लेच दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ॥ १८-६-१२

तें दोन चार शतकें माजून राहिलेलें बंड कोण आणि केव्हां मोडणार, अशी सारखी चिंता वाटून, सर्वांचें च लक्ष एकाद्या महापुरुषाच्या अवताराकडे लागलें असावें. त्यांच्या पुण्याईनें श्रीशिवसमर्थ ही गुरुशिष्यांची जोडी अवतरली.

(३) आतांच्या आणि केव्हांच्या हि काय, असहाय्य वृद्धतरुणांनीं, तशा च संकटकालीं कोणाच्या तोंडाकडे पहावें, कोणाला शरण जावें, कोणाचा धांवा करावा ?

मला शंका नाहीं. आपण हि सर्वांनीं श्रीसमर्थांना च आळविलें पाहिजे. ते आपली उपेक्षा करणार नाहींत, हा विश्वास असूं द्यावा. मी हें

१ भ्रष्ट केला

अनुभव घेऊन बोलत आहे काय, असा येथें प्रश्न उद्भवण्याचें मुळीं च कारण नाहीं. श्रीसमर्थ तेव्हां होते आणि आतां नाहींत, असें कसें म्हणतां येईल ? ते आज हि आहेत. त्यांचें भजन हें च त्यांच्या कृपादर्शनाचें आमचें साधन. त्यांची आज्ञा हि तशी च आहे :

**जो जन्मला च नाहीं ठाईंचा। त्यास मृत्य येईल कैंचा।**
**विवेकबळें जन्ममृत्याचा। घोट भरिला जेणें॥ ७-१०-२८**

**तो जीत चि असतां मेला। मरणास मारून ज्याला*।**
**जन्ममृत्य न स्मरे त्याला। विवेकबळें॥ ३०**

**असो ऐसे साधुजन। त्यांचें घडलियां भजन।**
**तेणें भजनें पावन। इतर जन होती॥ ३२**

**गुरुभजनाचेनि आधारें। निरूपणाचेनि विचारें।**
**क्रियाशुद्धनिर्धारें। पाविजे पद॥ ३७**

**परमार्थाचें जन्मस्थान। तें चि सद्गुरूचें भजन।**
**सद्गुरुभजनें समाधान। अकस्मात बाणे॥ ३८**

**देह मिथ्या जाणोनि जीवें। याचें सार्थक चि करावें।**
**भजनभावें तोषवावें। चित्त सद्गुरूचें॥ ३९**

**म्हणौन सद्गुरूचें भजन। जयासी घडे तो चि धन्य।**
**सद्गुरुविण समाधान। आणीक नाहीं॥ ४१**

(४) श्रीसमर्थ आज हि आहेत, असे मी म्हणतों, असें नव्हे. ते च तसें सांगून गेले.

**माझी काया आणि वाणी। गेली म्हणाल अंतःकरणीं।**
**परी मी आहे जगज्जीवनीं। निरंतर॥**

असें आपल्या अंतकालीं त्यांनीं सांगितल्याचें ज्यांनीं ऐकलें, त्यांनीं नमूद करून ठेवलें आहे. यावर माझा पूर्ण विश्वास आहे. मला असें वाटतें, त्रेतायुगांतील राम जर कलियुगांत श्रीसमर्थांना दर्शन देतात, त्यांच्याशीं बोलतात, त्यांच्यावर अनुग्रह करतात, घरीं दारीं, रानीं वनीं, अहोरात्र त्यांच्या संनिध राहून त्यांचें रक्षण करतात, असा इतिहास आहे, तर मग या च युगांत अवघ्या तीनशें वर्षांमागें होऊन गेलेले, त्या च रामाचे दास, श्रीसमर्थ रामदास आपणांस दर्शन देणार नाहींत, आपणांवर कृपा करणार नाहींत, असें आपण कां मानावें ?

---

* जिआला, जगला.

(५) राम समर्थांचे पाठिराखे होते, इतकें च केवळ नव्हे, तर आज हि ज्याला वाटेल, रामानें आपला हि सांभाळ करावा, श्रीसमर्थांप्रमाणें आपणांस हि भेटावें, तर त्याची हि इच्छा पूर्ण होण्याचें साधन श्रीसमर्थांनीं सांगून ठेवलेलें आहे. माझ्या हें उशिरा लक्ष्यांत आलें. लवकर आलें असें म्हटलें, तरी माझ्या हातून साधनें घडावीं तशीं घडलीं नाहींत. माझें आयुष्य आतां थोडें उरलें आहे. तेव्हां माझी श्रीरामसमर्थांना प्रार्थना कीं, माझ्या जपसंख्येकडे पाहूं नका, भावनेकडे पहा आणि कृपा करा. या च बरोबर, महाराष्ट्रांतील तरुणांना माझी प्रार्थना कीं, मजसारखा पश्चात्ताप करण्याची पाळी तुम्हांवर येऊं नये म्हणून तुम्ही वेळेवर उमगा, श्रीसमर्थांचें ऐका, मार्गाला लागा. मी सांगतों—

**विलंब नका लावूं। सद्गुरु वाट पाहाती॥**

(६) परकीयांच्या आचारविचारांत मुरलेले लोक आपणांस भोळवट म्हणतील, तर म्हणूं द्या त्यांना. आपण त्यांची कींव करूं. तुम्ही श्रीसमर्थ-वचनावर विश्वास ठेवा, आकाश कोसळोन पडलें तरी केलेल्या निश्चयापासून ढळूं नका. तुम्हांला श्रीसमर्थचरित्राचा आधार आहे.

**तुझें रूपडें लोचनीं म्यां पहावें।**
**तुझे गूण गातां मनासीं रहावें॥**

ही ६७ व्या करुणाष्टकांत श्रीसमर्थांनीं प्रदर्शित केलेली त्यांची इच्छा, किंवा

**म्हणे दास मी वास पाहे दयाळा।**
**रघूनायका भक्तपाळा भुपाळा।**
**पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें॥**

हें ५६ व्या अष्टकांत त्यांनीं सांगितलेलें आपल्या जीवींचे आर्त, हीं जर योग्य आणि तीं सफल झालीं, असें जर त्यांचें चरित्र आहे, तर आमची भावना मात्र भोळसर आणि ती सफळ होणें अशक्य, असें कां मानावें ? एक गोष्ट मात्र खरी कीं, श्रीरामाच्या वियोगामुळें श्रीसमर्थांची काया जशी व्याकुळ होई किंवा श्रीरामाला भेटावयाला त्यांचा प्राण जसा फुटूं पाही, तशी श्रीसमर्थांच्या भेटीसाठीं आपली अवस्था होईल, तर च श्रीसमर्थ आपल्यापासून क्षणभर हि दूर होणार नाहींत.

(७) श्रीसमर्थांनीं सांगितलेली सर्व पूर्व तयारी पूर्ण झाल्यावर आतां एक च गोष्ट उरली – श्रीसमर्थांना शरण जाऊन

**तुझा चि मी या निर्धारें । समर्पिलों तुज ॥**

असें त्यांना जाणवून त्यांच्या चरणीं लोटांगण घालावयाचें. मागणें एक च – माझा अंगिकार करून मला आपल्या समुदायांत एकिकडे बसूं द्या, माझें एकट्याचें किंवा या राष्ट्राचें तेवढें च नव्हे, तर साऱ्या जगाचें कल्याण कशांत आहे, तें आपल्या तोंडून ऐकूं द्या आणि तें जगास विदित करूं द्या, मग जगाचें लक्ष तिकडे जावो वा न जावो. इतकी उत्कट इच्छा मात्र खरी कीं, महाराष्ट्रीयांचें तिकडे लक्ष जावें.

कल्याणांच्या मध्यस्थीनें आपल्या दारीं येऊन पुकारा करितों. दाद घ्यावी, जवळ येऊं द्यावें.

## पुकारा

**शरण आलों श्रीगुरुराया । हा भवनिधी उतराया ।**
**दावीं आपुल्या पाया । हे काया निववावया ॥ ध्रु०**
**अपराधाच्या कोटी । हे चि माझी खोटी ।**
**फेरे फिरलों जन्मकोटी । नीच अविवेकी हीण कोटी ॥ १**
**विधिहरसुरवर ध्याती । नारदतुंबर गाती ।**
**संतवृंदें गर्जताती । धन्य सद्गुरु मूर्ति ॥ २**
**नलगे द्रव्यदारा । मज नलगे हा पसारा ।**
**माईक लटिका सारा । घेऊं नेदी उपसारा ॥ ३**
**बोधमूर्ति अंगिकारी । दास कल्याण हा पुकारी ।**
**नानापरी मी विकारी । परी तुझा चि टेहलकरी ॥ ४**

## धांवा

**समर्था रे समर्था रे मायबापा समर्था रे ।**
**आतां झडकरि धांवुनि ये विनवीतों तुज रे ॥ ध्रु०**
**संसारीं सीणलों बहुत कष्टलों ।**
**तुजवीण कोण्ही नाहीं म्हणउनी शरण आलों ॥ १**
**संकटीं पावसी रे तूं आम्हां दीनासीं ।**
**ऐसा निश्चयो मानसीं वाटतो किंकरासी ॥ २**

[ २ ]

## श्रीसंप्रदायांत प्रवेश

# ( १ ) संप्रदायाचें द्विविध स्वरूप

## धर्मकारण—राजकारण

### आणि

### त्याचीं असंख्य लक्षणें

( १ ) संप्रदायाचीं द्विविध अंगें–हेतु लोककल्याणाचा, ( २ ) संप्रदायाच्या स्वरूपाचे निदर्शक तीन उतारे, ( ३ ) पहिला उतारा, ( ४ ) दुसरा उतारा, ( ५ ) तिसरा उतारा, ( ६ ) तिसऱ्या उताऱ्याचें महत्त्व, ( ७ ) अखंड सावधानता, ( ८ ) अत्यंत साक्षेप, ( ९ ) संप्रदायाची चत्वारिंशत्सूत्री, ( १० ) हरिकथानिरूपण म्हणजे धर्मकारण.

**संसारीं दोनि साधावीं । येहलोक परत्र हि ॥** स्फु. प्र. ५५–२८

( १ ) अत्यंत व्यापक असा हा संप्रदाय आहे. त्यानें विश्वाला गवसणी घातलेली आहे. त्याच्या कक्षेंतून दश दिशांतील देश आणि लोक सुटूं शकत नाहींत. तो विश्वाच्या कल्याणाचा मार्ग दाखविणारा आहे. ‘ अवघे चि सुखी असावे ’ हें त्याचें ब्रीदवाक्य आहे. प्रत्येक माणसानें दोन गोष्टी साधल्या पाहिजेत : इहलोक आणि परलोक, असें हा संप्रदाय मानतो आणि शिकवितो. त्यामुळें या संप्रदायाचें स्वरूप द्विविध बनलें आहे. त्या द्विविध अंगांपैकीं कोणत्या हि एका अंगाकडे दुर्लक्ष करणें या संप्रदायास संमत नाहीं. इहलोक जसा सर्वांना दिसतो, तसा परलोक दिसत नाहीं, म्हणून कोणी कोणी तो मानीत हि नाहींत. पण परलोक असला आणि आपण तो मानला नाहीं, म्हणून तो थोडा च नाहींसा होणार आहे ? आपल्या कर्माचें फळ आपणांस भोगावें च लागणार. तसें च याच्या उलट कित्येक जण परलोकाकडे च सर्व लक्ष लावून ऐहिक कर्तव्याची हेळसांड करतात, पण ते हि चुकतात च. प्रपंची असतात तेवढ्यांना च जेवावें लागतें आणि परमार्थी उपवास करून राहतात, त्यांना जेवावें लागत नाहीं, असें थोडें च

आहे ? मग परमार्थी असतील त्यांनीं हि ऐहिक कर्तव्याची उपेक्षा करून कसें चालेल ?

अशी या संप्रदायाची विचारसरणी असल्यामुळें इहलौकिक आणि पारलौकिक अशीं त्याचीं दोन अंगें आहेत व त्या प्रत्येक अंगाचीं अनेक लक्षणें आहेत. तीं सारीं लक्षणें श्रीसमर्थवाङ्मयांत सर्वत्र विखुरलेलीं आहेत. श्रीमत् ग्रन्थराज दासबोधांत तर तीं संपूर्ण असणार च, पण श्रीसमर्थांच्या हृदयांत जगदुद्धाराशिवाय दुसरा कोणता च विचार नसल्यामुळें त्यांच्या इतर हि सर्व वाङ्मयांत लोककल्याणाशिवाय दुसरें कोणतें च प्रतिपादन आढळावयाचें नाहीं.

(२) या संपूर्ण वाङ्मयाकडे विहंगमदृष्टीनें पाहून संप्रदायाच्या स्वरूपाचे निदर्शक असे तीन ठिकाणचे तीन उतारे देण्याचें मी मनांत आणलें आहे. या तिन्ही उताऱ्यांत किती साम्य आहे तें आपणांस पाहतां येईल व त्यांतील च शिकवणीचा विस्तार त्यांच्या सर्व वाङ्मयांत कसा झाला आहे, हें सूक्ष्मावलोकनानें आपल्या प्रत्ययास येईल.

पहिला उतारा स्फुट ओव्यांतील, दुसरा स्फुट प्रकरणांतील आणि तिसरा ग्रन्थराजांतील आहे. माझ्या समजुतीप्रमाणें पहिला उतारा संप्रदायाच्या आरंभींच्या काळांतील असावा, दुसरा महंतांना परप्रांतांत कामगिरीवर पाठवितांना केलेल्या सूचनांचा, संप्रदायाच्या प्रौढावस्थेंतील असावा आणि तिसरा संप्रदायाला स्थिर स्वरूप प्राप्त झाल्यानंतरचा, सर्व सामान्य धोरणाचा असावा. मुख्य हरिकथानिरूपण, दुसरें तें राजकारण, तिसरें तें सर्वविषयीं सावधपण आणि चौथा अत्यंत साक्षेप, हें सूत्र तिन्ही उताऱ्यांत कायम आहे.

(३) (पहिला उतारा) स्फुट ओव्या—क्रमांक १४

**प्रथम लिहिणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ॥** स्फु. ओ. १४/१
**आशंकानिवृत्ति ऐसी चौथी स्थिति । पांचवी प्रचीति अनुभवें ॥** २
**साहावें तें गाणें सातवें नाचणें । ताळी वाजवणें आठवें तें ॥** ३
**नवां अर्थभेद दाहावा प्रबंद । आक्रावां प्रबोध प्रचीतीसीं ॥** ४
**बारावें वैराग्य तेरावा विवेक । चौदावा तो लोक राजी राखे ॥** ५
**पंधावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अवेग्रता ॥** ६

**प्रसंग जाणावा हा गुण सत्रावा । काळ समजावा सर्वां ठाईं ॥ ७**
**आठ्रावें लक्षण वृत्ति उदासीन । लोलंगता जाण तेथें नाहीं ॥८**
**येकोणिसावें चिन्ह सर्वांसी समान । राखे समाधान ज्याचें त्याचें ॥ ९**
**विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तिरंगें ॥ १०**
**भक्तिरंगें देव देवाल्यें शिखरें । वोटे मनोहरें वृंदावनें ॥ ११**
**बावी पोखरणी रम्य सरोवरें । मंडप विवरें धर्मशाळा ॥ १२**
**धर्मशाळा नाना नाना दीपमाळा । तेथें रविकुळा वाखाणावें ॥ १३**
**तरुवर पुष्पवाटिका जीवनें । पावनें भुवनें होमशाळा ॥ १४**
**उदंड ब्राह्मण ब्रह्मसंतर्पण । पुराणश्रवण आध्यात्मिक ॥ १५**
**जन्मासी येउनी आध्यात्म साधावें । नित्य विवरावें सारासार ॥ १६**
**असार संसार येणें साधे सार । पाविजेतो पार भवसिंधु ॥ १७**
**आयुष्य हें थोडें फार आटाआटी । कठीण सेवटीं वृद्धपण ॥ १८**
**येकलें चि यावें येकलें चि जावें । मधें चि स्वभावें मायाजाळ ॥ १९**
**मायाजाळ तुटे तरी देव भेटे । दास म्हणे खोटें भक्तिहीण ॥ २०**

या उताऱ्यांतील पहिल्या दहा ओंव्यांत अंक घालून वीस लक्षणें सांगितलीं आहेत. तीं संप्रदायाचीं लक्षणें नाहींत, तर कशाचीं आहेत? त्यांत तीनदां लक्षण हा च शब्द योजिला आहे, एकदा गुण म्हटलें आहे व एकदा चिन्ह म्हटलें आहे. हे गुण किंवा हीं चिन्हें किंवा लक्षणें श्रीसमर्थ-संप्रदायाचीं होत. रामोपासनेचें विसावें लक्षण, हा तर मुळीं या संप्रदायाचा आत्मा आहे. एक तें तेरा, हीं लक्षणें हरिकथानिरूपणांत मोडतात. पंधरावें स्थान राजकारणाला मिळालें आहे. लोकांना राजी राखण्याचें चौदावें लक्षण, हरिकथानिरूपणाच्या धर्मकारणांत आणि राजकारणांत, दोहींकडे सारखें च आवश्यक होय. अवेग्रता म्हणजे च सावधानता. सोळा तें एकोणवीस, हीं चार लक्षणें सावधानतेला आवश्यक होत. ग्रन्थराजाच्या एकोणिसाव्या दशकांतील बुद्धिवादाचा जो सहावा समास आहे, त्यांतील सोळा तें एकवीस या ओंव्यांशीं या उताऱ्यांतील पहिल्या दहा ओंव्या ताडून पाहणें वाचकांस कौतुकास्पद वाटणार आहे.

उताऱ्यांतील ११ तें १९ ओंव्यांत, न जाणों, त्या वेळच्या चाफळ मठाचें वर्णन असेल. शेवटच्या पांच ओंव्यांत जन्माचें सार्थक कशांत आहे

तें सांगून, पूर्व तयारींतील मरणाचें स्मरण करून दिलें आहे व संसाराच्या असारतेकडे लक्ष वेधून घेतलें आहे.

## (४) (दुसरा उतारा) स्फुट प्रकरणें—३ रें

लिहितां जोडितां येना । व्यासंग करितां नये ।
जड संसार सांडेना । चालिला सर्व सांडुनी ॥ १
स्वदेश राहिला मागें । विदेश लागला पुढें ।
आचार राखणें आधीं । स्नानसंध्या पवित्रता ॥ २
आचुक शुद्ध ल्याहावें । वाचावें नीटनेटकें ।
साकल्य अर्थ सांगावा । येथातथ्य प्रचीतीनें ॥ ३
बोलावें न्यायनीतीनें । मर्यादा राखणें जनीं ।
अभ्यास करावा आधीं । ताळबद्ध पाठांतरें ॥ ४
प्रसंग मान जाणावे । बाणावे बहुतांपरीं ।
भक्ति भाव असों द्यावा । घालावा भार ईश्वरीं ॥ ५
प्रत्यहीं मागणें भिक्षा । मिळाली न मिळे तरी ।
नित्य नूतन हिंडावें । धुंडावे भक्त प्रेमळ ॥ ६
कथा ते करावी आधीं । बाधी ते दुराशा नको ।
उपाधी आतळावे ना । जावे ना वैभवाकडे ॥ ७
सर्वत्र लोक शोधावे । बोधावे भक्तीच्या गुणें ।
राहावें दुर्बळाचेथें । देवाल्यें कां नदीतिरीं ॥ ८
पर्वतीं उदकापासीं । संन्निध चि येकीकडे ।
फार येकांत सेवावा । अभ्यास नित्य नूतनु ॥ ९
साहावीं सीतउष्णादि । पाहावीं रम्यसीं स्थळें ।
करावे आपण कष्ट । बांधावीं तें हळु हळु ॥ १०
वोळखी कराव्या दाटा । येके ठाईं स्थिरों नये ।
वादवेवाद तो खोटा । दाटावा मद मत्सर ॥ ११
उद्धट बोलणें खोटें । बोलावीं मृद उत्तरें ।
नेटकी पाहिजे दीक्षा । रक्षावी भक्ति आदरें ॥ १२
वर्णावीं कीर्तीचीं द्वारें । अद्भुत बहुतांपरीं ।
प्रबंद जाड बोलावे । चालावें योग्य मानसें ॥ १३

भक्ति ज्ञान असों द्यावें। शुद्ध वैराग्य नेटकें।
धरावीं कीर्तीचीं द्वारें। तरावीं भाविकें बहु ॥ १४

तगावें बहुतां ठाईं। उपाधी नसतां बरें।
सद्गुण सार घ्यावे ते। ने घावे अवगुण ते ॥ १५

भक्तीस लोक लावावे। पावावे परपार ते।
उपाधी पाहातां नाहीं। पाहों जातां उदंड हि ॥ १६

परंतु सर्व देवाचें। आपुलें तन हि नसे।
मनांत वावरे देवो। देव देव चहुंकडे ॥ १७

अत्यंत साक्षपी व्हावें। न व्हावें आळसी कदा।
घ्यावा या देह्याचा लाहो। जायाचें हें म्हणोनियां ॥ १८

मरोनि कीर्ति उरवावी। नुरवावी अपकीर्ति ते।
धन्य धन्य म्हणे लोक। सत्क्रिया करितां बरी ॥ १९

पुण्यमार्ग प्रतिष्ठावा। लावावी धर्मवासना।
देवाल्यें करावीं मोठीं। वापी कूप सरोवरें ॥ २०

वाटिका वृक्ष लावावे। पुष्पें फळें परोपरीं।
करावीं कपाटें टाकीं। भुयरीं विवरें गव्या ॥ ११

वृंदावनें दीपमाळा। धर्मशाळा बहुविधा।
पाईऱ्या वोवऱ्या वोटे। यात्रा धबके हरिकथा ॥ २२

सावधु सकळां ठाईं। न्यायनीति चळों नये।
सकळांसीं सख्य राखावें। वर्तावें तें मनोगतें ॥ २३

वैभवें सर्व देवाचें। वाद्यें छेत्रें परोपरीं।
किती म्हणोनि सांगावीं। सांभाळावीं समस्त हि ॥ २४

दास्य तें करावें ऐसें। यामधें घडेल तसें।
देव सांग करी सर्वै। भावार्थ पाहिजे बरा ॥ २५

या दुसऱ्या उताऱ्यांतील दुसरी ओवी स्पष्ट दर्शविते कीं, महाराष्ट्रा-बाहेर परप्रांतांत कांहीं विशिष्ट कामगिरीवर पाठवितांना श्रीसमर्थ आपल्या शिष्यांना ज्या सूचना देऊन ठेवीत, त्या या प्रकरणांत गोवण्यांत आल्या आहेत. अर्थात् या सूचना म्हणजे श्रीसंप्रदायाचीं लक्षणें होत, असें मानण्यास हरकत नाहीं. बाराव्या ओवींतील दीक्षा शब्दानें याविषयीं मुळीं च शंका रहात नाहीं. अगदीं पहिली ओवी सकृद्दर्शनीं विसदृश वाटते, पण ती

तशी नाहीं. त्या ओवीनें श्रीसमर्थ शिष्याला उलट प्रोत्साहन देत आहेत. 'अरे, तूं कामगिरीवर जातो म्हणतोस, पण तुला ही कामगिरी झेपेल कां, चार वाक्यें नीट जुळवून तुला धड लिहितां तर येत नाहींत, कांहीं अभ्यास हि केला नाहींस, संसारांतून चित्त निघालें आहे, असें हि दिसत नाहीं, आणि जातो म्हणतोस ? ठीक, जातोस तर जा, धूर्तपणानें वाग, काम करून ये, मी सांगतों त्या सूचना ध्यानांत ठेव,' इतका अर्थ पहिल्या ओवींतून निघत आहे. याप्रमाणें शिष्यास कामाचें महत्त्व पटवून देऊन सावध करीत आणि प्रोत्साहन देत, श्रीसमर्थ पुढें सूचना करीत आहेत. प्रत्येक सूचना विचार करण्यासारखी आहे. तसा विचार वाचक करतील च.

या उताऱ्यांत आणि पहिल्या उताऱ्यांत किती तरी सारखेपणा आहे. लिहिणें, वाचणें, अर्थ करणें, या सामान्य सूचना दोहींकडे आहेत च. प्रसंग मान जाणणें, शुद्ध वैराग्य, प्रबंद, सकळांसी सख्य इत्यादि महत्त्वाच्या सूचना हि दोन्ही उताऱ्यांत आहेत. विशेषतः मठाची उपयुक्तता आणि सौंदर्य वाढविण्यासाठीं ज्या सोयी असाव्यात म्हणून या उताऱ्यांतील २०,२१, २२ या अष्टाक्षरींत सांगितल्या आहेत, त्या च नेमक्या पहिल्या उताऱ्यांतील ११ तें १४ या कडव्यांत आढळत आहेत.

या उताऱ्यांतील अगदीं पहिली सूचना, स्नानसंध्यादि आचार राखावा, अशी आहे, तिच्या कडे, पूर्व तयारींतील शुद्ध कर्माचरणाच्या दृष्टीनें, वाचकांचें लक्ष जाईल च. स्नानसंध्येंत किती पवित्रता आणि प्रसन्नता असते, ती कोणी हि अनुभवी ब्राह्मण सांगूं शकेल. याप्रमाणें पहिली सूचना स्नानसंध्येची आहे, तर शेवटच्या अष्टाक्षरींत शेवटची सूचना दास्य करण्याविषयीं आहे. दास्य म्हणजे रामदास्य आणि तें या प्रकरणांत सांगितलेल्या सूचना पाळून करावें, असें म्हटलें आहे. याचा अर्थ, या प्रकरणांत जीं लक्षणें सांगितलीं आहेत तीं श्रीरामदाससंप्रदायाचीं लक्षणें होत, असा च होतो.

जास्त विस्तार करीत नाहीं. त्याची आवश्यकता हि वाटत नाहीं. तथापि या उताऱ्यांतील १८ व्या अष्टाक्षरींत जो प्रयत्नवाद सांगितला आहे, त्याकडे वाचकांचें मुद्दाम लक्ष वेधूं इच्छितों. कारण 'अत्यंत साक्षेप' हें या संप्रदायाचें एक प्रमुख लक्षण आहे, हें आपणांस ठाऊक झालेलें आहे आणि नसलें झाल्यास याच्या पुढच्या च तिसऱ्या उताऱ्यावरून ठाऊक होणार

आहे. तसें च २० व्या अष्टाक्षरींतील ‘पुण्यमार्गाचें’ वाचकांनीं स्मरण असूं द्यावें, अशी येथें विनंति करून ठेवतों, कारण त्या मार्गाविषयीं आपणांस पुढें पुष्कळ च बोलावयाचें आहे.

याप्रमाणें पहिला उतारा संप्रदायाच्या बाल्यावस्थेंतील आणि दुसरा उतारा प्रौढावस्थेंतील आपण पाहिले. आतां तिसरा अति महत्त्वाचा उतारा ग्रन्थराजांतील असून त्यांत संप्रदायाचें निश्चित आणि स्थिर स्वरूप आपणांस पहावयास मिळणार आहे :

### (५) (तिसरा उतारा) दशक ११, समास ५

कर्म केलें चि करावें । ध्यान धरिलें चि धरावें ।
विवरलें चि विवरावें । पुन्हा निरूपण ॥ १

तैसें आम्हांस घडलें । बोलिलें चि बोलणें पडिलें ।
कां जें विघडलें चि घडलें । पाहिजे समाधान ॥ २

अनन्य राहे समुदाव । इतर जनास उपजे भाव ।
ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३

मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ४

चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ।
अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५

जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर ।
नीतिन्यायासी अंतर । पडों च नेदावें ॥ ६

संकेतें लोक वेधावा । येकूनयेक बोधावा ।
प्रपंच हि सावरावा । येथानशक्त्या ॥ ७

प्रपंचसमयो वोळखाया । धीर बहुत असावा ।
संमंध पडों नेदावा । अति परी तयाचा ॥ ८

उपाधीसी विस्तारावें । उपाधींत न संपडावें ।
नीचत्व पहिलें च घ्यावें । आणि मूर्खपण ॥ ९

दोष देखोन झांकावे । अवगुण अखंड न बोलावे ।
दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥ १०

तऱ्हे भरों च नये । सुचावे नाना उपाये ।
नव्हे तें चि करावें कार्ये । दीर्घ प्रेत्नें ॥ ११

फड नासों चि नेदावा । पडिला प्रसंग सावरावा ।
अति वाद न करावा । कोणीयेकासी ॥ १२

दुसऱ्याचें अभिष्ट जाणावें । बहुतांचें बहुत सोसावें ।
न सोसे तरी जावें । दिगांतराप्रती ॥ १३

दुःख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोन तरी वांटून घ्यावें ।
बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥ १४

अपार असावें पाठांतर । सन्निध चि असावा विचार ।
सदा सर्वदा तत्पर । परोपकारासी ॥ १५

शांती करून करवावी । तऱ्हे सांडून सांडवावी ।
क्रिया करून करवावी । बहुतांकरवीं ॥ १६

करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये ।
परस्परें चि प्रत्ययें । प्रचितीस आणावा ॥ १७

जो बहुतांचें सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना ।
बहुत सोसितां उरेना । महत्त्व आपुलें ॥ १८

राजकारण बहुत करावें । परंतु कळों च नेदावें ।
परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ १९

लोक पारखून सांडावे । राजकारणें अभिमान झाडावे ।
पुन्हा मेळऊन घ्यावे । दुरील दोरें ॥ २०

हिरवटासी दुरी धरावें । कचरटासीं न बोलावें ।
समंध पडतां सोडून जावें । येकीकडे ॥ २१

ऐसें असो राजकारण । सांगतां तें असाधारण ।
सुचित अस्तां अंतःकरण । राजकारण जाणे ॥ २२

वृक्षीं रूढासी उचलावें । युध्यकर्त्यास ढकलून द्यावें ।
कारबाराचें सांगावें । आंग कैसें ॥ २३

पाहातां तरी सांपडेना । कीर्ति करूं तरी राहेना ।
आलें वैभव अभिळासीना । कांहीं केल्यां ॥ २४

**येकांची पाठी राखणें। येकांस देखों न सकणें।**
**ऐसीं नव्हेत कीं लक्षणें। चातुर्याचीं॥ २५**

**न्याय बोलतां हि मानेना। हित तें चि न ये मना।**
**येथें कांहीं च चालेना। त्यागेंविण॥ २६**

**श्रोतीं कळोन आक्षेपिलें। म्हणौन बोलिलें चि बोलिलें।**
**न्यूनपूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं॥ २७**

पूर्वी अनेकदां सांगितलें असून अजून तुमच्या लक्षांत येत नाहीं व शिस्त पाळली जात नाहीं, म्हणून आम्हांस पुन्हःपुन्हां तें च तें सांगावें लागत आहे, असा भाव दर्शवून श्रीसमर्थांनीं हा समास सांगण्यास आरंभ केला आहे. वारंवार सांगावे लागणारे नियम श्रीसमर्थांच्या जिव्हाळ्याचे असले पाहिजेत व त्यांत च त्यांच्या संप्रदायाचीं लक्षणें असावींत, असें वाटतें. याविषयीं तिसऱ्या ओवीवरून शंका रहात नाहीं. या समासाचा ओझरता उल्लेख श्रीसमर्थहृदयग्रन्थांत आलेला असणार. आज त्याचा थोडा विचार करावयाचा आहे. तिसऱ्या ओवीच्या पहिल्या चरणांत जो 'समुदाव' शब्द आला आहे, तो श्रीसमर्थांचा शिष्यसमुदाय होय, असा बोध दुसऱ्या चरणांतील 'इतर' शब्दानें होतो. या ओवीचा सरळ अर्थ असा : श्रीसमर्थ म्हणतात, आमचा जो शिष्यसमुदाय आहे त्याची आमच्या संप्रदायाविषयींची निष्ठा दृढ व्हावी व संप्रदायाबाहेर च जे लोक अजून घुटमळत आहेत, त्यांना संप्रदायांत येण्याची बुद्धि व्हावी, म्हणजे जे आमचे आहेत ते कायमचे आमचे व्हावेत व जे अजून आमच्या पासून दूर आहेत त्यांना आमच्यांत येऊन मिळावें, असें वाटूं लागावें, असा दुहेरी हेतु मनांत धरून आम्ही कांहीं उपाय सांगण्याचें योजिलें आहे. हा या ओवीचा मी करीत असलेला अर्थ बरोबर असेल तर, अशा दुहेरी हेतूनें श्रीसमर्थांनीं जे नियम सांगितले आहेत, तींच त्यांच्या संप्रदायाचीं लक्षणें होत.

(९) हीं लक्षणें बरोबर चाळीस भरतात, म्हणून मी ही श्रीसमर्थांची चत्वारिंशत्सूत्री मानतो. परंतु तींत हि पहिलीं चार लक्षणें विशेष महत्त्वाचीं असल्यामुळें व त्यांना एक, दोन, तीन, चार असे अंक श्रीसमर्थांनीं स्वतःच देऊन त्यांचा उल्लेख केलेला असल्यामुळें, शिवाय चतुःसूत्री या शब्दाशीं धर्मकारणांत आणि राजकारणांत श्रीमत् आचार्य आणि श्रीमत् लोकमान्य

अशा लोकोत्तर पुरुषांच्या नांवांचा संबंध जोडल्यानें त्या शब्दाला एक प्रकारचें पावित्र्य आल्यामुळें हीं चार लक्षणें म्हणजे श्रीसमर्थांची चतुःसूत्री होय, असें मानण्यांत येत असतें. या चारांत हि पहिलीं दोन लक्षणें हीं च या संप्रदायाचीं दोन प्रमुख अंगें होत. पहिलें अंग हरिकथानिरूपण आणि दुसरें अंग राजकारण आणि हीं दोन्हीं अंगें साधून देणारीं पुढचीं अडतीस साधनें होंत. हरिकथानिरूपण हा धर्मकारणाचा पर्याय शब्द होय. म्हणजे धर्मकारण आणि राजकारण हीं या संप्रदायाचीं दोन अंगें होत. व्यक्तीचें आणि समुदायाचें पारलौकिक आणि इहलौकिक कल्याण, म्हणजे च परमार्थ आणि प्रपंच हीं साधून देणें हें या संप्रदायाचें ध्येय होय. या चतुर्विध ध्येयाच्या सिद्धीसाठीं श्रीसमर्थांच्या वाङ्मयांत सर्वत्र त्यांची शिकवण ओतप्रोत भरलेली आहे. त्या शिकवणीचा आश्रय व्यक्तीनें आणि समुदायानें करावा आणि इहपरलोकीं आपलें कल्याण साधावें.

(७) अखंड सावधानतेची जी श्रीसमर्थांनीं सूचना दिली आहे, ती च त्यांचें अवतारकार्य उलगडण्याची मी किल्ली मानतो. सावधानतेपासून च त्यांच्या अवतारकार्याचा आरंभ झाला आहे. स्वतः सावध होऊन राष्ट्राला सावध केलें, हें श्रीसमर्थांचें अवतारकार्य. स्वतः सावध होऊन, प्रपंचाची बेडी पायांत पडूं पहात होती, ती पडूं दिली नाहीं आणि राष्ट्राला सावध करून, राष्ट्राच्या पायांत पडलेली पारतंत्र्यशृंखला तोडून टाकविली. सावधान शब्द कानीं पडतां च ऐन वेळेवर ते सावध झाले. आणखी एक क्षण लोटता आणि अंतःपट दूर होता, तर महाराष्ट्राचा पुढचा सारा इतिहास च बदलता. महाराष्ट्राच्या इतिहासांत किती महत्त्वाचा तो क्षण गणला पाहिजे. देवाला या राष्ट्राची आणि धर्माची काळजी होती. त्याला हें राष्ट्र आणि हा धर्म हीं बुडूं द्यावयाचीं नव्हतीं. हा त्या वेळचा प्रसंग आपणांस मोठा आधार वाटला पाहिजे. या प्रसंगांत आम्हांस देवाचा हात स्पष्ट दिसतो. धर्माला ग्लानि आली आणि अधर्माला जोर चढला, म्हणजे देवाचा अवतार होतो, या नुसत्या वचनाधारें च मी असें म्हणत नाहीं, तर हजारों वर्षांचा आमचा तसा अनुभव आहे. ती रात्र उलटती आणि दुसरा दिवस उजाडून रामाला यौवराज्याभिषेक होता, तर तेतिस कोटी देवांच्या कपाळचा बंदिवास न चुकता. याची चिंता परमेश्वराला वाटून आदल्या रात्रीं मंथरेच्या द्वारा कैकेयींत द्वैतभावानें संचार केला आणि दुसऱ्या दिवशीं रामाच्या अंगावर राजवस्त्रें पडण्याऐवजीं वल्कलें आलीं आणि

सिंहासनावर बसण्याऐवजीं त्यांना वनवास पतकरावा लागला ! कां ? तर पुढें रावणाच्या बंदिशाळेंतून देवांची मुक्तता व्हावयाची होती, म्हणून. ही जशी त्या वेळची परमेश्वराची योजना, अगदीं तद्वत् ऐन प्रसंगीं श्रीसमर्थ-हृदयांत सावधान शब्दानें संचार केला, त्यांच्या बुद्धींत पालट झाला आणि बहुल्यावर चढण्याऐवजीं त्यांच्या हि वाट्याला अरण्यवास च आला. कां ? तर या राष्ट्रावर आणि धर्मावर जें महान् प्राणांतिक संकट आलें होतें, त्याचें निवारण करणें परमेश्वरास प्राप्त होतें, म्हणून.

प्राचीन आणि अर्वाचीन अशा या दोन्ही घटनांत मला जें साम्य दिसतें, त्यायोगें

**जनीं दास देखोनिया दैन्यवाणा ।**
**मनामाजि वोसावतो देवराणा ॥** रा. यु. १३–८३

हें मला पटतें, देवाच्या दयालुत्वाविषयीं माझा विश्वास दृढावतो व आपल्या भवितव्याविषयीं आशा बळावतात. पूर्व तयारीची म्हणून आम्ही एक च अट पाळावयाची असते : श्रीसमर्थचरणाकडे आमचें लक्ष अचल लागलें पाहिजे, आपण रामाच्या दासाचे दास बनले पाहिजे.

( ८ ) संप्रदायाचा चवथा गुण जो अत्यंत साक्षेप, त्याविषयीं इतकेंच म्हटलें म्हणजे पुरें होईल कीं, साक्षेप म्हणजे यत्न आणि त्या यत्नाला श्रीसमर्थांनीं देवपदापर्यंत नेऊन चढविलें आहे. देव सुखासुखीं पावत नसतो. देव पावतो म्हणजे आपला प्रयत्न पावतो. यत्नाची महती जगांत दुसऱ्या कोणी इतकी गायिली असेल, असें वाटत नाहीं.

१

**यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेवीण दरिद्रता ।**
**उमजला लोक तो धाला । उमजेना तो हपापिला ॥** स्फु. प्र. १–१

२

**भाग्यासी काय उणें रे । यत्नावांचुनि राहिलें ।**
**यत्न तो करावा कैसा । हें चि आधीं कळेचिना ॥** स्फु. प्र. २–१
**मुख्य यत्न विचाराचा । त्यावरी बोलणें बरें ।**
**चालणें सत्य नेमाचें । नीतिन्याय चुकों नये ॥** २

---

१ उदास होतो, कष्टी होतो.

३

**वन्ही तो चेतवावा रे । चेतवितां च चेततो ।**
**विवेक जाणिजे तैसा । वाढवितां च वाढतो ॥** स्फु. प्र. ३०–१

**संग तो साक्षपीयाचा । धरितां साक्षपु घडे ।**
**साक्षपें साक्षपु वाढे । पुरती मनकामना ॥ २**

**कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं फळ चि पाविजे ।**
**आळसें सुख वाटे तें । दुःखब्रह्मांड भोगवी ॥ ३**

**केल्यानें होत आहे रे । आधीं केलें चि पाहिजे ।**
**यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ४**

(९) अकराव्याचा पांचवा समास मुख्यतः राजकारणाचा आहे, त्यामुळें त्यांतील कांहीं सूत्रें धर्मकारणाला हि उपयोगीं पडण्यासारखीं असलीं, तरी तीं विशेषतः राजकारणासाठीं च श्रीसमर्थांनीं सांगितलेलीं आहेत. राजकारणाचीं लक्षणें किती हि सांगितलीं तरी तीं पुरीं पडणारीं नसतात. राजकारणी पुरुषांनीं च तीं प्रसंगानुसार आपल्या बुद्धिसामर्थ्यानें जाणावयाचीं असतात. या समासांत फक्त कांहीं ठळक नियम सांगून श्रीसमर्थांनीं मार्ग दाखविला आहे. ते सारे नियम येथें नमूद करून संप्रदायाचें पहिलें मुख्य लक्षण जे हरिकथानिरूपण त्याचा सविस्तर विचार पुढील कांहीं प्रकरणांत करूं.

## चत्वारिंशत्सूत्री

(१) मुख्य हरिकथानिरूपण
(२) दुसरें तें राजकारण
(३) तिसरें तें सावधपण
(४) चौथा अत्यंत आक्षेप
} चतुःसूत्री

(५) कोणी कांहीं आक्षेप घेतले किंवा शंका विचारल्या तर त्याचें समाधान करावें.

(६) क्षमाशील वृत्ति असावी. राजा असो, वा रंक असो, **क्षमा सर्वदा ऐक्यरूपें करावी** ॥ क० ७३–३४

(७) **जाणावें पराचें अंतर** । दुसऱ्याचें अंतःकरण ओळखून वागावें.

भेटो कोणी येक नर धेड माहार चांभार।
त्याचें राखावें अंतर याचें नांव भजन॥
दुःख नेदावें कोणाला उंच नीच जरी जाला।
अंतरात्मा वोळखिला तो चि जाणा सज्जन॥ क.२१५-९

(८) सदा रामदासी उदासीन व्हावा।
महंतानें पोटीं आशा ठेवून कधीं प्रवचन, कीर्तन, व्याख्यान करूं नये.

वक्ता पाहिजे उदास। जयाचें बोलणें निराश।
जयाचें हृदईं वसे आस। तो वक्ता नव्हे॥ ए. ३-१०

त्याला वैभव कसपटासमान वाटावें. प्रत्यक्ष रामापुढें श्रीसमर्थ कसें निस्पृहपणें बोलत तें एकवीससमासीच्या सोळाव्या समासांत वाचा.

(९) नीतिन्यायाला केव्हां हि चुकूं नये, असें श्रीसमर्थांनीं हजारों वेळां सांगितलेलें असेल. किंचित् अतिशयोक्ति होईल, पण असें म्हणावेसें वाटतें कीं, त्यांच्या ग्रन्थांपैकीं कोणतें हि पान उघडून वाचूं लागा, त्यांत नीतिन्याय सोडूं नका, असें आढळेल.

(१०) संकतें लोक वेधावा. खूण पटेल असें बोलून लोकांचीं मनें आकर्षून त्यांना हितोपदेश सांगावा. कार्यकर्त्याच्या ठिकाणीं हा गुण अवश्य पाहिजे.

(११) यथाशक्ति प्रपंच करावा, पण त्यांत फार गुरफटलें जाऊं नये. त्यांतील सुखदुःखाचे प्रसंग ओळखून धैर्यानें वागावें.

(१२) उपाधीसी विस्तारावें. अनेक व्याप करावे पण कोणत्या च व्यापांत आसक्त होऊन राहूं नये. उपाधीसंबंधीं भिन्न भिन्न वचनें आढळतील पण भावार्थ एक च कीं, कोणत्या हि उपाधींत लिप्त होऊं नये.

(१३) कार्यकर्त्यानें स्वतःकडे आधीं च कमीपणा घेतलेला असावा, म्हणजे मत्सराला आणि कलहाला जागा रहात नाहीं.

(१४) दुसऱ्यांतील दोष आपल्या लक्ष्यांत आले, तरी त्यावर पांघरूण घालावें. शक्य होईल तर, त्यास न कळत, ते नाहींसे करण्याचा प्रयत्न करावा.

(१५) दुसऱ्यांतील दुर्गुणांचा सारखा पाढा गात बसूं नये.

(१६) दुर्जनासीं गांठ पडली तरी त्याच्यावर हि उपकार करून त्यास

लाजवावें, मग सर्वांवर च परोपकार करण्यास सदा तत्पर असावें, हें काय सांगावयास पाहिजे ? लोकसंग्रह ज्याला करावयाचा असेल त्याला परोपकारासारखें साधन नाहीं. परोपकारांत पुण्य आहे. परलोक साधण्याचा तो एक मार्ग आहे.

(१७) एक च एक हट्ट घेऊन बसूं नये.

(१८) एकदा ध्येय ठरलें म्हणजे तें ध्येय गांठण्याला हा नाहीं तो, सारे उपाय करून पहावे.

(१९) न होण्यासारखीं कामें सुद्धां हर प्रयत्नानें यशस्वी करून दाखवावीं. पुरेसा आणि नेमका प्रयत्न होईल तर असाध्य असें कांहीं नाहीं.

(२०) संघांत फूट पडूं देऊं नये, नेहमीं जुळतें घेत असावें.

(२१) केव्हां हि आणि कोणाशीं हि अतिवाद करूं नये. दोन्ही पक्ष समंजस असले तर वाद तुटला च पाहिजे. परंतु कोणता हि एक पक्ष मत्सर, द्वेष, अभिमान इत्यादि विकारांनीं ग्रासला असेल तर अशाशीं वाद घालूं च नये, खेदाला कारण व्हावयाचें.

**आपल्याला साभिमानें। मीपणें वाद घालिती॥** पं. मा. २–२२

**वादवेवादाचें लक्षण। तें हि जाण अपूर्णपण।**
**अभिमानीं गुंतले खूण। स्वानंदाची नेणती॥** ए. १७–४०

ध्येयें भिन्न, कल्पना भिन्न असल्या कीं वाद माजतो. अंतरीं भेद नसला, अद्वैत असलें कीं वाद संभवत नाहीं.

**निशब्द शब्द खुंटला। वेवाद वाद तुटला॥** स्फु. श्लो. ५५–३९

तात्पर्य, पूर्वग्रहानें दूषित होऊन जेथें पक्ष उद्भवतात तेथें वितंड वाद माजतो. शब्दानें शब्द वाढतो. अशा वेळीं, तुम्ही म्हणता तें च खरें, असें म्हणून, आपण दूर होणें च श्रेयस्कर होय. अशा वेळीं आपण च आपल्याशीं विचार करून स्वहित साधावें.

**धरून पक्ष काय रे। उपाय तो अपाय रे।**
**तुम्ही तुम्हांस वीवरा। स्वहित तें मनीं धरा॥** स्फु. श्लो. १७–१०

**जनीं उदंड पाहिले। कळहो करीत राहिले।**
**अनन्य देव भेटला। कळहो तयास तूटला॥ ११॥**

**कळ्हो करील शब्द रे। अनंत तो निशब्द रे।**
**तुम्ही अनंत कां न व्हा। वेवादतां अव्हासव्हा ॥ १२ ॥**

**अनंत ब्रह्म तें असे। तयास पक्ष हि नसे।**
**संत संत संत रे। निवांत रे निवांत रे ॥ १३ ॥**

**स्वयें चि तो चि होइजे। पदीं मिळोनि जाईजे।**
**उरेल तो कळ्हो करूं। उदंड पक्ष हि धरूं ॥ १४ ॥**

**उदंड हो बरें बरें। तुम्ही म्हणाल तें खरें।**
**कळेल तें सुखें करा। धराल तें सुखें धरा ॥ १५ ॥**

असें म्हणून त्यांचा नाद सोडावा आणि आपण आपल्या मार्गाला लागावें.

(२२) नेहमीं दुसऱ्याचें कल्याण चिंतित असावें.

(२३) लोकांसाठीं नेहमीं खस्ता खाल्ल्या पाहिजेत, झीज सोसली पाहिजे. झीज सोसवत नसेल तर कोणत्या हि कार्यांत पडूं नये, बाजूस सरावें.

(२४) दुसऱ्यासाठीं झीज सोसण्याची तयारी असल्यावांचून लोक मिळावेत कसे आणि समुदाय व्हावा कसा? समुदाय म्हटला कीं, त्यांत सर्व च आपल्या मनासारखें कोठून असणार? बरें वाईट सोसणें भाग असतें.

(२५) तथापि त्या सोसण्यांत हि तारतम्य पाहिजे च, नाहीं तर उलट आपण च आपलें महत्त्व गमावून बसण्याचा प्रसंग यावयाचा.

(२६) दुसऱ्याच्या दुःखाचे आपण वांटेकरी व्हावें.

(२७) खूप पाठांतर असावें; पण त्याचा अर्थ हि सांगतां यावा. नुसती पोपटपंची नसावी.

**अर्थेंवीण पाठ कासया करावें।**
**वेर्थ कां मरावें घोकुनियां ॥** स्फु. ओ. ३१८-१

**घोकुनियां काय वेगीं अर्थ पाहें।**
**अर्थरूप राहें होउनियां ॥ २**

**होउनियां अर्थ सार्थक करावें।**
**रामदास भावें सांगतसे ॥ ३**

(२८) केव्हां हि विचारावांचून पाऊल टाकूं नये. मन अखंड विचारारूढ असावें.

**विचारूनि बोले विवंचूनि चाले।**
**तयाचेनि संतप्त ते ही निवाले॥** म. १३२

न्यायनीतीप्रमाणें च विचार आणि विवेक यावर श्रीसमर्थांचा अमर्याद भर असे.

(२९) आपण स्वतः आपलें चित्त शांत ठेवावें व दुसऱ्यास ठेवावयास लावावें.

(३०) आपण च आपला हट्ट सोडला तर दुसरा हि हट्ट धरून बसणार नाहीं.

(३१) आपण च सारखें उद्योगांत असलों म्हणजे दुसरे हि स्वस्थ बसणार नाहींत.

श्रीसमर्थ केव्हां केव्हां याचा धडा स्वतः घालून देऊन शिष्यांना लाजवीत. एकदां सर्वांच्या आधीं उठून देवाच्या अंगणांत सडासंमार्जन करून श्रीसमर्थ मोकळे झाले होते. मग शिष्य उठले. त्यांना काय वाटलें असेल ? पुन्हां असा प्रसंग आला नसेल.

(३२) कोणास अपाय करण्याची बुद्धि सहसा नसावी, पण अपाय करणें च असेल तर आधीं च बोलून दाखवूं नये, परभारें त्याच्या प्रत्ययास आणून द्यावें. हा उपदेश केवळ राजकारणापुरता आहे, हें उघड आहे.

(३३) राजकारण उदंड करावें, पण तें सारें गुप्तपणें. तें षट्कर्णीं झालें किंवा शत्रूला आधीं च कळलें तर तें नासतें.

(३४) सर्वांची परीक्षा केलेली असावी, कोणी ताठरपणा धरून बसेल तर त्याला झिडकारून टाकावें, पण पुन्हां युक्तिप्रयुक्तीनें दुसऱ्या कोणाच्या मध्यस्थीनें त्याला आपल्याकडे वळवून घ्यावें.

( ३५ ) हिरवट माणसाशीं संबंध ठेवूं नये. कचरट माणसाशीं तर बोलूं सुद्धां नये. अशा माणसांशीं प्रसंग आला तर आपणच दुसरीकडे चालते व्हावें.

( ३६ ) हें सारें राजकारण आहे. राजकारणांत किती हि सूचना दिल्या तरी त्या पुऱ्या पडणार नाहींत. फक्त एक कायमची सूचना देऊन ठेवतां येईल कीं, अखंड सावधान असावें, दुश्चित्त कदापि नसावें. जो अखंड सावधानता राखील त्याला च राजकारण साधेल.

(३७) भ्यायलेल्यांना धीर द्यावा, धैर्यानें लढणारांना प्रोत्साहन द्यावें, केव्हां कसें वागावें, हें सारें च सांगतां येणार नाहीं.

(३८) एकादा कार्यकर्ता असतो, ज्याच्या त्याच्या तोंडीं त्याचें नांव होतें, पण तो कोणाच्या फारसा नजरेस हि पडत नाहीं किंवा मोठेपणाचा अभिलाष हि धरीत नाहीं.

(३९) एकाचा सारखा पाठपुरावा करणें आणि दुसऱ्या एकाद्यास नेहमीं उघडा पाडणें, यास कांहीं कोणी चातुर्य म्हणत नाहींत. चातुर्य शिकवून येत नसतें.

(४०) एकाद्याला न्यायाची, त्याच्या च हिताची गोष्ट सांगावी, तर ती त्याला पटत नाहीं. तेथें काय करावें ? त्याचा नाद सोडावा, दुसरा उपाय नसतो.

अशीं हीं श्रीसमर्थसंप्रदायाचीं चाळीस सूत्रें होत. त्यांच्या पोटांत आपणांस आणखी असंख्य सूत्रें मानतां येतील. श्रीसमर्थांच्या संपूर्ण वाङ्मयांत संप्रदायाची च शिकवण आहे. धर्मकारण आणि राजकारण याशिवाय जगांत दुसरें कांहीं नाहीं व त्या दोन्ही अंगांची शिकवण त्यांच्या वाङ्मयांत आहे. जागतिक कल्याणाच्या दृष्टीनें ही त्यांची सारी शिकवण आहे.

प्रस्तुतचा समास संप्रदायाच्या लक्षणांचा असतां व त्यांत आरंभीं मुख्य स्थान हरिकथानिरूपणाला दिलें असून हि नंतर सर्वच्या सर्व समास राजकारणाला च वाहिलेला आहे, हें पाहिलें म्हणजे या संप्रदायांत राजकारणाला किती महत्त्व देण्यांत आलें आहे, तें कळतें.

(१०) हरिकथानिरूपण म्हणजे केवळ कथाकीर्तन नव्हे. हा शब्द व्यापक अर्थानें च घेतला पाहिजे व तसा तो श्रीसमर्थांनीं च योजिलेला आहे, हें हळु हळु आपल्या निदर्शनास पुढें येणार च आहे. हरिकथानिरूपण म्हणजे धर्मकारण. धर्मकारण आधीं, मग राजकारण. धर्मावांचून राजकारण व्यर्थ होय, किंबहुना धर्मासाठीं च राजकारणाची आवश्यकता. तसें च राजकारणावांचून नुसतें धर्मकारण हि एकांगी च होय. राजकारणावांचून तें सफल होण्याची आशा च नको. म्हणून च धर्मकारण आणि राजकारण अशीं या संप्रदायाचीं दोन अंगें मानण्यांत आलीं आहेत.

या समासांत हरिकथानिरूपण हें मुख्य अंग होय, असें सांगून तें तसें च सोडून दिलें आहे आणि सबंध समासांत विस्तार केला आहे दुसऱ्या अंगाचा. हरिकथानिरूपणाचें यथार्थ स्वरूप श्रीसमर्थांनीं अन्यत्र प्रकट करून दाखविलें आहे, तिकडे आतां आपण आपलें लक्ष प्रथम पुरवूं.

---

## (२) हरिकथानिरूपण म्हणजे धर्मकारण
## त्याचीं पंचविध लक्षणें
## म्हणजे च
## श्रीसमर्थांचा शुद्ध मार्ग

(१) हरिकथानिरूपण म्हणजे धर्मकारण, (२) पंचवटीच्या रामोपासकांना श्रीसमर्थांचें पत्र, (३) पत्राचा काळ, (४) पडलों शब्दामागें दडलेला थोडा इतिहास, (५) माझीं अनुमानें, (६) शुद्ध मार्गाचीं पंचविध लक्षणें व त्यांचें महत्त्व, (७) तत्कालीन स्थिति, (८) समर्थांना सर्व कांहीं शुद्ध, शुद्ध, शुद्ध पाहिजे असे, (९) जगदुद्धार = World order (१०) जगद्गुरु आणि राष्ट्रगुरु, (११) पांच अंगांचा आपला क्रम

**शुद्ध उपासना विमल ज्ञान । वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।**
**गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्धमार्ग ॥**

(१) हरिकथानिरूपण म्हणजे एकंदरींत धर्मकारण होय. तें निरूपण स्वतः करावें व दुसऱ्यानें केलेलें ऐकावें. तें वारंवार करावें आणि संतत कानावरून जावें. परमार्थमार्गांतील तें एक मोठें साधन आहे. ज्ञानाचीं सर्व बीजें निरूपणांत येतात. विवेक, वैराग्य,

अनुताप, भक्ति, अष्टदेहनिरसन, विदेहता, सारासारविचार, आत्मानात्मविवेक, श्रवणमनननिदिध्यास, वस्तूची चाळणा, ध्यान, धारणा, क्षमा, शांति, दया, नैराश्य, उदासीनता, उन्मनी अवस्था, ऋद्धि, सिद्धि, साक्षात्कार, आत्मनिवेदन इत्यादि सर्व अध्यात्मविषयांचें प्रतिपादन निरूपणांत येतें. हीं सर्व धर्मकारणाचीं च अंगें होत. पण त्यांत पांच अंगें श्रीसमर्थांनीं च प्रमुख मानलीं आहेत. त्यांच्या पोटांत या बाकीच्या सर्व अंगांचा समावेश होतो. तीं पांच अंगें एका ओवीबद्ध पत्रांत प्रथम प्रकट झालीं आणि नंतर तीं ग्रन्थराजांत एका ठिकाणीं सहज ओघांत सांगण्यांत आलीं.

(२) श्रीसमर्थांचा जन्म शके १५३० त श्री क्षेत्र जांब येथें रामजन्माच्या क्षणीं झाला. वयाच्या बाराव्या वर्षीं ते जांबेहून निसटले. नंतर नाशिकपंचवटीजवळ बारा वर्षें पुरश्चरणार्थ राहून आणि तदनंतर बारा वर्षें सर्व भरतखंडभर तीर्थाटण करीत वयाच्या छत्तिसाव्या वर्षीं म्हणजे शके १५६६ तारणनाम संवत्सरीं ते महाबळेश्वर व मसूर–शहापुर–कऱ्हाड भागांत कृष्णातटाकीं गेले आणि नंतर १५७० सर्वधारीनाम संवत्सरांत त्यांनीं चाफळास श्रीरामाची स्थापना केली. मी वर उल्लेखिलेलें ओवीबद्ध पत्र १५६६ आणि १५७० या दरम्यानच्या काळांतील असावें, असें मला वाटतें. त्या पत्रांतील कित्येक उद्गारांवरून च मी हें व इतर कांहीं अनुमानें काढीत असतों. पंचवटीस ज्या रामाच्या सान्निध्यांत त्यांनीं बारा वर्षें काढलीं त्या रामाच्या उपासकांना त्यांनीं तें पत्र पाठविलेलें आहे. त्या पत्राचा नुसता उल्लेख श्रीसमर्थहृदय ग्रन्थांत करण्यांत आला असेल, पण आतां आपणांस त्याचा सूक्ष्म विचार करावयाचा असल्यामुळें तें आधीं येथें साद्यंत उद्धृत करणें आवश्यक होय. तें पत्र असें :

### श्रीरामसमर्थ

जनस्थान गोदातटी। परम पावन पंचवटी।
जेथें पडली कृपादृष्टी। रघोत्तमा रामाची॥ १॥

तेथील रामउपासक। त्यांच्या सेवकांचा सेवक।
तुम्हांमध्यें मी येक रंक। सरतें करावे॥ २॥

तुम्ही निकट देवापाशीं। आणि मी पडलों दुरी देशीं।
कृपाळुपणें रघुनाथाशीं। माझी करुणा भाकावी॥ ३॥

म्हणावें ते अनाथ। समर्था तूं दीनानाथ।
म्हणावें ते पतित। तूं पतितपावनु ॥ ४ ॥

म्हणावें ते परम किंकर। देवा तूं करुणाकर।
म्हणावें ते निराधार। आधार इच्छी ॥ ५ ॥

सत्य मिथ्या तुझा म्हणवी। त्याची चिंता असों द्यावी।
ऐसी हे करुणा करावी। नाना प्रकारीं ॥ ६ ॥

तुम्हां दासांमध्यें मी हीन। माझे कोट्यावधी अवगुण।
परंतु आहे अनन्य। सेवक रघुनाथाचा ॥ ७ ॥

पुढें म्यां ऐसे चि असावें। माझें मन न पालटावें।
इतुकें देवाशीं मागावें। तुम्ही बंधुवर्गीं ॥ ८ ॥

प्रत्यहीं माझा नमस्कार। देवाशीं करावा निरंतर।
मजकारणें शरीर। इतुकें कष्टवावें ॥ ९ ॥

बाल वृद्ध नर नारी। सकल भक्त कुमार कुमारी
समस्तांसी नमस्कारी। कृष्णातीरवासी ॥ १० ॥

शुद्ध उपासना विमल ज्ञान। वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण।
गुरुपरंपरेचें लक्षण। शुद्ध मार्ग ॥ ११ ॥

ऐसें हें पंचधा बोलिलें। इतुकें पाहिजे यत्नें केलें।
म्हणिजे सकळ हि पावलें। म्हणे दासानुदास ॥ १२ ॥

(३) यांत श्री समर्थ स्वतःस कृष्णातीरवासी म्हणत आहेत, तेव्हां हें पत्र १५६६ च्या पूर्वीचें नसावें, हें निर्विवाद आहे. ते स्वतःला निराधार समजत आहेत, तेव्हां तोपर्यंत चाफळास रामाची स्थापना झाली नसावी, असें दिसतें. शिवाय पंचवटीच्या रामाकडे त्यांचें लक्ष इतकें लागलेलें पाहून हि मनांत येतें कीं, चाफळास रामाची स्थापना होण्यापूर्वीचें हें पत्र असावें. चाफळास रामाची स्थापना १५७० त झाली. म्हणून त्यांनीं हें पत्र पंचवटीच्या रामाच्या उपासकांना १५६६ आणि १५७० यांच्या मध्यंतरींच्या काळांत लिहिलें असावें असें माझें अनुमान आहे. तिसऱ्या ओवींतला 'पडलों' शब्द तर आपल्याशीं पुष्कळ च बोलतो. श्रीसमर्थ म्हणतात, 'आणि मी पडलों दुरी देशीं.' कां बरें, कोणी एवढा आग्रह केला? इतका जर मनाचा ओढा पंचवटीच्या रामाकडे च होता, तर पंचवटी सोडली च कां? पंचवटीचे सारे लोक—

म्हातारे कोतारे, स्त्रिया पुरुष, मुलें मुली—श्रीसमर्थांना किती भाग्यवान् वाटत आहेत, पहा. त्यांच्या भाग्याचा हेवा वाटून ते ‘बाल वृद्ध नर नारी। सकल भक्त कुमार कुमारी।’ या सर्वांच्या वयाकडे आणि अधिकाराकडे न पाहतां सर्वांना नमस्कार करीत आहेत! इतकें पंचवटीनें त्यांचें चित्त वेधून घेतलें होतें, तर ते पंचवटीस च जाऊन कां राहिले नाहींत? तुम्हीं मात्र देवापाशीं निकट आहांत आणि मी हा असा दूर येऊन पडलों आहे, असें ते म्हणतात, यावरून ते केवळ स्वेच्छेनें कृष्णातटाकीं गेले नसावेत, कोणाशीं तरी, कांहीं तरी संकेत ठरून नाशिकपंचवटी सोडून ते मसूरकडे गेले असावेत, असें वाटतें.

(४) या ‘पडलों’ शब्दाच्या मागें थोडासा इतिहास दडलेला दिसतो. तीनशें सवा तीनशें वर्षांमागच्या तत्प्रांतीय स्थितीचें आज आपल्याला बरोबर आकलन होणें कठीण आहे. असें दिसतें कीं, विजापुराहून निघून उत्तर कोकणांत उतरावयाचें तर मार्गांत मसूरचें ठाणें बरेंच महत्त्वाचें होतें. त्या मसूरची देशमुखी मूळची जगदळे यांची. या जगदळे घराण्यांतील एकसष्ट कागद, मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें—खंड पंधरावा यांत प्रकाशित झालेले आहेत. त्या कागदपत्रांवरून असें दिसतें कीं, मसूरची देशमुखी जगदळ्यांकडून काढून शहाजी राजे यांनीं स्वतःकडे घेतली होती. ती परत मिळावी म्हणून जगदळ्यांनीं प्रयत्नाची पराकाष्ठा केली. शहाजी राजांच्या पश्चात् श्रीशिवाजीमहाराजांकडे हि त्यांनीं माता जिजाई यांच्या मार्फत रदबदली करून पाहिली, परंतु महाराजांनीं स्पष्ट फर्माविलें कीं, दुसरें कांहीं मागा, पण मसूरच्या देशमुखीची गोष्ट सुद्धां काढूं नका. इतकें ज्या स्थानाचें महत्त्व, नेमकें त्या च भागांत जाऊन श्रीसमर्थ तळ देऊन राहतात, यांत कांहीं राजकारण नसेल च, असें कसें म्हणावें? श्रीसमर्थ नाशिकपंचवटी भागांत ज्या काळांत पुरश्चरणार्थ राहिले होते, त्या काळांत नाशिकत्र्यंबक हा टापु शहाजी राजांच्या ताब्यांत होता व त्या भागांत त्यांचें वास्तव्य हि होत असे. त्यावरून साहजिक मनांत येतें कीं, या दोघां महापुरुषांच्या भेटीगांठी होऊन व संकेत ठरून च श्रीसमर्थांचें मसूरकडे जाणें झालें असावें. नाहीं पेक्षां, मी तर असा दूर येऊन पडलों आहे, या श्रीसमर्थांच्या म्हणण्याला कांहीं अर्थ च राहत नाहीं! पंचवटीच्या रामाकडे

इतकें चित्त लागलें असून श्रीसमर्थांना पंचवटी सोडून मसूरभागांत राजकारणानें नेलें, असें म्हणावें लागतें.

(५) पत्राचा काळ वगैरे ठरविण्याच्या दृष्टीनें मी हीं कांहीं अनुमानें सुचविलीं. परंतु आज आपणांस येथें त्या अनुमानांशीं विशेष कांहीं कर्तव्य नाहीं. अशीं अनुमानें काढीत बसलों तर माझें विचारूं च नका ! श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेला प्रत्येक शब्द–नव्हे, अर्धशब्द–मला पवित्र, अर्थपूर्ण आणि गूढ वाटत असतो, अशी टीका माझे चिकित्सक मित्र मजवर करीत असतात. असल्या टीकेंत अर्धशब्द योजण्यांत माझी चेष्टा करण्याचा जरी टीकाकारांचा भाव असला, तरी त्यांची टीका एकंदरींत मला खोटी वाटत नाहीं. कशासाठीं तरी हपापलेल्या माझ्या मनाची तशी वेड्यासारखी स्थिति झाली आहे खरी. खरोखर च श्रीसमर्थांनीं उच्चारलेला प्रत्येक महत्त्वाचा शब्द मला विचार करावयास लावतो. प्रस्तुतच्या पत्रांतील प्रत्येक ओवीवरून मला एक एक अनुमान सुचत आहे, इतकें हें पत्र मला महत्त्वाचें वाटतें. तें आहे च तसें आकर्षक. श्रीसमर्थहृदयांतील भगवत्प्रेम या पत्रांतील प्रत्येक शब्दानें व्यक्त होत आहे. पण हीं सारीं अनुमानें भावनेच्या वाचकांना हि सुचण्यासारखीं आहेत. तेव्हां तीं मनांतल्या मनांत च दाबून ठेवून प्रस्तुत विवेचनाच्या दृष्टीनें, या पत्रांतील शेवटच्या ज्या महत्वाच्या दोन ओव्या त्यांचा च तेवढा आतां आपण विचार करूं.

(६) पत्रांतील अकराव्या ओवींत श्रीसमर्थ पंचविध लक्षणात्मक शुद्ध मार्ग सांगत आहेत :

> **शुद्ध उपासना विमल ज्ञान । वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।**
> **गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्ध मार्ग ॥**

विरक्तानें स्वतः शुद्ध मार्गानें जावें, तो मार्ग इतरांस दाखवावा आणि त्यांना त्या मार्गाला लावावें, असें विरक्तलक्षणांच्या समासांत (२ × ९) श्रीसमर्थ म्हणतात; तसें च शुद्ध मार्ग सोडूं नका, असें आपल्या निःस्पृह शिष्यांना १४ × १ त बजावीत आहेत; पण शुद्ध मार्ग म्हणजे काय, तें या पत्राशिवाय अन्यत्र कोठें सांगण्यांत आलेलें नाहीं. याला च कोठें कोठें पुण्यमार्ग हि म्हटलेलें आहे. शुद्ध उपासना, विमल म्हणजे तरी शुद्ध च, शुद्ध ज्ञान, वीतराग म्हणजे वैराग्य, ब्राह्मण्यरक्षण आणि गुरुपरंपरेचा सांभाळ अशीं हीं

शुद्ध मार्गाचीं पांच लक्षणें होत. हा शुद्ध मार्ग म्हणजे च संप्रदायाचें जें मुख्य अंग—हरिकथानिरूपण—तें होय, असें मी, चवथ्या दशकाचा कीर्तन-भजनाचा म्हणजे च हरिकथानिरूपणाचा जो दुसरा समास आहे, त्यावरून म्हणतों. त्या समासांत, या च क्रमांत नसलीं तरी, बरोबर हीं च लक्षणें आलीं आहेत.

**ब्राह्मण्य रक्षावें आदरें। उपासनेचीं भजनद्वारें।**
**गुरुपरंपरा निर्धारें। चळो च नेदावी॥ ४–२–२०**

**करावें वैराग्यरक्षण। रक्षावें ज्ञानाचें लक्षण।**
**परम दक्ष विचक्षण। सर्व हि सांभाळी॥ २१**

एक तें सहा दशकांची रचना १५८१ त झाली, हें आपण हृदयांत पाहिलें आहे. ग्रन्थराजाच्या अगदीं पहिल्या समासांत सांगितल्याप्रमाणें या सहा दशकांत

**बहुधा अध्यात्मनिरोपण। निरोपिलें॥**

आहे. अध्यात्मनिरूपण, हरिकथानिरूपण, धर्मकारण, हीं एक च. अर्थात् हीं पांच लक्षणें म्हणजे च श्रीसमर्थांचें धर्मकारण होय. त्या धर्मकारणाचीं आणखी अंगें असतील, पण त्यांत हीं पांच मुख्य होत, तीं इतकी कीं, पत्रांतील बाराव्या ओवींत श्रीसमर्थ म्हणतात, तुम्ही हीं पांच लक्षणें सांभाळलीत, म्हणजे मला सर्व कांहीं पावलें, तुमच्यापासून आणखी मग मी कशाची अपेक्षा करीत नाहीं.

**म्हणिजे सकळ हि पावलें। म्हणे दासानुदास॥ १२**

या पांच गोष्टी करा, म्हणजे माझें तुमच्यापाशीं आणखी कांहीं मागणें नाहीं, असें श्रीसमर्थ म्हणतात, तेव्हां त्यांना हीं पांच लक्षणें किती महत्त्वाचीं वाटत होतीं, याचा श्रीसमर्थाभिमानी महाराष्ट्रानें विचार करावा. श्रीसमर्थांना जें जें कांहीं पाहिजे होतें तें तें सर्व या पांचांत आलें. त्यांना पुष्कळ च पाहिजे होतें. त्यांना

**ऐसा पाहिजे कीं राजा। कैपक्षी परमार्थी॥**

तो हि यांत आला? हो, आला. त्यावांचून धर्मरक्षण होईल च कसें?

'तुम्ही या पांच गोष्टी करा, म्हणजे मला सर्व कांहीं पावलें,' या श्रीसमर्थांच्या आश्वासनांत त्यांची कृपा संपादन करण्याचा मला सरळ मार्ग दिसत आहे. म्हणून या पांच हि लक्षणांचा आपण पृथकपणें सविस्तर विचार केला पाहिजे, असें मला वाटतें.

(७) तसें करण्याला आरंभ करण्यापूर्वीं, त्या काळांत या पांच गोष्टीवर श्रीसमर्थांनीं इतका भर द्यावा, तेव्हां तत्कालीन समाजस्थिति कशा प्रकारची होती, याची जर आपणांस कांहीं कल्पना करतां येईल, तर आज हि आपल्या मनांत या पांच गोष्टी विशेष भरतील, म्हणून आपण तत्कालीन स्थितीचा थोडक्यांत विचार करूं. तत्कालीन जें कांहीं थोडें वाङ्मय माझ्या अवलोकनांत आलें आहे, त्यावरून असें दिसतें कीं, राष्ट्रांत पाखंड मत फार माजलें असावें. श्रीसमर्थांचे दोन च ठिकाणचे उद्गार पाहिले, तरी माझें हें म्हणणें वाचकांस पटेल.

**ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले ।**
**गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ॥ १४-७-३१**

**कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पीरास भजती ।**
**कित्येक तुरुक होती । आपुले इच्छेनें ॥**

**ऐसा कलयुगींचा आचार । कोठें राहिला विचार ।**
**पुढें पुढें वर्णसंकर । होणार आहे ॥ ३३**

इत्यादि ओव्या सर्वांच्या परिचयाच्या आहेत. या ओव्या समाजाची स्थिति कशी झाली होती म्हणून दर्शवितात ? विशेषतः ब्राह्मणांत आचार विचार कांहीं राहिला नव्हता व एकंकाराची भीति डोकावूं लागली होती ! एकवीससमासीच्या विसाव्या समासांतील वर्णनानें या परिस्थितीवर विशेष च प्रकाश पडतो.

**कलियुगाचें बहुत बळ । जाली मायोपाधी सबळ ।**
**जन हे प्रपंची सकळ । मायाजाळें वेष्टिले ॥** ए २०-५

**आदरें भोगावा भोग । आणि स्वधर्माचा करावा त्याग ।**
**या नांव शरीरपांग । केवळ विषई ॥ २०-२१ ॥**

**आतां असो हे बोलणें । स्वधर्म चळला ज्ञातेपणें ।**
**ते पाषांड कोटीगुणें । विषयासक्त ॥ २२ ॥**

**नाना मतांचे अडताळे । शब्दज्ञानें क्रिया चळे ।**
**तेणें शुद्ध ज्ञान मावळे । उठे मतांतर ॥ २३ ॥**

**जाणते चि पुरुष अविचार । धरूनि घेती मतांतर ।**
**तेणें संगें इतर । भाविक चळती ॥ २४ ॥**

यांतील शेवटच्या ओवीकडे विशेष लक्ष जाण्यासारखें आहे. समाजांत जे थोर आणि जाणते लोक, नेते म्हणून मानले जातात, ते च आधीं चळतात, आपलें असेल तें टाकतात, दुसऱ्याचें घेतात आणि मग त्यांचा जो भाविक अनुयायी वर्ग असतो, तो डोळे मिटून तसें च आचरण करूं लागतो आणि अखेरीस एकंदर समाज च शुद्ध मार्गापासून ढळून आडमार्गाला लागतो. त्याला शुद्ध मार्ग दाखवून पुन्हां ताळ्यावर आणण्यासाठीं श्रीसमर्थांचा संप्रदाय प्रवृत्त झाला.

श्रीसमर्थांचा अवतार होण्यापूर्वीं समाजाचीं कशी अवस्था झाली होती, ती गिरिधरांनीं श्रीसमर्थप्रतापांत अवघ्या दोन ओव्यांत च स्पष्ट दर्शविली आहे.

**सांप्रत कलयुगीं सर्वब्रह्में चालिलीं ।**

सांप्रत म्हणजे आज शके १८६७ त नव्हे, आज काय चाललें आहे तें सर्वांना प्रत्यक्ष दिसत च आहे, तर सांप्रत म्हणजे श्रीसमर्थांच्या जन्माच्या काळीं शके १५३० त.

**सांप्रत कलयुगीं सर्वब्रह्में चालिलीं ।**
**विषयधर्में सत्कर्में लोपलीं ।**
**सकाम उपासनें ज्ञानविज्ञानें हारपलीं ।**
**वेदांतमार्ग उच्छेदिला ॥** प्रताप १–९

**शुद्ध संप्रदाय राहिला ।**
**शबल येकंकार चालिला ॥ १०**

ही स्थिति पालटावी म्हणून राष्ट्रांतील धर्मनिष्ठ विचारवंत सज्जनांचे डोळे परमेश्वराकडे लागले, आणि सर्वांच्या शुद्ध संकल्पाच्या योगानें

**जामदग्निवछगोत्रीं श्रीराणादेवीउदरीं ।**
**स्वयें नारायण समर्थ अवतरले ॥ २३**

(८) येथें ओघांत म्हणून सांगण्यास हरकत नसावी कीं, श्रीसमर्थ संप्रदायांत एकंकार नसे व नसावा, पण सर्वांचा एक विचार असे व असावा.

**समर्थसंप्रदाईं येकंकार नाहीं।**
**येक विचार निरंतर पाही॥** प्रताप ७-४०

**आणि म्हणून च तो प्रभावी ठरला व ठरो; असो.**

आपल्या पंचविध लक्षणांच्या ओवींतील शुद्ध शब्द आणि गिरिधरांच्या ओव्यांत आलेला तो च शब्द, याकडे वाचकांचें लक्ष गेलें च असेल. श्रीसमर्थांच्या वेळीं देशांत नाना पंथ आणि नाना मतें बोकाळलीं होतीं. ते च सांगतात कीं, सर्वत्र मतामतांचा गलबला माजला होता, कोणी कोणाला विचारीत कीं पुसत नव्हता, जो ज्या मतांत, कशानें हि म्हणा, परिस्थितीनें म्हणा, संगतीनें म्हणा, कर्मानें म्हणा कीं यदृच्छेनें म्हणा, जो ज्या मतांत पडे, तो तें च मत धरून बसे. अशा सर्वांच्या पासून आपला मार्ग निराळा आहे, हें दर्शविण्यासाठीं समर्थांनीं आपल्या मार्गामागें शुद्ध हें विशेषण लावलेलें आहे. ते शुद्धतेचे परम भोक्ते होते. त्यांना सर्व कांहीं शुद्ध पाहिजे असे. अगदीं सामान्य गोष्टीपासून तों थेट ब्रह्मापर्यंत सर्व कांहीं शुद्ध पाहून ते त्याचा स्वीकार करीत. असा त्यांच्या उपासनेचा बडिवार होता. पद-पदांतरांच्या उत्तरार्धांतील सातव्या पदांपैकीं जरूरीपुरता भाग पहा—

**सर्व सांग देवा मागावें॥ ध्रु०॥**

**घाटी शुद्ध ते मुद्रा शुद्ध। भाषा शुद्ध ते वाचा शुद्ध।**
**अर्थ शुद्ध अन्वयो शुद्ध॥ ३॥ सर्व सांग०**

**चित्त शुद्ध भावार्थ शुद्ध। भक्ती शुद्ध विश्वास शुद्ध।**
**ज्ञान शुद्ध वैराग्य शुद्ध॥ ७॥ सर्व सांग०**

हा शुद्ध शब्द किंवा त्याचे च विमलासारखे पर्याय शब्द त्यांच्या वाङ्मयांत हजारों वेळां आलेले आढळतील, असें आपण विधान केलें, तर तें चुकीचें ठरण्याचा संभव नाहीं, इतकी—काय म्हणूं?—इतकी त्यांच्या पिंडांत शुद्धता भिनली होती.

(९) श्रीसमर्थांच्या शुद्ध मार्गाला च गिरिधर शुद्ध परमार्थ म्हणत आहेत :

**समर्थें सर्वसंगपरित्याग केला यथार्थ।**
**समर्थासी आज्ञा करितील श्रीरामसमर्थ।**
**धर्मस्थापना भरतखंडीं कृतार्थ।**

**शुद्ध परमार्थ विस्तरले॥** प्रताप २–७१
**मुख्य जगदोद्धार करणें समर्था।**
**शुद्ध विस्तारणें परमार्था।**

**दासबोध ग्रन्थराज विवरणें निजस्वार्था।**
**त्रिकांड वेद प्रमाणें जगद्गुरु॥** प्रताप १०–११

यांतील जगदुद्धार आणि जगद्गुरु या दोन शब्दांकडे आपलें लक्ष जावें. जगाची सुस्थिति (World Order) असावी, सर्वांना सुरक्षितता (World Security) वाटावी, याची चिंता सर्व जन्मभर श्रीसमर्थांनीं वाहिली आणि ह्या च हेतु मनांत आणून त्यांनीं आपला संप्रदाय प्रवर्तित केला. हल्लींच्या काळांतील ते दोन इंग्रजी शब्द म्हणजे च श्रीसमर्थांच्या वेळचा जगदुद्धार होय. ओघांत आलेला ह्या विषय येथें इतका च सोडतो. शुद्ध मार्गापैकीं श्रीसमर्थांच्या उपासनेचा सविस्तर विचार करतांना पुढें आणखी पाहूं. तथापि येथें इतकें सुचवून ठेवण्यास हरकत नाहीं कीं ज्यांना जगांत सर्वत्र सुख आणि शांति हीं नांदावीं, असें खरोखर वाटत असेल, त्यांचें लक्ष श्रीसमर्थो-पदिष्ट शुद्ध मार्गाकडे गेल्यास त्यांत त्यांचें आणि त्यांच्या बरोबर जगाचें हित च आहे.

(१०) गिरिधरांनीं श्रीसमर्थांना अर्पण केलेल्या 'जगद्गुरु' या पदवी विषयीं मात्र मला असें वाटतें कीं, ती श्रीमत् पूज्यपाद आचार्यांची पदवी एकमेव त्यांच्या साठीं च राखून ठेवून आपण श्रीसमर्थांना राष्ट्रगुरु म्हणून च संबोधूं. हें खरें कीं, आचार्यांच्या नंतर सर्व भरतखंडभर मठ स्थापन केले असे श्रीसमर्थांनीं च. फार काय, पण आचार्यांनीं चार दिशांना चार मठ स्थापन केले, तर यांनीं सर्वत्र–अकराशें दिशांना–केले. गिरिधरांनीं त्यांना आचार्यस्वामींची उपमा दिली च आहे :

**समर्थअवतार निरोपमा। आचार्य स्वामीची साजे उपमा।**
**ब्रह्मचर्याश्रमीं परमहंसमहिमा। ब्राह्मण्यरक्षणीं अवतारु॥** प्र. २–९९

**ब्रह्मसूत्र आचार्यदेवें रक्षिलें। ब्रह्मारण्य समर्थदेवें संरक्षिलें।**
**कलियुगीं संन्यासग्रहण आचार्यें चालविलें।**
**विचारसंन्यास समर्थांचे॥** १००

तथापि, संस्कृत ही जगाची भाषा होय व त्या भाषेंत आचार्य बोलले. मराठी

ही महाराष्ट्राची भाषा होय व त्या भाषेंत श्रीसमर्थ बोलले. हें जाणून आचार्य हे जगद्गुरु आणि श्रीसमर्थ हे राष्ट्रगुरु, असें मानणें च मला प्रिय वाटतें. मी इतकें निःशंकपणें म्हणूं शकतों कीं, जगांत सर्वत्र शांततेचें साम्राज्य असावें, असें कधीं काळीं जगाला वाटूं लागेल, मानवांनीं मानवांसारखें वागावें, राक्षसयोनीप्रमाणें वागूं नये, असा बोध जेव्हां केव्हां होईल, तेव्हां सर्वांना श्रीसमर्थांच्या च शुद्ध मार्गाचा अवलंब करावा लागेल.

(११) अशा या कल्याणप्रद मार्गाचीं जीं पांच अंगें त्यांचा आतां आपण स्वतंत्रपणें एकएका प्रकरणांत सविस्तर विचार करूं. मला वाटतें, आपण प्रथम गुरुपरंपरा सांभाळली पाहिजे, विश्वांत भरलेल्या नारायणाची सेवा करण्याची पात्रता वैराग्यानें अंगीं बाणून घेतली पाहिजे, त्यासाठीं आधीं ब्राह्मण्यरक्षण करून चातुर्वर्ण्यव्यवस्था राखली पाहिजे आणि अखेरीस नारायणाच्या उपासनेच्या बळावर भगवंताची कृपा संपादन करून ज्ञानाला अधिकारी झालें पाहिजे. तेव्हां आतां हा च क्रम स्वीकारून आपण मार्गाला लागूं.

---

# सूचना

कांहीं वेळ स्तब्ध बसून पुढच्या पांच हि प्रकरणांचें चिंतन करीत असतां माझ्या मनांत वाचकांची भीति उद्भवली. वाचक विचारतील, या गोष्टी बोलण्याचा या माणसास अधिकार काय ? क्षणाचा हि विलंब न लावतां मी उत्तर देतों कीं, माझा तसा यत्किंचित् हि अधिकार नाहीं. सारें च कांहीं मी बोलत नाहीं. मला जें बोलावयाचें आहे, तें मी वाचकांच्या भूमिकेवरून च बोलण्याचें मनांत आणीत आहें. मी त्यांच्यापासून निराळा होऊं इच्छीत नाहीं. भक्त म्हणजे विभक्त नव्हे, अशी भक्ताची व्याख्या आहे. तेव्हां मी प्रथम वाचकांचा भक्त होऊन त्यांना विनंति करतों कीं, पुढील–पुढील च कां, पुढचीं आणि मागचीं सर्व–प्रकरणें वाचतांना मला क्षमा करा आणि मी बोलत नसून आपण च बोलत आहां, अशा भावनेनें हा ग्रन्थ वाचा. मला आपलें निर्भयतेचें अभिवचन असावें.

## ( ३ ) गुरुपरंपरेचें लक्षण

(१) आमची परंपरा, (२) गुरूची आवश्यकता, (३) गुरूचीं लक्षणें,
(४) आमची निष्ठा, (५) आमचे गुरु आणि त्यांचा आम्हांस
मंत्रोपदेश, (६) श्रीसमर्थांचे गुरु श्रीराम, (७) त्यांच्यावर
श्रीसमर्थांचा किती विश्वास आणि त्यांचा किती
दांडगा निर्धार, (८) सद्गुरुकृपा संपादन
केली पाहिजे, (९) राम कैवारी करा रे,
(१०) समर्थांपुढें आमचें गाऱ्हाणें

**आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ।**
**श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥**

( १ ) ही आमची परंपरा व ती आम्ही सांभाळली पाहिजे, इतकें च नव्हे, तर पुढें हि चालविली पाहिजे. थेटपर्यंत जाऊन पोंचण्याचें आमचें साधन म्हणजे श्रीसमर्थांचे चरण. त्यांच्यापाशीं आमची दाद लागावी, म्हणून आम्ही त्यांचे शिष्य आणि प्रशिष्य यांची हि मनधरणी करणार.

तुमची वर्दी श्रीसमर्थांच्या पर्यंत पोंचवितों, एवढें आश्वासन मिळविण्या-पुरती शिष्यप्रशिष्यांची मनधरणी करावयाची. या शिष्यप्रशिष्यांना आमची खात्री पटावी म्हणून आम्ही कायेनें, वाचेनें आणि मनानें त्यांची जी जी सेवा करणें आवश्यक असेल, ती ती करण्यास नेहमीं तत्पर असणार. ते हि आम्हांस वंदनीय आहेत. त्यांनीं आपलीं जिणीं धन्य केलीं. आम्हांस त्यांच्या भाग्याचा हेवा वाटतो. पण श्रीसमर्थचरणांच्या अलिकडे मात्र कोठें तरी मुक्काम करून समाधान मानून घेण्यास आम्ही तयार नाहीं. श्रीसमर्थांचा श्रीरामचरणांवर जो विश्वास, तो च विश्वास आमचा श्रीसमर्थचरणांवर. त्यांचें च अनुकरण करून आपण हि सर्व जण म्हणूं कीं,

**म्हणोन आम्ही समर्थभक्त । समर्थचरणीं जडलें चित्त ।**
**तेथोन न ढळेल तें यत्किंचित् । कोसळोन पडलें आकाश जऱ्ही ॥**

(२) याप्रमाणें माझ्या समजुतीनें धर्मकारणांतील पहिली आवश्यक गोष्ट म्हणजे श्रीसद्गुरुचरणीं अनन्य भावानें लोटांगण घालणें, ही होय. परमार्थमार्गांत सद्गुरूची आवश्यकता सर्वांनीं निश्चयानें, आग्रहानें आणि स्वानुभवानें प्रतिपादिली आहे. सद्‌गुरूवांचून ज्ञान नाहीं, गति नाहीं, सुटका नाहीं, हा सिद्धान्त आहे. तो सर्व साधुसंतांनींचसा काय, अवतारादिकांनीं हि मानला आहे. विषय निघाला म्हणजे हा सिद्धान्त श्रोत्यांच्या मनावर स्पष्ट शब्दांत बिंबविण्याची संधि श्रीसमर्थांनीं केव्हां हि दवडिली नाहीं. किती स्थळें पहावीं? आपल्या नियमाप्रमाणें तीन पाहूं. कोणती हि गोष्ट त्रिवार सांगितली आणि ऐकिली, म्हणजे जास्त अपेक्षा रहात नाहीं.

## (१) स्फु. ओ. ११३

ज्याचेनि जीतोसी त्यासी चुकलासी। वेर्थ कां जालासी भूमीभार॥ १
भूमीभार जीणें तुझें गुरुवीणें। वचनें प्रमाणें जाण बापा॥ २
जाण बापा गुरूवीण गती नाहीं। पडसी प्रवाहीं मायाजाळीं॥ ३

## (२) स्फु. ओ. ११२

गुरुवीणें प्राणी त्या होये जाचणी। सत्य माझी वाणी मिथ्या नव्हे॥१॥
मिथ्या नव्हे सत्य सांगतों तुम्हाला। अंतीं येमघाला चुकेना कीं॥२॥
चुकेना कीं येमयातना या जना। वेगीं निरंजना ठाई पाडा॥३॥
ठाई पाडा वेगीं देव निरंजन। लावा तनमन सद्गुरूसी॥ ४॥
सद्गुरूसी नाहीं जयाला वोळखी। तया झोंकाझोंकी यातनेची॥५॥
यातनेची चिंता चुके येकसरी। वेगीं गुरु करी दास म्हणे॥६॥

## (३) ५×१

करूनि नाना सायास। केला चौदा विद्यांचा अभ्यास।
रिद्धि सिद्धि सावकास। वोळल्या जरी॥ ५-१-३३

तरी सद्गुरुकृपेविरहित। सर्वथा न घडे स्वहित।
येमपुरीचा अनर्थ। चुकेना येणें॥ ३४

जव नाहीं ज्ञानप्राप्ती। तव चुकेना यातायाती।
गुरुकृपेवीण अधोगती। गर्भवास चुकेना॥ ३५

* * * *

**सद्गुरुवीण जन्म निर्फळ । सद्गुरुवीण दुःख सकळ ।**
**सद्गुरुवीण तळमळ । जाणार नाहीं ॥ ३९ ॥**

*　　*　　*　　*

**मागां जाले थोर थोर । संत महंत मुनेश्वर ।**
**तयांस हि ज्ञानविज्ञानविचार । सद्गुरुचेनी ॥ ४१**

**श्रीरामकृष्ण आदिकरूनी । अति तत्पर गुरुभजनीं ।**
**सिद्ध साधु आणि संतजनीं । गुरुदास्य केलें ॥ ४२**

**सकळ सृष्टीचे चालक । हरिहरब्रह्मादिक ।**
**ते हि सद्गुरुपदीं रंक । महत्त्वा न चढेती ॥ ४३**

थोडक्यांत म्हणजे

**असो जयासी मोक्ष व्हावा । तेणें सद्गुरु करावा ।**
**सद्गुरुवीण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ४४**

(३) वेगीं गुरु करी, हा उपदेश ऐकून, भेटला तो गुरु केला, पण

**गुरूची परीक्षा नेणे । येकाकी पडिला भसे ।**
**गुरु तो जाणता नाहीं । ज्ञानवैराग्यदुर्बळु ॥** स्फु. प्र. ४७–३

याप्रमाणें फसल्यासारखें झालें, पण करतो काय, लोकलाजेस्तव गुरु सोडतां येईना, तसा च त्याला चिकटून राहिला !

**नेणतां ठकला तेथें । आतां तो सांडितां न ये ।**
**लोकीक सांकडी मोठी । भावार्थें रक्षितो बळें ॥ ४**

तात्पर्य, आतां च तेवढे फसणारे बावळे शिष्य व फसविणारे वस्ताद गुरु आहेत आणि तेव्हां नव्हते, असें नाहीं. मनाच्या श्लोकांवरून हि असें च दिसतें. चेटकी, चाळकु, द्रव्यभोंदु, निंदक, मत्सरी, भक्तिमंद, उन्मत्त, व्यसनी, असे आतां प्रमाणें तेव्हां हि गुरूचा धंदा करणारे होते च. सर्व काळ सारखा च म्हणावयाचा. अशा स्थितींत श्रीसमर्थांनीं तेव्हां जो उपाय सुचविला, तो च खरा कीं, सहसा म्हणजे एकदम, पूर्ण विचार केल्यावांचून कोणावर विश्वास टाकूं नये, तर अनेकांना भेटावें, पहावें व त्यांची परीक्षा करीत असावें. आपण हि स्वतः सदाचारी आणि वीतरागी बनल्यावांचून आपणांस सज्जनांची परीक्षा करतां येणार नाहीं. स्वतः साधु होऊन साधूची परीक्षा करावी. याप्रमाणें आपल्या परीक्षेंतून शेंकडोंशें

नापसंत होऊन गेले, म्हणजे एकादा च अनुभवी, प्रत्ययज्ञानी, ब्रह्मनिष्ठ, असा पुरुष आढळावयाचा व तो परीक्षेंत उतरावयाचा ! अशावर मग विश्वास टाकून त्याचे पाय धरावे.

**पृथ्वीमधें बहुत जन । त्यामध्यें असती सज्जन ।**
**परी साधूस वोळखतो कोण । साधुवेगळा ॥ २०-३-२५**

**म्हणौन संसार सांडावा । मग साधूचा शोध घ्यावा ।**
**फिरफिरों ठाईं पाडावा । साधु जन ॥ २६**

**उदंड हुडकावे संत । सांपडे प्रचीतीचा महंत ।**
**प्रचीतीविण स्वहित । होणार नाहीं. ॥ २७**

हें आम्हांपैकीं हजारांत नऊशें नव्याणवांना साधणार नाहीं. सद्गुरु ओळखण्याच्या खुणा जरी आम्हीं ऐकल्या तरी आम्हांस साधूची परीक्षा करतां यावयाची नाहीं. आम्ही फसावयाचे ते फसूं च. तथापि सद्गुरुलक्षणें कानांवरून गेलेलीं असावीं. पूर्वीं ऐकलीं असलीं तरी आणखी एकदां ऐकलेलीं वाया जाणार नाहींत.

**मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळ ज्ञान ।**
**निश्चयाचें समाधान । स्वरूप स्थिती ॥ ५-२-४५**

**याहिवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदास केवळ ।**
**विशेष आचारें निर्मळ । स्वधर्माविषईं ॥ ४६**

**याहिवरी अध्यात्मश्रवण । हरिकथानिरूपण ।**
**जेथें परमार्थविवरण । निरंतर ॥ ४७**

**जेथें सारासारविचार । तेथें होये जगोद्धार ।**
**नवविधा भक्तीचा आधार । बहुत जनासी ॥ ४८**

**म्हणोनि नवविधा भजन । जेथें प्रतिष्ठलें साधन ।**
**हें सद्गुरूचें लक्षण । श्रोतीं वोळखावें ॥ ४९**

**अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य मिष्ठेचें भजन ।**
**तेथें बहु भक्त जन । विश्रांति पावती ॥ ५०**

**जो ब्रह्मज्ञान उपदेसी । अज्ञानअंधारें निरसी ।**
**जीवात्मयां परमात्मयांसी । ऐक्यता करी ॥ ५-२-९**

विघडले देव आणि भक्त। जीवशिवपणें द्वैत।
तया देवभक्तां येकांत। करी तो सद्गुरु ॥ १०

देव आणि भक्त यांच्यांत जणूं वितुष्ट येऊन दोघे एकमेकांपासून दूर झाले, जीव वेगळा आणि शिव वेगळा असा त्यांच्यांत द्वैतभाव उत्पन्न झाला, म्हणजे अशा त्या दोघांना जो एकत्र आणतो, एकरूप करतो, दोघांची गांठ घालून देतो तो सद्गुरु !

भवव्याघ्रें घालूनि उडी। गोवत्सास तडातोडी।
केली देखोनि सीघ्र सोडी। तो सद्गुरु जाणावा ॥ ११

प्राणी मायाजाळीं पडिलें। संसारदुःखें दुःखवलें।
ऐसें जेणें मुक्त केलें। तो सद्गुरु जाणावा ॥ १२

वासनानदीमाहांपुरीं। प्राणी बुडतां ग्लांती करी।
तेथें उडी घालूनि तारी। तो सद्गुरु जाणावा ॥ १३

गर्भवास अति सांकडी। इच्छाबंधनाची बेडी।
ज्ञान देऊन सीघ्र सोडी। तो सद्गुरु स्वामी ॥ १४

फोडूनि शब्दाचें अंतर। वस्तु दाखवी निजसार।
तो चि गुरु माहेर। अनाथांचें ॥ १५

जीव येकदेसी बापुडें। तयास ब्रह्म चि करी रोकडें।
फेडी संसारसांकडें। वचनमात्रें ॥ १६

जें वेदांचें अभ्यांतरीं। तें काढून अपत्यापरी।
शिष्यश्रवणीं कवळ भरी। उद्गारवचनें ॥ १७

या ओव्या वाचतांना किती उल्हास वाटतो ! यापूर्वी त्या शंभरदां वाचल्या असतील—श्रीसमर्थहृदय ग्रन्थांत त्या उद्धृत केलेल्या असणार च—तरी त्या वाचतांना किंवा ऐकतांना आपल्या मनाला चटका लावण्याचें त्या ओव्यांचें सामर्थ्य दर खेपेस वृद्धिंगत च होत आहे ! हा काय चमत्कार म्हणावा ? असें कां होत आहे ? तर अशा महापुरुषाच्या दर्शनासाठीं आपलें मन अति उतावीळ झालेलें आहे म्हणून.

(४) सद्गुरूचीं लक्षणें ऐकलीं, त्यांचें मनन हि केलें, त्यायोगें चित्ताला प्रसन्नता हि वाटली, पण अशा लक्षणांनीं युक्त असलेल्या पुरुषाची परीक्षा

करण्याची पात्रता आमच्या ठायीं नसल्यामुळें आम्ही कोणाच्या तरी नादीं लागून फसण्याचा च संभव फार आहे, अशी भीति वाटते. हा संभव च उरूं न देण्याला मला एक च मार्ग दिसतो,

**सतीला पती दूसरा शोधवेना।**
**दुजा जन्मकू बोलणें हें घडेना॥** करुणा २८

या कठोर न्यायाला अनुसरून

**समर्थाविणें सद्गुरु अन्य नाहीं।**
**असा निश्चयो जाहला आमुचाही॥**

म्हणून, महाराज, आमची प्रार्थना ऐका, आम्हांस दूर लोटूं नका आणि वणवण हिंडावयास लावूं नका. आम्ही आमचें सर्वस्व आपल्या चरणीं अर्पण करून आपले पाय धरले, ते आतां आम्ही कांहीं केल्या सोडणार नाहीं. आपण च आतां आमच्या निष्ठेची परीक्षा पहा आणि आम्ही आपल्या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यास क्षणाचा हि विलंब न लावतां आम्हांस दर्शन देऊन कृतार्थ करा.

**लागतां सद्गुरुवचनपंथें। जालें ब्रह्मांड पासथें।**
**तरी जयाच्या शुद्ध भावार्थें। पालट न धरिजे॥** ५-३-५१

अशा निर्धारानें आम्ही आपणांस शरण आलों आहोंत. आम्ही इतर सर्वांस पूज्य मानतो, पण कोणापासून कांहीं मिळवायाचें आहे, या आशेनें आम्ही दुसऱ्या कोणाच्या हि तोंडाकडे पाहण्यास तयार नाही. तुम्ही च आमचें काय करावयाचें असेल तें करा.

**तारा अथवा मारा। तुमच्या मना ये तें करा।**
**अनाथ मी अपराधी। अंतीं दास तुमचा खरा।**

आपल्या चरणांशिवाय आतां आम्ही दुसरें कांहीं जाणत नाहीं.

(९) आमची ही निष्ठा पाहून कोणी आम्हांस वेड्यांत काढून मनांत अशी शंका आणील कीं, पण हें व्हावें कसें? श्रीसमर्थ होऊन गेले, आतां त्यांचें काय उरलें? असला भलता च हट्ट सफल कसा व्हावा? या प्रश्नाला आमचीं दोन उत्तरें आहेत. तीं आम्ही कदाचित पूर्वीं कोठें दिलीं हि असतील. पुन्हां देतों. एक तर, ते होते आणि गेले, ही भाषा हि आम्ही

मानीत नाहीं. ते कधीं जन्माला आले नव्हते आणि कधीं गेले हि नाहींत. त्यांनीं १५३० ते १६०३ अवतार घेतला होता, तेव्हां ते सर्वांच्या नजरेस पडले, पण ते पूर्वीं हि होते, तेव्हां तर होते च आणि नंतर हि आहेत. ते नव्हते असा काळ कधीं च नव्हता. वरील प्रश्नाला आमचें दुसरें उत्तर असें आहे कीं, त्यांचे कोड जसे रामानें पुरविले, तसे आमचे आतां यांनीं पुरविले पाहिजेत. त्यांचा हट्ट जर चालला आणि सफल झाला, तर आमचा सफल होण्यास काय हरकत असावी ? हरकत एक च संभवते व ती जमेस धरून च आम्ही आमचा हट्ट चालविणार. त्यांची जशी श्रीरामचरणीं अढळ निष्ठा होती, तशी आमची श्रीसमर्थचरणीं नसेल तर आमचा हट्ट वाया जाईल, पण त्यांना जसे रघुनाथजीवेगळे कोणी जिवलग नव्हते, तसे आम्हांस श्रीसमर्थावेगळे कोणी जिवलग वाटणार नाहीं, तर आमचा हट्ट त्यांनीं पुरविला च पाहिजे; असो. हा विषय सर्वस्वीं भावनेचा असल्यामुळें तो येथें च सोडून देणें बरें. ज्याची जशी भावना आणि अनुभव हीं असतील, तसें तो विश्वासानें मानून चालेल.

त्यांनीं आम्हांस मंत्रोपदेश हि कायमचा देऊन ठेवला आहे. तो करुणाष्टकांतील ७४ व्या अहल्योद्धार अष्टकांत विषयाच्या ओघांत अष्टकाचा शेवट करतांना सहजगत्या आला आहे.

**म्हणे दास हा राम तत्काळ पावे । करी संकटीं सेवकाचे कुडावे**
**प्रतापें चि ब्रह्मादिकां सोडवीले । महीमंडळालागि आनंदवीले ॥ १६**

**बहु जाड उपासना जाड कीर्ती । प्रतापें बळें आगळा धर्ममूर्ती ।**
**तयाच्या गुणें हें जिणें धन्य जालें । बहु सेवकांलागि तें येश आलें ॥१७**

**सीता राम सौमित्र शत्रुघ्न बंधु । मरुत्सून सुग्रीव बिभीषणादौ ।**
**अती नम्र साष्टांग भावें स्वसर्गा । नमस्कार माझा तया अष्टवर्गा ॥ १८**

अशी प्रस्तावना करून व स्वतःचा अनुभव सांगून आणि आठ हि जणांना नमस्कार करून श्रीसमर्थ त्रयोदशाक्षरी मंत्राचा मोघम उल्लेख करीत आहेत, प्रतिज्ञापूर्वक त्याचा प्रभाव सांगत आहेत आणि जप करावयाची आज्ञा करीत आहेत. ती आज्ञा आपण पाळणार किंवा नाहीं ? आज्ञेंतील अंतरीं शब्दाकडे अवधान असावें.

तुला सांगतों गूज हा बीजमंत्र ।
जेणें नीरसे थोर संसारशत्रु ।
नव्हे मिथ्य हें बोलणें सत्य वाचा ।
जपा अंतरीं मंत्र तेराक्षरांचा ॥ १९

हा झाला मोघम उल्लेख, पण एकवीससमासीच्या पंधराव्या समासांत श्रीसमर्थांनीं सर्वांना उघड मंत्रोपदेश दिलेला आहे. त्याच्या च तर आधारावर मी नेहमीं म्हणत असतों कीं, मंत्रोपदेशासाठीं आम्हांस केव्हां हि दुसऱ्या कोणाच्या तोंडाकडे पहावयास नको.

आतां हि जयासी वाटे भेटावें । रामें मज सांभाळीत जावें ।
ऐसें दृढ घेतलें जीवें । तरी ऐका मी सांगेन ॥ ए. १५-३७

असें म्हणून लागलीं च निश्चयात्मक सांगतात :

श्री राम जय राम जय जय राम ।
ऐसा कांहीं येक धरूनि नेम ।
जप कीजे तेणें आत्माराम ।
जोडेल नेमें ॥ ३८

नंतर जप केव्हां, कोठें, कसा करावा, याविषयीं कांहीं सूचना देऊन ठेवलेल्या आहेत. त्यांत मुख्य सूचना अशी आहे कीं,

परी कोण्हासी कळों नेदावा ।
जप अंतरीं च करावा ।
जैसा कृपणासी धनठेवा ।
सांपडला येकांतीं ॥ ३९

परंतु या सक्त सूचनेकडे हल्लीं कित्येक सांप्रदायिकांना बिनदिक्कत दुर्लक्ष्य करतांना पाहून मला मोठें आश्चर्य वाटत असतें.

(६) याप्रमाणें श्रीराममंत्र हा उघडा मंत्र आहे. तो आम्हांस श्रीसमर्थांपासून मिळाला आणि त्यांना तो श्रीरामचंद्रापासून मिळाला होता. त्यांचे गुरु श्रीराम याविषयीं शंका नको. याला प्रत्यक्ष त्यांच्या च वचनांचा आधार आहे.

**पंकजीं मन मुरे सद्गुरुपादपंकजीं मन मुरे ॥ ध्रु० पू. प. ५**
**मनीं मनपण सर्व हि आपण। तेणें गुणें हांव पुरे। १**
**परब्रह्मीं थार होतां अगोचर। तेणें गुणें माया विरे ॥ २**
**निजपदीं मन जडतां अभिन्न। निखळ सुख उरे ॥ ३**
**हें चि हें साधन आत्मनिवेदन। मीपण तें हि नुरे ॥ ४**
**रामदासीं रामरूप निजधाम। पावतां निःसंग रे ॥ ५**

हें जें गिरिधरलिखित पूर्वार्धांतील श्रीसमर्थांचें पांचवें सुंदर पद, त्यांतून हा च अर्थ निघत नाहीं काय, कीं श्रीसमर्थ श्रीरामाला च आपला गुरु मानीत आहेत? इच्छा करणें हा ज्या मनाचा धर्म तें सद्गुरुचरणकमलीं भृंगवत् जडून बसेल तर इतर सर्व वासनांचा क्षय होणार नाहीं काय? परब्रह्माच्या ठिकाणीं आपण लीन होऊन राहिल्यावर आपल्या पुढें माया आपलें डोकें वर तरी काढूं शकेल काय? आपल्या मूळ स्वरूपाशीं मन एकरूप होऊन गेल्यावर ब्रह्मानंदाशिवाय दुसरी कोणती हि वृत्ती शिल्लक राहील काय? असे तीन दृष्टान्त देऊन जेव्हां श्रीसमर्थ म्हणतात कीं, सद्गुरुपादपंकजीं आपलें मन लीन होऊन गेलें आहे आणि रामाचें स्वरूप हें च आपलें निजधाम व तें प्राप्त करून घेऊन आपण निस्संग झालों आहोंत, तेव्हां या त्यांच्या वचनांतून श्रीराम हे च त्यांचे गुरु होत, असा अर्थ निघत नाहीं काय?

पण एखाद्या वचनाचा अर्थ लावीत बसण्याची इतकी पंचाईत हवी कशाला? ज्या समासांत श्रीसमर्थांनीं सर्व सांप्रदायिकांना यावच्चंद्रदिवाकरौ मंत्रोपदेश करून ठेवलेला आपण नुकता च पाहिला, त्या समासांत च ते आपल्या शिष्याला स्पष्ट शब्दांत म्हणत आहेत कीं,

**राम स्वामी जाण माझा। तरी तो तुज होये आजा ॥**

तूं माझा शिष्य, तेव्हां माझे स्वामी श्रीराम हे तुझे आजोबा लागतात! येथें आतां काय शंका उरली कीं, श्रीसमर्थांचे गुरु श्रीराम होत?

इतकें हि तरी कशाला? दशक पांचवा, समास सहावा, ओव्या ३३ ते ४४, यापुढें जास्त प्रमाणांची अपेक्षा कोणीं करील काय? या च ओव्यांना अनुलक्षून श्रीसमर्थप्रतापांत गिरिधरांनीं म्हटलें आहे कीं,

**श्रीरामसमर्थें कर्णीं उपदेशिलें गुजगोप्यवचन ।**
**समर्थांचें समर्थें केलें गुरुवाक्यश्रवण ।**
**तेथील कोण सांगेल महिमान ।**
**ग्रन्थगर्भीं वदतां न ये ॥** प्र. २–९५

**श्रीदासबोधीं गुरुवाक्य प्रगट केलें ।**
**कर्म उपासना ज्ञान विज्ञान विवरिलें ।**
**संतसज्जनासी अनुभवा आलें ।**
**मी काय जाणे निजवर्म ॥ ९६**

श्रीसमर्थांचे एक परम अधिकारी आणि व्युत्पन्न शिष्य तिसगांवमठपति श्रीदिनकर यांनीं स्वानुभव दिनकर ग्रन्थ लिहून श्रीसांप्रदायिकांवर महदुपकार केले आहेत. त्या ग्रन्थाकडे आणि त्याच्या कर्त्याकडे पुढें प्रत्यंतराच्या प्रकरणांत आपणांस वळावयाचें च आहे. येथें प्रस्तुत प्रश्नापुरता त्या ग्रन्थाच्या १५ व्या कलापाच्या ५ व्या किरणांत जो महत्त्वाचा गत इतिहास व भावी आश्वासन हीं आलीं आहेत, तीं वाचकांच्या नजरेस आणावयाचीं आहेत.

**रामदासीं श्रीराम आराधिला । आराधूनि गुरुत्वें वरिला ।**
**स्वरूपसाक्षात्कार करूनि साधिला । प्रपंच परमार्थ ॥** स्वानु. १५-५-३६

**श्रीरामचंद्रें रामदासासी । जेव्हां केलें निजअनुग्रहासी ।**
**तेव्हां निरविलें श्रीहनुमंतजीसीं । रामदास परंपरा ॥ ४१**

**जितुके रामदासांचे शरणागत । जाले आणि होणार परंपरागत ।**
**तितुक्यांचा साहकारी श्रीहनुमंत । सुखदुःखीं तो स्मरावा ॥ ४९**

**केलिया मारुतीचें निजस्मरण । तत्काळ होइजे सुखसंपन्न ।**
**दुःख संकट महा विघ्न । स्मरणमात्रें नाश पावे ॥ ४३**

या च कथाभागाला मेरुस्वामींनीं हि आपल्या रामसोहळा ग्रन्थांत दुजोरा दिलेला आढळतो :

**राघवभक्तपरंपरेसी । भीम संरक्षिता निश्चयेसीं ।**
**दमूनि काळकृतांतासी । पाववी श्रीरामीं ॥** सो ११–१–६८

**तो अकरावा रुद्र विख्यात । भक्तसंरक्षण करी कृतार्थ ।**
**समर्थें आर्जऊनि परमार्थ । वंश तया निरविला ॥ ६९**

**राम-समर्थ-भीमकृपें । पावन होईजे स्वरूपें ।**
**समर्थपरंपरेसी प्रतापें । रुद्र संरक्षिता ॥ ७०**

या आश्वासनाचा सांप्रदायिकांना केवढा आधार वाटावा ! त्यावर विसंबून त्यांनीं किती उत्साहानें आणि निश्चयानें श्रीसमर्थसेवेला लागलें पाहिजे. पण दृश्य काय दिसून येत आहे ? या आश्वासनावर विश्वास असल्याचें, कां नसल्याचें ? आम्ही कोणावर विश्वास टाकणार ? श्रीसमर्थांवर तरी ?

**हनुमंत आमुची कुळवल्ली । राममंडपा वेला गेली ।**
**श्रीरामभक्तीनें फळली । रामदास बोले या नांवें ॥ १**

**आमुचे कुळीं हनुमंत । हनुमंत आमुचें मुख्य दैवत ।**
**तयावीण आमुचा परमार्थ । सिद्धीतें न पवे कीं ॥ २**

**साह्य आम्हांसी हनुमंत । आराध्य दैवत श्रीरघुनाथ ।**
**सद्गुरु श्रीराम समर्थ । काय उणें दासासी ॥ ३**

**दाता येक रघुनंदन । वरकड लंडी देईल कोण ।**
**तया सोडोन आम्ही जन । कोणा प्रती मागावें ॥ ४**

**म्हणोन आम्ही रामदास । रामचरणीं आमुचा विश्वास ।**
**कोसळोन पडो रे आकाश । आणिकाची वास न पाहूं ॥ ५**

**स्वरूप संप्रदाय अयोध्या मठ । जानकी देवी श्रीरघुनाथ दैवत ।**
**मारुती उपासना मार्ग नेमस्त । वाढविला परमार्थ रामदासीं ॥ ६**

(७) या सहा ओव्यांवरून श्रीराम हे श्रीसमर्थांचे गुरु होत, हें तर सिद्ध होत च आहे, पण त्याशिवाय श्रीरामावर त्यांचा किती अढळ विश्वास होता आणि त्यांचा निर्धार हि किती दांडगा होता, हें आपल्या निदर्शनास येत आहे. श्रीराम म्हणजे आपलें सर्वस्व, कशा हि विपत्तिकाळीं ते आपली उपेक्षा करणार नाहींत, या विश्वासामुळें श्रीसमर्थांच्या ठिकाणीं अत्यंत निर्भयता उत्पन्न झाली होती. इतकी कीं, त्यांनीं जगाला आव्हान देऊन ठेवलें आहे, कीं जो श्रीरामाचा एकनिष्ठ सेवक झाला त्याच्याकडे वांकड्या नजरेनें पाहण्याची कोणाची प्राज्ञा असेल, त्यानें पुढें यावें. त्यांना विश्वास होता कीं, जो कोणी आपणांस अपाय करण्याचें योजील, त्याचा श्रीराम च

परभारें घोट घेतील. अशा या त्यांच्या विश्वासाचीं आणि निर्भयतेच्या निर्धाराचीं स्फूर्तिदायक खरोखर च हजारों वचनें त्यांच्या वाङ्मयांत आढळतील. तथापि त्यांपैकीं माझ्या जिव्हाग्रीं बसलेलीं तीं दोन पदें, हृदयांत आलींच असलीं पाहिजेत, हें निःसंशय असलें, तरी या ठिकाणीं तीं अशासाठीं देण्याचें मनांत येतें कीं, असा विश्वास आणि असा निर्धार आम्हां सांप्रदायिकांच्या ठिकाणीं श्रीसमर्थांविषयीं बाणला पाहिजे, हा बोध आम्हांस व्हावा. गुरुपरंपरेचें लक्षण सांभाळावयाचें तें हें असें. गुरुपरंपरा चळूं द्यावयाची नाहीं ती ही या रीतीनें.

## त्यांचा विश्वास—पद २८ वें

आम्हां ये प्रपंचीं कोणी नाहीं सखा।
येका रघुनायका वांचुनीया॥ १॥

विद्या वैभव धन मज कृपणाचें।
जीवन जीवाचें आत्मारामु॥ २

आकाश अवचितें वरी कोसळेल।
मज तेथें राखेल आत्मारामु॥ ३

आपंगिलें मज श्रीरामसमर्थें।
ब्रह्मांड पालथें घालूं शके॥ ४

वक्रदृष्टी पाहतां भरील त्याचा घोंट।
काळाचें हि पोट फाडूं शके॥ ५

रामदास म्हणे मी शरणागत त्याचा।
आधार सकळांचा मुक्त केला॥ ६

## त्यांचा निर्धार—पद २९ वें

जठरीं लागो क्षुधा होत नाना आपदा॥
भक्तिप्रेम कदां न सोडी सत्य॥ १

शब्द न फुटे तरी चिंतीन अंतरीं।
भक्तिप्रेम परी न सोडी सत्य॥ २

दाहूं वडवानळ अथवा दंशूं काळ।
भक्तिप्रेम प्रबळ न सोडी सत्य॥ ३

नानापरी आघात चिरकाळ होत।
नामीं प्रेमामृत न सोडी सत्य ॥ ४

आतां चि हा देहो राहो अथवा जावो।
रामीं प्रेमभावो न सोडी सत्य ॥ ५

म्हणे रामीरामदास वरी पडो आकाश।
राघवाची कास न सोडी सत्य ॥ ६

हीं पदें तुमच्या पाहण्यांत, वाचण्यांत आणि कदाचित् पाठांत हि असतील, पण आज आपणांस त्यांचा निराळ्या दृष्टीनें विचार करावयाचा आहे. निराळी दृष्टी ती ही च कीं, अशा विश्वासाचे, निर्धाराचे, निर्भयतेचे आणि सामर्थ्याचे संप्रदायप्रवर्तक आमच्या शिरीं असतां, संप्रदायाला जी दैन्याची कळा आलेली दिसते, तिची जबाबदारी कोणावर ? श्रीसमर्थांचे म्हणविणारांनीं याचा आपल्या मनाशीं च विचार केला पाहिजे.

(८) विचार हा च कीं, असला विश्वास श्रीसमर्थांविषयीं आपणास वाटला पाहिजे आणि त्यांच्या प्रमाणें च आपला हि निर्धार झाला पाहिजे. तर च आपण त्यांच्या कृपेला पात्र होऊं. त्यांची कृपा न होईल तर कांहीं च साधणार नाहीं. सद्गुरुकृपेवांचून विषयांविषयीं उदासीनता, इंद्रियनिग्रह, भक्ति, ज्ञान, ब्रह्मानुभव यांतलें कांहीं एक आम्हांस प्राप्त होणार नाहीं. आपणांस सद्गुरुकृपा फावली आणि त्यामुळें आपणांस काय काय लाभ झाला, तो श्रीसमर्थांनीं एका पदांत सांगितला आहे. तें पद वाचून तरी श्रीसमर्थकृपा संपादन करण्याच्या मार्गाला लागण्याची आपणांस बुद्धि व्हावी.

## हे सद्गुरुकृपा—उत्तरार्ध पद ३०१

काळासी ताडिलें भगाड फोडिलें। बांधोनि पाडिलें हे सद्गुरुकृपा ॥ १
फावली मज फावली मज फावली मज ते चि सांगतों तुज ॥ ध्रु०
भवसिंधु आटलें बंधन तुटलें जंजाळ सुटलें हे सद्गुरुकृपा ॥ २
प्रपंच लटका तोडिला तटका काळासी फटका हे सद्गुरुकृपा ॥ ३
मन माजलें तात्काळ गांजिलें देखोनि लाजिलें हे सद्गुरुकृपा ॥ ४
रामीं रंगला जीवभाव भंगला। अभिमान खंगला हे सद्गुरुकृपा ॥ ५
आनंदघटाव ब्रह्मकटावा थोर धिटाव हे सद्गुरुकृपा ॥ ६

**वृत्ती फुटावी मुक्ती लुटावी मायेसी दटावी हे सद्गुरुकृपा ॥ ७**
**जळो दृश्यधडका वैराग्यकडका भ्रांती भडका हे सद्गुरुकृपा ॥ ८**
**पाषांड उडालें थोतांड बुडालें । ब्रह्मांड दडालें हे सद्गुरुकृपा ॥ ९**
**रामदास रे सदा उदास रे । मीपणाचा घास करी सद्गुरुकृपा ॥ १०**

(९) याप्रमाणें श्रीसमर्थांनीं श्रीरामाची कृपा संपादन केली होती, तशी आपण आधीं श्रीसमर्थांची कृपा संपादन करून घेतली पाहिजे, तर च आपण स्वतःस सांप्रदायिक म्हणावें. श्रीसमर्थांचा सर्व पतकर श्रीरामानें घेतला होता, तसा मग श्रीसमर्थ आपला घेतील. प्रभु रामचंद्र श्रीसमर्थांचे इतके ऋणी झाले होते कीं, श्रीसमर्थ च सांगतात, आपल्या मुखांतून शब्द निघण्याचा अवकाश, तो झेलून धरण्यास राम तत्पर असत.

**पडों नेदी शब्द माझा भूमिवरी** ॥ स्फु. ओ. १३१–३

पण मुखावाटें तरी शब्द काढावयास कशास पाहिजे ? भक्ताच्या मनांत काय घोळत असतें, तें काय रामाला कळत नाहीं ? तें आपल्या मनांतलें ओळखून, समर्थ सांगतात, रामानें आपले कोड पुरविले.

**जें जें मनें अभिलाषिलें ।**
**तें तें समर्थें पुरविलें ।**
**मज दीनास वाढविलें ।**
**मर्यादेवेगळें** ॥ परंतु प्रकरण

समर्थांनीं इच्छा करावी आणि रामानें ती पूर्ण करावी, यांत रामाच्या भक्तवेळाईतपणाची सीमा झाली, असें म्हटलें पाहिजे. इतके देव श्रीसमर्थांचे ऋणी होऊन राहिले होते. गिरिधर तर श्रीसमर्थप्रतापांत सांगतात, समर्थ नेहमीं रानावनांत हिंडत तेव्हां त्यांच्या रक्षणार्थ सशस्त्र राम आणि लक्ष्मण दोघे हि, त्यांच्या आजूबाजूस असत.

**समर्थांसी रक्षित दोनी धनुर्द्धारी ।**
**समागमें गुप्त असती विपिनविहारीं ।**
**कोठें न विसंबती येक क्षणभरी ।**
**आत्मारामसमर्थस्वामी** ॥ प्र. ३–२६

मेरुस्वामींच्या रामसोहळ्यांत हि याला प्रत्यंतर मिळतें :

**विचरतां विरक्तीनें वनीं । स्वामीसंरक्षणालागुनी ।**
**मनोहर कार्मुणपाणी । पुढें मागें तिष्ठती ॥** रा. सो. ३-११-३४

इतका रामानें श्रीसमर्थांचा कैवार घेतला होता ! म्हणून तर श्रीसमर्थ तुम्हां आम्हां सर्वांस, राम कैवारी करून घ्या रे, म्हणजे तुम्ही ज्यासाठीं धडपडता आणि तळमळता ते तुमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील, असा उपदेश जीव तोडून करीत आहेत:

**रामदास म्हणे माझा रामराव**
**त्याची संगती धरा रे ।**
**अंतीं तऱ्ही सोडविता तो चि येक**
**राम कैवारी करा रे ॥** पद १०९-३

चिकित्सक टीकाकार विनोदपूर्ण चेष्टा करतील तर करोत, ती आपण हंसत स्वीकारूं, पण मी वाचकांस विचारतों, या पदांतील 'माझा रामराव,' 'त्याची संगती', 'राम कैवारी' या शब्दांच्या जोड्या, मजप्रमाणें च तुम्हांस पवित्र, अर्थपूर्ण आणि चिंतनीय वाटत नाहींत काय ? राम जसे माझे आहेत, त्यांची संगती जशी मला लाभली आणि त्यांनीं जसा माझा कैवार घेतला आहे, त्याप्रमाणें तुम्ही हि आपल्या भक्तिप्रेमानें रामाला वश करून घ्या, असा श्रीसमर्थांचा तुम्हांआम्हांस प्रेमाचा आग्रह आहे. प्रेमावांचून आणि अंतरींच्या कळवळ्यावांचून 'धरा रे,' 'करा रे' हे शब्द कोणाच्या हि मुखावाटें बाहेर पडणार नाहींत ! मनाच्या श्लोकांत हि त्यांनीं एका ठिकाणीं असा च आग्रह केला आहे. त्या ठिकाणीं ते म्हणतात, फार बोलून काय उपयोग, काय पाहिजे तें करा, नाना साधनें करा, देह अति कष्टवा, अट्टाहास करा, पण कसें हि करून रामाला आपलेसे करून घ्या आणि मग पाहा, तुमच्या वाटेस जाण्याची कोणाची माय व्यायली आहे कीं काय !

**बहूतांपरीं हें चि आतां धरावें ।**
**रघूनायका आपुलेसे करावें ॥ ४१**

रघूनायका आपुलेसे करावें आणि राम कैवारी करा रे, या दोहोंचा अर्थ एक च कीं, रामाची कृपा संपादन केली पाहिजे, रामाचें आश्वासन मिळविलें पाहिजे, रामाचा कौल प्राप्त करून घेतला पाहिजे. पण असा कौल मागण्यास

श्रीरामाच्या दरबारांत आम्हांस घेऊन जाण्यास श्रीसमर्थांशिवाय दुसरा कोण समर्थ आहे ? आम्ही त्यांच्या येण्याकडे सारखे डोळे लावून बसलों आहोंत.

(१०) तेव्हां, मेरुस्वामींच्या शब्दांत जरूर तो फरक करून आम्ही आमचें गाऱ्हाणें श्रीसमर्थांच्या कानावर आधीं घालूं इच्छितों :

समर्थदेवा माझें मनोगत । परीक्षूनि बरवें यथोचित ।
तुझें दर्शन अपेक्षित । पुरवीं मनकामना ॥ १

डोळे भरूनि सावचित्त । तुज पाहीन अखंडित ।
पुरवीं माझे मनोरथ । भेटी देयीं दयाळा ॥ २

आळी घेतलिया बाळकें । माता त्यासी बुझावी कौतुकें ।
तेवीं मज सद्गुरुनायकें । भेटी देयीं जननीये ॥ ३

मन धाय तंवरी । हृदयीं धरीं झडकरी ।
स्वानंदघनमधुरोत्तरीं । करीं समाधान माझें ॥ ४

कृपा करा जें झडकरी । कुर्वाळूनि सुखी करीं ।
शरणागत उपेक्षा न करीं । शरणागतवत्सला ॥ ५

अभीष्ट पुरवीं माझें । हीन दीन परी अंकित तुझें ।
वारीं मीपणाचें वोझें । कृपाकरे गुरुदेवा ॥ ६

जन्मोजन्मींचा सांगात । असतां चि चुकला अकल्पित ।
तो सनातन करीं कृतार्थ । ये चि भेटीनें देवा ॥ ७

तुजवीण गति नाहीं दुसरी । साच चि जन्मलों तुझे उदरीं ।
माया लाऊनि संसारीं । वेगळें घातलें ॥ ८

देऊनियां अहंकारा । घातलें मायेच्या सासुरा ।
नाना विपत्ति त्या गुरुदातारा । सोसूं मी किती ॥ ९

जन्म गेले ऐसे चि किती । सोसितां विकल्पभवयातायाती ।
आतां धीर पुरेना चित्तीं । आईक माझें गाऱ्हाणें ॥ १०

---

## (४) वीतराग

(१) वैराग्य आणि ज्ञान परस्परावलंबी होत, (२) वैराग्याचे दोन प्रकार, (३) पहिला प्रकार, (४) विषयत्यागाची व्याख्या, (५) दुसरा प्रकार, (६) एक रूपक–ज्ञान-रूपी राम आणि वैराग्यरूपी हनुमंत, (७) निग्रह, (८) वैराग्य कशानें उत्पन्न होतें, (९) भक्ति–ज्ञान–वैराग्य हीं एक च, (१०) उदासीन राहून विरक्तानें उपाधी कराव्या, (११) वैराग्य ही एक शक्ति आहे, भाग्याचें लक्षण आहे, (१२) तें भाग्य आमच्या श्रीसमर्थांचें होतें, (१३) ते वैराग्याचे राजे होते.

**वैराग्य हें भाग्य आमुच्या समर्थस्वामीचें ।**
**तेणेंकरितां पोषण जालें भक्तिज्ञानाचें ॥** गिरिधर

(१) एकदां श्रीसमर्थचरणांचा आश्रय केला म्हणजे पाठोपाठ बाकीचीं चार लक्षणें आंगीं बाणलीं पाहिजेत. त्यांपैकीं कोणतें आधीं आणि कोणतें मागाहून, हें सांगणें कठीण आहे, कारण तीं सारीं परस्परावलंबी आहेत. उदाहरणार्थ, वीतराग म्हणजे वैराग्य च कां घ्या ना ?
पांचव्याच्या सहाव्यांत

**पूर्ण जालियां ब्रह्मज्ञान । वैराग्य भरे आंगीं ॥ ५९**

म्हणजे पूर्ण ब्रह्मज्ञान झाल्यावरच वैराग्याचा संचार होतो, असें आधीं सांगून, लागली च पुढें

**विषयीं वैराग्य उपजलें । तयासी च पूर्ण ज्ञान झालें ॥ ६१**

म्हणजे ज्याच्या आंगीं वैराग्य बाणेल, त्याला च पूर्ण ज्ञान झालें, असें समजावें, असें म्हटलें आहे. कोणतें आधीं आणि कोणतें मागाहून, म्हणून समजावें ? तेव्हां वैराग्य आणि ज्ञान हीं एकमेकांवर अवलंबून असतात, असें च मी मानलें. ज्ञान जसजसें होत जातें तसतशी विषयवासना क्षय पावत जाते आणि जोंवर विषयांकडे मनाचा ओढा असतो, तोंवर ज्ञान होणें हि कठीण च.

(२) वैराग्य म्हणजे तरी काय? श्रीसमर्थांचें एकंदर वाङ्मय अवलोकन करून माझा समज असा झाला आहे कीं, ज्याच्याशीं बोलावयाचें त्याचा अधिकार पाहून श्रीसमर्थ वैराग्याचे दोन प्रकार मानीत. एक प्रकार त्यांचा स्वतःचा किंवा त्यांच्या सारख्यांचा आणि दुसरा प्रपंची शिष्यांचा. पहिला प्रकार ते श्रेष्ठ मानतात व दुसऱ्याला नाइलाज म्हणून संमति देतात, असें च दिसतें.

(३) पहिला प्रकारः चवदाव्याच्या सातव्यांत

**पुरश्चरणी कायाक्लेसी। दृढव्रती परम सायासी।**
**जगदीशावेगळें जयासी। थोर नाहीं॥ ७**

**काया वाचा जीवें प्राणें। कष्टे भगवंताकारणें।**
**मनें घेतलें धरणें। भजनमार्गीं॥ ८**

**ऐसा भगवंताचा भक्त। विशेष अंतरीं विरक्त।**
**संसार सांडून जाला मुक्त। देवाकारणें॥ ९**

**अंतरापासून वैराग्य। तें चि जाणावें महद्भाग्य।**
**लोलंगतेयेवढें अभाग्य। आणीक नाहीं॥ १०**

हें दुसऱ्या कोणाचें चरित्र आहे? यांतला प्रत्येक शब्द दुसऱ्या कोणाला लागतो? पुरश्चरणाच्या काळांत काय आणि तीर्थाटणांत काय, इतके क्लेश दुसऱ्या कोणी सहन केले? 'मज रघुनाथजीवेगळे कोणी जिवलग नाहीं' हे उद्गार दुसऱ्या कोणी काढल्याचें वाचकांस ठाऊक आहे काय? 'संसार सांडून जाला मुक्त' दुसरा कोण? हें श्रीसमर्थांचें आत्मचरित्र च होय. संसारत्याग करणें हें श्रेष्ठ प्रतीचें वैराग्य होय, असा भावार्थ वरील ओव्यांत स्पष्ट दर्शविला आहे.

बाराव्याच्या हि सातव्यांत च

**विषय अवघा त्यागावा। तरी च परमार्थ करावा।**
**ऐसें पाहातां गोवा। दिसतो किं॥ ७**

या पूर्वपक्षाला श्रीसमर्थांनीं जें उत्तर दिलें आहे, तें हि त्यांच्या चरित्राला अनुसरून च आहेः

**वैराग्यें करावा त्याग । तरी च परमार्थयोग ।**
**प्रपंचत्यागें सर्व सांग । परमार्थ घडे ॥ ९**

**वैराग्य मुळीहून नाहीं । ज्ञान प्रत्ययाचें नाहीं ।**
**सुचि आचार तो हि नाहीं । भजन कैंचें ॥ १२**

**वैराग्यापरतें नाहीं भाग्य । वैराग्य नाहीं तें अभाग्य ।**
**वैराग्य नस्तां योग्य । परमार्थ नव्हे ॥ १७**

**प्रत्ययेज्ञानी वीतरागी । विवेकबळें सकळ त्यागी ।**
**तो जाणिजे माहांयोगी । ईश्वरी पुरुष ॥ १८**

त्यांच्या मनांत हि नसणार, पण आमच्या मनांत येऊन जातें कीं, असा महा-योगी ईश्वरी पुरुष दुसरा कोण होऊन गेला ?

एकवीससमासीच्या अठराव्या समासांत या प्रश्नाचें विशेषच सविस्तर विवेचन आहे.

**ऐक शिष्या साराचें हि सार । जेणें पाविजे पैलपार ।**

ऐक असें म्हणून शिष्याचें लक्ष मुद्दाम आपल्या बोलण्याकडे वेधून घेऊन श्रीसमर्थ प्रपंच आणि परमार्थ या दोहोंचें एका जागीं पटावयाचें च नाहीं, ज्याला परमार्थ पाहिजे असेल त्यानें प्रपंच सोडला च पाहिजे, फार काय, पण प्रपंच सोडणें म्हणजे च परमार्थ साधणें होय :

**अरे जयासी परमार्थ व्हावा । तेणें प्रपंच हा त्यजावा ।**
**प्रपंचीं परमार्थ करावा । तो ठाकेना सर्वथा ॥ १८**

**प्रपंच म्हणिजे उदास नागवणा । आणि परमार्थ म्हणिजे प्रपंचबुडवणा ।**
**परस्परें या दोघां जणां । सर्वथा न पडे ॥ २१**

**जयासी वाटे वैराग्य करावें । तेणें कांहींच न विचारावें ।**
**उठोनि वाटा चि लागावें । दिगांतराप्रती ॥ २४**

श्रीसमर्थ सर्वत्र आत्मचरित्र च बोलत असतात.

**परमार्थ सदृढ जडे । मोहोजाळ समूळ उडे ।**
**हें प्रपंचीं सहसा न घडे । वैराग्येंवांचुनी ॥ २६**

फार काय ? पण वैराग्य म्हणजे च परमार्थ.

**परमार्थ तो चि जो वैराग्य । वैराग्यापरतें नाहीं भाग्य ।**
**वैराग्य नाहीं तें अभाग्य । लुलु दरिद्री ॥ ४५**

या तिन्ही ठिकाणीं विचारांचें तर आहे च, पण शब्दांचें हि किती तरी साम्य आहे.

( ४ ) सर्व विषय सोडावयाचे म्हणजे मग विरक्तानें खाणें, पिणें हि वर्ज करावयाचें कीं काय ? पण ते तर प्रपंची लोकांप्रमाणें च खातांना आणि पितांना दिसतात, हें कसें ? या प्रश्नाला उत्तर देतांना श्रीसमर्थांनीं विषयत्यागाची फार सुंदर व्याख्या केली आहे :

**सबळ विषय त्यागणें । शुद्ध कार्याकारण घेणें ।**
**विषयत्यागाचीं लक्षणें । वोळखा ऐसीं ॥ १२–७–२७**

( ५ ) हे सारें झालें श्रीसमर्थांना अनुरूप असें वैराग्य. तें ऐकून आम्हां सारख्या प्रपंची जनांना वाटेल, हें जर या संप्रदायाचें एक मुख्य अंग असेल, तर मग आम्हांस त्या संप्रदायाकडे बघणें हि नको, आमचा मार्ग च खुंटला !

असें कसें होईल ? आमची तरी उपेक्षा श्रीसमर्थ कशी करतील ? आमच्या साठीं त्यांनीं वैराग्याची एक खालची पायरी राखून ठेवली आहे. आमच्या सारख्यानीं

**आतां जरी वैराग्य ठाकेना । आणि प्रपंच हा सुटेना ।**
**तरी प्रपंचीं असोनि वासना । परमार्थाकडे वोढावी ॥** ए. १८–४७

एवढें केलें म्हणजे झालें प्रपंची माणसांचें वैराग्य ! या हि पेक्षां पूर्वारंभ या लघु काव्यांत विरक्तीची ओघानें आलेली व्याख्या आपण विचारांत घेण्यासारखी आहे. विरक्ती म्हणजे नाहीं संसारीं आसक्ति. श्रीसमर्थ अति दयाळु आहेत.

**दिनाचा दयाळु मनाचा मवाळु । स्नेहाळु कृपाळु जनीं दासपाळु ॥**

हीं सर्व विशेषणें त्यांना सर्वथैव लागतात. संसारीं शिष्याला त्यांनीं याहून हि जास्त सवलती दिलेल्या आहेत. फक्त परधन आणि परकामिनी या दोन वस्तूंकडे ढुंकून हि पाहूं नका, बाकी काय वाटेल तें करा ! पण हा नियम हि जो न पाळील तो दुरात्मा महा नष्ट चांडाळ पापी समजावा. अशा

गाढवानें कोणाला तरी फसवून या संप्रदायांत प्रवेश मिळवून संप्रदायाला विटाळवूं नये.

**जेणें प्रपंचीं असावें। तेणें दों विषयां वेगळे व्हावें।**
**काये म्हणाल तरी चित्त द्यावें। कनक आणि कांता ॥** ए.१८-५०

यावर शिष्य म्हणतो, महाराज, हें आपण काय म्हणता? आम्हीं बोलून चालून प्रपंची माणसें, प्रपंच म्हणजे च कनक आणि कांता, आणि आपण सांगता त्या दोन्ही वस्तूपासून आम्ही दूर सरावें? मग प्रपंच तो काय राहिला? अरे वेड्या, ईश्वरानें तुझ्या गळ्यांत तुझी वनिता बांधली, ती सर्वांस ठाऊक आहे, तिच्या संबंधानें आमचें बोलणें नाहीं. आम्ही परधन आणि परकामिनी यांच्या संबंधानें बोलत आहों.

**म्हणसी प्रपंच म्हणिजे कनक कांता। हे मी कैसें टाकूं आतां।**
**तरी ईश्वरें दिधली ते वनिता। सकळांसी ठाउकी ॥ ५१**
**तैसें चि कनक पुढिलांचें। अभिलाषुनी आपुलें सांचे।**
**ऐसें केलें तरी कैचें। समाधान पावसी ॥ ५२**

हें प्रपंची माणसाचें वैराग्य. याहून आणखी किती सवलती असाव्यात? हा वैराग्याचा दुसरा प्रकार होय.

(६) वैराग्याची महती, श्रीसमर्थांनीं एका पदांत एक सुंदर रूपक योजून दर्शविली आहे. तें रूपक त्यांनीं आपल्या स्वतःच्या लहानपणच्या चरित्रावर च बसविल्यासारखें मला भासतें. त्यांच्या चरित्रावरून आपणांस हें ठाऊक झालें आहे कीं, श्रीसमर्थांना त्यांच्या वयाच्या दहाव्या अकराव्या वर्षीं मारुतिरायांनीं बटुवेषानें येऊन गांवाबाहेर अरण्यांत नेलें आणि तेथें श्रीरामरायाचें दर्शन घडविलें. या प्रसंगाला अनुसरून च हें रूपक आहे. श्रीसमर्थ म्हणतात, विषयांचे कांटे पायाला रुतूं लागले, म्हणून आपण ज्ञानरूपी रघुकुळ टिळकाचें स्मरण करून त्यांचा धांवा केला. त्यांना माझी करुणा येऊन त्यांनीं मला दगदगींतून सोडविण्यासाठीं वैराग्यरूपी हनुमंताला मजकडे पाठविलें. हनुमंत धांवून आले आणि त्यांनीं आपणास प्रपंचापासून सोडविलें. तेव्हां वैराग्यरूपी हनुमंताचे उपकार वाटून, वैराग्यापुढें ज्ञान हि फिकें होय, असे उद्गार श्रीसमर्थांनीं काढले आहेत.

विषयीं वैराग्य उपजल्यावांचून ज्ञानप्राप्ति होणें नाहीं, असें सुचविण्याचा भावार्थ दिसतो. आधीं वैराग्यरूपी हनुमंताची भेट व्हावी, तेव्हां पुढें ज्ञानरूपी श्रीरामाचें दर्शन घडण्याची आशा करावी.

**कानकोंड्या सुखाकारणें मनें लुलु केलीं ।**
**तेणें देहा सुख नव्हे चि हळहळ जाहाली ॥ १**

**कृपासिंधु रघुनायेका अव्हेरूं नको ।**
**शरण रविकुळटिळका । दास दीन मी रंक ॥ ध्रु०**

**तुझे भेटी रामा रे तुझा मार्ग चुकलों ।**
**विषये कांटे रुतले तेणें खेद पावलों ॥ २**

**ऐसा दगदला देखोनी रामा करुणा आली ।**
**तंव वैराग्यहनुमंतें पुढें उडी घातली ॥ ३**

**हा हनुमंत जयाचा कोवसा धन्य तयाचें जिणें ।**
**तयालागीं ज्ञान बापुडें लाजिरवाणें ॥ ४**

(७) तात्पर्य, वैराग्यावांचून देवाच्या भेटीची कोणी आशा करूं नये. वैराग्य असेल तर च देहाशा सुटून निग्रह दृढ होईल. निग्रह म्हणजे, मला वाटतें, देहपात झाला तरी हरकत नाहीं, पण रामाची कृपा झाली पाहिजे असा निर्धार. निग्रह ही सामान्य निश्चयाच्या वरची पायरी दिसते. अशा निग्रहानंतर देव भक्तापासून क्षणभर हि दूर होऊं किंवा राहूं शकत नाहीं. दृढ भाव, नित्य नेम, वैराग्य आणि निग्रह असा क्रम देवाच्या भेटीचा सांगतां येईल. निग्रहानंतर भेट.

**येका भावार्थासाठीं देव । लागे भक्तां पाठीं ।**
**भाव नसतां जगजेठी । प्राप्त नाहीं ॥** ए. ७–८

**शिष्य म्हणे गुरुदेवा । भाव तऱ्ही कोठें धरावा ।**
**कोण उपाव करावा । भाव धरूनि ॥ ९**

**भावें ध्यावें हरीचें नाम । ह्रदई धरूनियां प्रेम ।**
**मानसपूजा नित्य नेम । केला पाहिजे ॥ १०**

**धरूनिया सत्त्वगुण । भावें करावें हरिकीर्तन ।**
**अथवा करावें श्रवण । अत्यादरेंकरूनि ॥ ११**

सगुण मूर्तींचीं चरित्रें। श्रवण करावीं पवित्रें।
ध्यानें विविधें विचित्रें। अंतरीं धरावीं ॥ १२

निग्रहनेमाचें बळ। असतां प्राप्ति तत्काळ।
देहाशा करी डळमळ। तेणें निग्रह भ्रष्टे ॥ १३

जेथें निग्रहेंसीं धारिष्ट वसे। तेथें देव सन्निध चि असे।
सोडी संशयाचें पिसें। येतद्विषईं ॥ १४

परि निग्रहधारिष्ट जडे। हें वैराग्येंवीण न घडे।
दृढ वैराग्य होतां उडे। पांग देहाचा ॥ १५

देहपांग आंगीं आदळे। तेणें धारिष्ट उठोनि पळे।
सीधा पूर्व भाव ढासळे। पूर्ण धारिष्ट नसतां ॥ १६

देहे पडे कां देव जोडे। ऐसी हांव आंगीं जडे।
तेणें गुणें वैराग्य चढे। माहा प्रबळ ॥ १७

देहपांग निःशेष भंगे। तेव्हां प्राप्तीसी वेळ न लगे।
देव भक्तां पाठी लागे। नाभी नाभी म्हणोनी ॥ १८

बाळक आपणासी रक्षूं नेणे। म्हणोनि मातेसी लागे रक्षणें।
तें चि बाळक शाहाणें। होतां माता विसंबे ॥ १९

तैसा भक्त भगवंतीं प्रेमा। लाऊनि उलंघी देहसीमा।
तयाचा सांभाळ आत्मयारामा। करणें घडे नेमस्त ॥ २०

सर्वस्वाची आस सुटे। तरी च सगुणमूर्ति प्रगटे।
सगुण लाभ होतां तुटे। दुःख संसारीचें ॥ २१

(८) सारांश, परमार्थाला वैराग्याची अत्यंत आवश्यकता आहे. वैराग्यावांचून परमार्थ साधावयाचा नाहीं, इतकें च नव्हे, तर वैराग्य म्हणजे च परमार्थ, असें म्हणण्यापर्यंत मनाची तयारी झाल्यावर मुख्य प्रश्न उद्भवतो तो असा कीं, हें वैराग्य उत्पन्न व्हावें कसें? आपणांस एक दिवस सर्व सोडून, येथल्या येथें टाकून जावयाचें आहे म्हणजे काय व्हावयाचें आहे, याचें अखंड अनुसंधान राहील, तर वैराग्य उत्पन्न होईल.

अखंड आठवावें रे। मरणाचें ध्यान अंतरीं।
तेव्हां चि वैराग्य उठे ॥ षड्रिपु दंभ १२

तसेंच श्रीसमर्थांचा दुसरा एक सिद्धान्त व तो त्यांनीं अनेकदां सांगितला आहे कीं,

**जो संसारदुःखें दुःखवला । जो त्रिविध तापें पोळला ।**
**तो चि अधिकारी जाला । परमार्थविषयीं ॥ ५-३-३४**

**बहु दुःख भोगिलें जेणें । तयासी च परमार्थ बाणे ।**
**संसारदुःखाचेनि गुणें । वैराग्य उपजे ॥ ३५**

महाराज, आपण बायकापोरांचा संसार केला नाहीं, आम्ही करीत आहोंत, म्हणून आम्ही म्हणूं शकतों कीं, असा कोणाचा संसार आहे कीं, ज्याच्या संसारांत त्याच्या वाट्याला दुःख येत नाहीं ? आपण हि

**संसारसंगें सुख जालें । ऐसें देखिलें ना ऐकिलें ॥**

**संसारीं सुख मानिती । ते प्राणी मूढमती ॥**

असें सतरादां सांगून

**संसार मुळीं च नासका । विवेकें करावा नेटका ।**
**नेटका करितां फिका । होत जातो ॥ १९-१०-२८**
**ऐसा याचा जिनसाना ।**

असें च ठरविलें आहे. मोठ्या चक्रवर्ती राजाच्या राजवाड्यापासून तों एकाद्या गरीबाच्या झोपडीपर्यंत पहा, त्या राजवाड्यांत आणि त्या झोपडींत संसारांतील दुःखें अगदीं सारखीं च असतात, पण तेवढ्यानें गौतमबुद्धा-प्रमाणें कोणाच्या ठिकाणीं वैराग्य उद्भवल्याचें क्वचित् च ऐकूं येतें; बाकी जो तो, तशा दुःखांत हि, जगाची रहाटी अशी च आहे, संसाराचें स्वरूप च असें आहे, चाललें च आहे, अशा शहाणपणाच्या गोष्टी स्वतः बोलून दाखवून व दुसऱ्याच्या तोंडून ऐकून, मनाचें समाधान करून घेऊन तो च दुःखमय संसार पुढें चालवीत असतो. मग, आपण वर ५-३-३४।३५ त सांगितलेला सिद्धान्त खरा कसा ? आणि, महाराज, आम्हांला सांगा, आपण कोठें संसारदुःखें भोगावयास गेला होता, म्हणून आपलें सारें चरित्र वैराग्यमय बनलें ? संसारदुःखसागरांत कोट्यवधी माणसें बुडत असतां, त्यांत क्वचित् च एकादा संसारापासून दूर होऊं इच्छितो, हें आम्ही पाहतों व आपणांसारखे संसार न करतां हि वैराग्य धारण करितात, हें हि आम्ही पाहतों, तेव्हां वाटतें, कोणाच्या हि अंतःकरणांत वैराग्याचा संचार होण्याला आणखी कांहीं निराळीं कारणें असलीं पाहिजेत. तीं आमच्या पदरचीं नाहींत. तीं हि आपण च सांगितलेलीं आहेत. तीं कारणें म्हणजे पूर्वजांची पुण्याई, सत्समागम आणि विवेक-विचार.

पूर्वजांच्या पुण्यकोटी संग्रहीं पाहिजेत आणि सद्गुरूचा सहवास हि लाभला पाहिजे, पण मुख्य म्हणजे, असें दिसतें, केवळ विचारानें वैराग्य उत्पन्न होऊं शकतें. देवाचा किंवा सद्गुरूचा छंद लागला, नित्यानित्य विवेक सुचला आणि सारासार विचार केला, म्हणजे वैराग्य सहज च उत्पन्न होतें आणि भक्त देवापासून किंवा सद्गुरूपासून निराळा रहात च नाहीं.

**नानाकार विकार फार हृदईं होतां विवेका करी।**
**नित्यानित्यविचारसारश्रवणें वैराग्य चित्तीं धरी॥** क. २४४

आणि मग

**वैराग्यें त्यागितां सर्वै। देव आपण येकला।**
**देवाचें लागतां ध्यान। आपणासी ठाव चि नसे॥** मा. पं. ३-४
**अभेद भक्ति ते ऐसी। आत्मनिवेदनी स्थिती।**

विवेक आणि विचार यावर श्रीसमर्थांची कल्पनातीत भर आहे. 'श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानांत विवेकविचाराचें स्थान' असा एकाद्यानें प्रबंध लिहिण्याचें मनांत आणल्यास, त्यास भरपूर सामुग्री त्यांच्या वाङ्मयांत आढळेल. वैराग्य हि शुद्ध असावें, असें श्रीसमर्थ म्हणतात, तेव्हां त्याचा अर्थ, बाराव्याच्या चवथ्या समासाकडे पाहून, विवेकयुक्त वैराग्य, असा च मी करतो. वैराग्य विवेकयुक्त असावें.

**नुस्तें वैराग्य हेंकांडपिसें॥** १२-४-१९

विवेकाची जागा अहंकारानें घेतली, म्हणजे तें वैराग्य फोल ठरतें.

**मीपणें शक्ति गळे। वैराग्याची॥** ७-७-४६

असें हें वैराग्य अंतर्बाह्य असावें. बाह्यत्यागापेक्षां अंतस्त्यागाची आवश्यकता जास्त च मानली पाहिजे. नाहीं पेक्षां बाह्यतः त्याग केलेला असावा आणि अंतरीं विषयध्यान लागलेलें असावें! काय उपयोग त्या त्यागाचा?

(९) भक्ति, ज्ञान, वैराग्य हीं एक च कीं काय कोण जाणे! या तिहींतून कोणत्या हि एका गुणाची पराकाष्ठा झाली, म्हणजे त्यांत बाकीचे दोन्ही गुण संभवतात. भक्तीचा कडेलोट झाला म्हणजे तेथें ज्ञान आणि वैराग्य हीं आलीं च. ज्ञान पूर्णत्वाला पोंचलें म्हणजे त्याच्या आश्रयाला

भक्ति आणि वैराग्य हीं येतात च, आणि वैराग्यानें श्रीसमर्थांच्या वैराग्याची सीमा गांठली म्हणजे भक्ति आणि ज्ञान हीं निराळीं उरत च नाहींत. हे तीन शब्द एकत्र उच्चारल्याचीं स्थळें श्रीसमर्थवाङ्मयांत शेंकडों आढळतात. हे तिघे बहुधा एकत्र नांदतात, एकमेकाला सोडून रहात नाहींत. तिन्ही मिळून एक च. पुढील ओव्यांतून हा च भावार्थ निघतो, असें वाटतें :

**स्वरूपीं आसक्ति याचें नांव भक्ति**
**पाहातां विभक्ति जेथें नाहीं** ॥ ओ. श. ४-४८

**जेथें नाहीं देहबुद्धीचें अज्ञान ।**
**तया नांव ज्ञान बोलिजेतें** ॥ ४९

**बोलिजेतें ज्ञान सर्वसाक्षभूत ।**
**जाणावें अद्वैत तें चि ज्ञान** ॥ ५०

**ज्ञान आणि भक्ति येक चि असती ।**
**वैराग्याची स्थिती बोलिजेल** ॥ ५१

**बोलिजें वैराग्य त्यागाचें लक्षण ।**
**साक्षी विलक्षण जाणोनियां** ॥ ५२

**जाणोनि माईक सर्व हि त्यागिलें ।**
**मन सुखावलें संगत्यागें** ॥ ५३

**संगत्याग केला निसंग राहिला ।**
**सर्व हि येकला येकरूप** ॥ ५४

**येकरूप जाले भक्ति आणि ज्ञान ।**
**वैराग्य हि जाण येकरूप** ॥ ५५

कोणी किती हि ज्ञानी असला तरी त्याच्या ठिकाणीं वैराग्य नसेल तर, त्याचें ज्ञान नुसतें शाब्दिक समजावें. असलें ज्ञान दंभाला आणि ढोंगाला कारण होत असतें. वैराग्य आणि ज्ञान यांची फारकत करतां च येत नाहीं. वैराग्या-वांचून योगी, साधु, साक्षात्कारी पुरुष संभवत नाहीं. संसारांत असून हि एकादा पूर्ण वैराग्यशील असला, तर अशाला श्रीसमर्थ फार मानीत.

**जाणावा तो योगी सदा वीतरागी ।**
**अहंभाव त्यागी अंतरींचा** ॥ स्फु. ओ. २३८-१

स्वजन स्वदेश सांडुनि उदास।
तेणें आशापाश तोडियेला ॥ २

रमा सरस्वती वैभव वित्पत्ती।
ज्ञानबळें चित्तीं चाड नाहीं ॥ ३

पूर्णी पूर्णकाम तेणें जो निःकाम।
विषयांचा श्रम तुच्छ केला ॥ ४

विवेकाचें बळ जाहालें प्रबळ।
बाह्य मायाजाळ त्यागियेला ॥ ५

धन्य तो पैं दास संसारीं उदास।
तया रामदास मानितसे ॥ ६

स्वतःचा निस्पृह शिष्य वैराग्यशील नसेल, तर त्याला श्रीसमर्थ महंताचें काम सांगत नसत. तोच खरा महंत, जो

भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर। करून दावी ॥ ११-६-११

असें महंताच्या लक्षणांत श्रीसमर्थ सांगतात. महंताचें मुख्य काम म्हणजे लोकांत स्वकर्तव्याचा प्रचार करणें. पण त्याच्या ठिकाणीं निस्पृहता आणि वैराग्य हीं नसतील तर, लोकांत त्याचा बोज राहणार नाहीं, त्याचें तेज पडणार नाहीं. चवदाव्याच्या पहिल्या समासांतील सर्व शिकवण अशा निस्पृह शिष्याला आहे. तींत श्रीसमर्थांची त्याला, केव्हां हि वैराग्या-पासून ढळूं नये, अशी सक्त ताकीद आहे. सर्व साधनांत श्रीसमर्थांना वैराग्याचें महत्त्व फार वाटत असे. रामाच्या आणि शंकराच्या वैराग्याचें त्यांनीं अनेक ठिकाणीं कौतुक केलेलें आढळेल. तें त्यांना वाटणारें कौतुक च त्यांच्या स्वतःच्या चरित्राचें बीज होय.

(१०) वैराग्य म्हणजे आसक्ति नसणें, एवढें च. विरक्त म्हटला म्हणजे त्यानें अंगाला राख फासून अरण्यांत निघून जावें, अशी सामान्य जनांची समजूत असते. श्रीसमर्थांचा विरक्त असा नसे. श्रीसमर्थांच्या विरक्तानें ब्रह्मांडाच्या उपाधी केल्या तरी त्या चालत. किंबहुना, त्यानें त्या कराव्या अशी त्यांची आज्ञा असे. फक्त त्या उपाधींची बाधा स्वतःस होऊं देऊं नये, म्हणजे झालें. त्यानें करवतील तितक्या उपाधी कराव्या, फक्त त्यानें स्वतः उपाधींत सांपडूं नये, त्यानें उदासीन रहावें, आलिप्त असावें.

**विरक्तें उपाधी करावी। आणि उदासवृत्ति न संडावी।**
**दुराशा जडों नेदावी। कोणयेकविषईं॥ २-९-२६**

**वैराग्याची बहु आवडी। उदासवृत्तीची गोडी।**
**उदंड उपाधी तरी सोडी। लागों च नेदी॥ १९-१०-५**

(११) वैराग्य ही फार मोठी शक्ति आहे. वैराग्यवृत्तींत जें समाधान असतें तें संपत्तींत नसतें, हें अनुभवानें जरी नाहीं, तरी कल्पनेनें आणि वैराग्यशील माणसांची वृत्ति पाहून आपण जाणूं शकतो. आपल्या रामायणांत श्रीसमर्थांनीं भरताच्या तोंडून हा सिद्धान्त वदविला आहे :

**भले जाणती संपदा दुःखदाती।**
**स्वहीता परत्रासि होतें नियंती।**
**हरादीक ते तापसी या च लागीं।**
**सदा सर्वदा फीरती वीतरागी॥ ११-६९**

वैराग्यापासून होणारें समाधान अतर्क्य आहे. जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे. केवळ प्रास साधतो म्हणून नव्हे, परंतु या वाङ्मयांत जेथें जेथें वैराग्य शब्द आला आहे, तेथें तेथें त्याच्या जवळ बहुधा भाग्य शब्द आढळतो च. वैराग्य आहे तेथें भाग्य आहे च. शब्दाजवळ शब्द आढळतो, याचें महत्त्व नाहीं, पण खरोखर च वैराग्य हें परम भाग्याचें लक्षण होय. श्रीसमर्थांच्या आणि त्यांच्या शिष्यप्रशिष्यांच्या वाङ्मयांत, वैराग्य हें परम भाग्य होय, असें च मानलेलें सर्वत्र आढळतें.

**घडे धन्य वैराग्य तें भाग्य मोठें।**
**घडेना तयाचें जनीं कर्म खोटें॥** करुणा० ९३-५

**महा भाग्य वैराग्य हें ज्ञानियासीं।**
**घडे त्याग हा भोग लोलंगतासी।**
**तयावीण तें ज्ञान हें दैन्यवाणें।**
**क्रियेवीण शाब्दीक लाजीरवाणें॥** क० १३४-१०३

अकराव्या ओंव्याशताचा आरंभ करतांना च मुळीं म्हणतात—

**वैराग्यापरतें आनु नाहीं भाग्य।**
**धन्य तें वैराग्य ज्ञानियासीं॥** शत ११-१

वैराग्यांत हें भाग्य कोठून येतें बरें ? स्वरूपानुसंधानापासून. स्वरूपानुसंधानावांचून आनंद नाहीं आणि वैराग्यावांचून तें अनुसंधान घडावयाचें नाहीं. म्हणून वैराग्य हें परम भाग्य होय.

(१२) तें भाग्य आमच्या श्रीसमर्थांचें होतें. श्रीसमर्थ म्हणजे वैराग्याची मूर्ति.

**नृपें पदिं राज्या अर्पियलें ।**
**कृपेसह त्यास परत दिधलें ॥** आरती

चरित्राचा आरंभ च मुळीं वैराग्यापासून.

**ऐसें कोठें नाहीं हो वर्तलें ।**
**पूर्वी अवतारादिकासी न जालें ।**
**मायामोहिनीनें ब्रह्मादिकां भुलविलें ।**
**नाना पुराणें आम्ही ऐकिलीं ॥** प्र० २–४१

तुम्हीहि ऐका, पहा आणि सांगा, पुराणांत, इतिहासांत—या देशाच्या, अन्य देशाच्या—असलें दुसरें उदाहरण कोठें आहे काय ? देहत्याग करतांना हि त्यांची वैराग्यवृत्ति ढळली नाहीं, याचें साधार विवेचन पहिल्या खंडांत वाचावयास मिळणार च आहे. त्यांची प्रतिज्ञा च मुळीं तशी होती.

**आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यासी ।**
**आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥ १२–१०–३४**

त्यांचें दुसरें कांहीं मागणें नव्हतें, कीं सांगणें नव्हतें.

(१३) सांप्रदायिकांपुढें श्रीसमर्थांचा कित्ता आहे च. तो अधिकारपरत्वें ज्याला जितका गिरवितां येईल तितका त्यानें गिरवावा. आपचंदमठपति कल्याणशिष्य शिवराम यांच्या शब्दांत माझी प्रार्थना इतकी च कीं,

**वैराग्याचा राजा रामदास स्वामी माझा ।**
**त्याचे चरणीं भाव धरा वोजा । रे गडियांनो ॥**

त्यांत, गड्यांनो, आपलें सर्वांचें कल्याण आहे. काय सांगूं ?

---

## ( ५ ) ब्राह्मण्यरक्षण

( १ ) ब्राह्मणांचें महत्त्व, पण तत्कालीन त्यांची निकृष्ट स्थिति, ( २ ) ती दूर होण्याचा उपाय, ( ३ ) त्याचें फळ, ( ४ ) येकंकारगजावरी पंचानन, ( ५ ) ब्राह्मण कसा असावा, ( ६ ) ब्राह्मणाची योग्यता, ( ७ ) श्रीसमर्थांचा ब्राह्मणांवर मोठा कटाक्ष, ( ८ ) ब्राह्मणांनीं शुद्धीवर येऊन समाजाचा नाश टाळावा, ( ९ ) ब्राह्मणांवरील जबाबदारी

**करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।**
**ते चि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ ६–४–२४**

( १ ) धर्मकारणांतील तिसरी बाब म्हणजे ब्राह्मण्याचें रक्षण होय. श्रीसमर्थांचा ब्राह्मणांवर मोठा कटाक्ष असे. हजारों वर्षांची परंपरा आणि संस्कृति यांचा विचार केला, तर असें वाटतें, वैराग्य हें ब्राह्मणांच्या रक्तांत च असावें आणि म्हणून ब्राह्मण्याचें रक्षण करणें इष्ट होय. श्रीसमर्थांना तरी निदान ब्राह्मणांची फार आशा वाटे. त्यांना वाटे, एक ब्राह्मणवर्ण ताळ्यावर असला, म्हणजे चार हि वर्ण सुव्यवस्थित राहतील. या मताला श्रीमत् शंकराचार्यांचा हि आधार आहे. आपल्या गीतेवरील भाष्याच्या प्रस्तावनेंत आचार्य म्हणतात :

**ब्राह्मणत्वस्य हि रक्षणे रक्षितः स्याद्वैदिको धर्मः ।**
**तदधीनत्वाद्वर्णाश्रमभेदानाम् ॥**

चारी वर्ण आणि चारी आश्रम ब्राह्मणाधीन असल्यामुळें, एका ब्राह्मण्याचें रक्षण झालें म्हणजे वैदिक धर्मांचें च रक्षण झालें, असें समजावें. म्हणून समर्थांना ब्राह्मण्यरक्षणाची फार चिंता वाटे. चातुर्वर्ण्यव्यवस्था हें आपल्या संस्कृतीचें वैशिष्ट्य होय. त्या व्यवस्थेवर मधून मधून कोणाकोणाचे आघात होत असतात आणि ती ढिली होत असते. पुन्हां तिला ताळ्यावर आणणारा पुरुष अवतीर्ण होऊन तिला मूळ स्वरूपावर आणीत असतो. श्रीसमर्थांच्या काळीं ती व्यवस्था बरीच ढिली झाली होती, असें त्यांच्या उद्गारांवरून वाटतें.

**ब्रह्मज्ञानाचा विचारु। त्याचा ब्राह्मणासी च अधिकारु॥**
**वर्णानां ब्राह्मणो गुरुः। ऐसें वचन॥ १४-७-३०**

परंतु तत्कालीन ब्राह्मणांनीं च ताळतंत्र सोडल्यामुळें

**गुरुत्व आलें नीचयाती। कांहीं येक वाढली महंती।**
**शूद्र आचार बुडविती। ब्राह्मणाचा॥ ३४**

परंतु

**हें ब्राह्मणास कळेना। त्याची वृत्ति च वळेना।**
**मिथ्या अभिमान गळेना। मूर्खपणाचा॥ ३५**

" आपण सारे एक आहोंत, एक मोठा दुसरा धाकटा हा भेदभाव कोठून आणला, भिन्न भिन्न आचाराविचारांत काय अर्थ आहे, सर्व जण एकत्र बसूं या, खाऊं या, पिऊं या, खेळूं या, कोणी दावलमलकास गेला आणि कोणी पीरास भजूं लागला, तरी त्यांत काय बिघडतें, " समर्थ म्हणतात, असली मूर्खपणाची समानतेची विचारसरणी ब्राह्मण मोठ्या अभिमानानें मिरवूं लागल्यामुळें त्यांची काय दशा झाली आहे, पहा। " बिचाऱ्यांना काय अवदसा आठवली आहे, कोण जाणे! दोहोला हि बिचारे मुकले आहेत. राज्य गेलें च आहे म्लेंच्छांकडे आणि आंतां गुरुत्व हि खालच्या वर्णाकडे जाऊन ब्राह्मणांना धड इह हि नाहीं आणि पर हि नाहीं, अशी त्यांची स्थिति झाली आहे! वास्तविक ब्राह्मणांचा आधिकार केवढा! पण भ्रष्टाचरणानें ते सर्वस्वाला मुकून बसले आहेत! दुःख होतें. अशा अर्थाचे दुःखोद्गार श्रीसमर्थांनीं काढले आहेत.

**राज्य नेलें म्लेंचिं क्षेत्रीं। गुरुत्व नेलें कुपात्रीं।**
**आपण अरत्रीं ना परत्रीं। कांहीं च नाहीं॥ ३६**

**ब्राह्मणास ग्रामणीनें बुडविलें। विष्णूनें श्रीवत्स मिरविलें।**
**त्याच विष्णूनें श्रापिलें। फरशरामें ॥ ३७**

**आम्ही हि ते चि ब्राह्मण। दुःखें बोलिलें हें वचन।**
**वडिल गेले ग्रामणी करून। आम्हां भोंवते॥ ३८**

पण याचा परिणाम काय झाला? ब्राह्मण अन्नाला हि महाग झाले!

हें वर्णन चाललें आहे त्या काळचें. पण याचें अवधान न राहिल्यास क्षणभर भास होतो कीं, श्रीसमर्थ काय आजकालच्या स्थितीचें वर्णन करीत

आहेत ? तत्काळ लक्ष्यांत येतें कीं हें त्यांनीं भविष्यकथन केलें नसून आपल्या च वेळच्या ब्राह्मणांच्या निकृष्ट स्थितीचें चित्र काढलें आहे. त्या काळीं ब्राह्मणांची अशी स्थिति झाली होती.

(२) ती स्थिति पालटण्याला श्रीसमर्थांनीं उपाय सुचविला तो असा—

**बरें ऐसा प्रसंग जाला। जाला तो होऊन गेला।**
**आतां तरी ब्राह्मणीं आपणाला। शाहाणे करावे॥ १४–८–१**

म्हणजे काय करावे ? तर

**देव पुजावा विमळहस्तीं**

हे तीन च शब्द आहेत, पण प्रत्येक शब्द अर्थपूर्ण आहे, इतका कीं, हें माझें म्हणणें चिकित्सकांना हि मान्य करावें लागेल. पहिल्या दोन शब्दांचा विचार पुढच्या च शुद्ध उपासनेच्या प्रकरणांत व्हावयाचा आहे, सध्यां येथें विमळहस्तीं म्हणजे काय, तेवढें च पाहूं. विमळहस्तीं म्हणजे साबण लावून स्वच्छ धुतलेल्या हातानें नव्हे. नुसत्या स्वच्छ हातानें काय होणार आहे ? विमळहस्तीं म्हणजे अंतर्बाह्य निर्मल होऊन, पवित्र आचार आणि शुद्ध विचार राखून, हा च अर्थ. विमळहस्तीं म्हणजे, फार तर, सोवळ्यानें. पण हें सोवळें म्हणजे तरी काय ? सोवळा ब्राह्मण कोणास म्हणावें तें श्रीसमर्थांनीं एका पदांत सांगितलें आहे :

**विटाळें उपजला विटाळें वाढला।**
**विटाळें चि मेला सावकाश॥ १**

**सोवळें कोणतें रे ब्राह्मणा।**
**वोवळें कोणतें रे॥ ध्रु०**

**हाडामासाच्या सगट मोळ्या।**
**पाणीयें सोविळ्या होती कैशा॥ २**

**देवाकडे मन लागतां उन्मन।**
**सोवळा ब्राह्मण तो चि येक॥ ३**

बाह्य सोवळें तर राखलें पाहिजे च, पण तेवढयानें भागत नाहीं, तर वरील पदांत म्हटल्याप्रमाणें, ज्याचें मन सारखें देवाकडे लागलेलें असतें, तो च ब्राह्मण खरा सोवळा आणि विमळहस्ताचा म्हणावयाचा.

( ३ ) याप्रमाणें ब्राह्मण खरा सोवळा होऊन शुद्ध मार्गावर आला तर त्याचें फळ फार मोठें पदरीं पडणार आहे.

**तेणें भाग्य पाविजे समस्तीं ।**

भाग्य पाविजे समस्तीं. म्हणजे एक ब्राह्मणवर्ण ताळ्यावर आला, पुढच्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें शुद्ध उपासनेला लागला, म्हणजे त्यांत समस्तांचें, सर्वांचें, चार हि वर्णांचें कल्याण आहे, एकट्या ब्राह्मणवर्णाचें च नव्हे. ही केवढी जबाबदारी ब्राह्मणवर्णावर आहे. ब्राह्मणांच्या उत्कर्षांत सर्वांचा उत्कर्ष. ब्राह्मणांचा उद्धार म्हणजे सर्वांचा उद्धार. याच्या उलट, ब्राह्मणांचा अपकर्ष म्हणजे सर्वांची च अधोगति.

( ४ ) श्रीसमर्थ हे चातुर्वर्ण्यव्यवस्थेचे अभिमानी आणि पुरस्कर्ते होते. समाजाच्या सुस्थितीला चातुर्वर्ण्यासारखी पोषक दुसरी व्यवस्था नाहीं, असें त्यांना वाटे.

त्या काळीं चार हि वर्णांत अनेक संत, साधु उदयास आले होते. श्रीसमर्थ त्यांना अति मानीत. पण म्हणून एकंकाराची कल्पना, त्यांच्या किंवा कोणाच्या च मनांत उद्भवत नसे.

**समर्थस्थितीसी मानवती संत ।**<br>
**मोक्षश्रिया भाग्यवंत ।**<br>
**येकंकार नसे निभ्रांत ।**<br>
**येक विचार परमार्थीं ॥** प्र. १९–५३

पारमार्थिक विचारांत, ब्रह्मज्ञानांत एकंकार असे, व्यवहारांत नसे. निवृत्तिराम ग्रन्थांत

**येकंकारगजावरी पंचानन ।**

असें श्रीसमर्थांचें वर्णन केलेलें आहे.

( ५ ) त्या काळीं ब्राह्मणांनीं च मूळ ताळ सोडला होता आणि त्यामुळें सर्व समाजाची घडी बिघडली होती. त्या ब्राह्मणांना शुद्धीवर आणण्यासाठीं श्रीसमर्थांच्या धर्मकारणांत ब्राह्मण्यरक्षण ही एक प्रमुख बाब होती.

या दृष्टीनें विचार केला म्हणजे ब्राह्मणांविषयीं श्रीसमर्थांना इतकी चिंता कां वाटे, याची उपपत्ति बरोबर लागते. ब्राह्मणांविषयीं त्यांच्या कल्पना

हि तशा च उच्च प्रकारच्या असत. या प्रकरणाच्या मथळयाचे जागीं उद्धृत केलेल्या ओवींत त्यांनीं ब्राह्मणाची केलेली कडक व्याख्या सर्वश्रुत आहे. त्यांच्या मतें, ब्राह्मण निरीच्छ, सर्वसंगपरित्यागी, वैराग्यशील असा असावा. नाहीं पेक्षां त्यानें हि इतरांप्रमाणें च ऐहिक, क्षणिक, भासमान होणाऱ्या सुखासाठीं धडपडत असावें आणि लोकांनीं मात्र आपणांस पूज्य मानावें, अशी अपेक्षा करीत च रहावें, ही कोण विसंगति ! ऐहिक सुख आणि वैभव हीं तुच्छ लेखून त्यानें स्वतःच्या आणि जगाच्या पारलौकिक कल्याणासाठीं च चंदनाप्रमाणें देह झिजविला पाहिजे. तो दरिद्री असावा ! जगाच्या विपरीत च त्याची रीत म्हणावयाची. जगाचा ओढा श्रीमंत होण्याकडे, तर याची महत्त्वाकांक्षा मी दरिद्री कसा होईन आणि राहीन ! त्याचा उदरनिर्वाह भिक्षेवर व्हावा. ही च त्याची परंपरागत मुख्य दीक्षा. ती अखंड चालविण्यांत च त्याचा मोठेपणा आहे.

**भिक्षा मूळीं पाहतां ब्राह्मणाची ।**
**भिक्षा नस्तां होतसे सर्व ची ची ।**
**भिक्षा मागें रक्षिली थोरथोरीं ।**
**आतां लज्या मानिली मूर्ख पोरीं ॥** क० ९४–६

हा उपदेश ऐकून, आपलें ऐहिक वैभव टाकून देऊन, उद्योगधंदे सोडून, उद्यांपासून सारे ब्राह्मण भिक्षेला सुरुवात करणार आहेत, असें थोडेंच आहे ? पण, ज्या तरुणांच्या मनांत, श्रीसमर्थांप्रमाणें निःस्पृहपणें उपासना आणि जनसेवा करण्याचें येईल, त्यांनीं ही वृत्ती स्वीकारली पाहिजे. या वृत्तींत जो आनंद असेल त्याची आम्हासारख्यांना कल्पना हि होणार नाहीं. त्या आनंदाचे भोक्ते श्रीसमर्थ होऊन गेले.

**कोण कैंचा हा भिकारी । भीक मागे दारोदारीं ॥ १**
**ऐसें म्हणती तेथें जावें । सुखें वैराग्य करावें ॥ २**
**लोक पुसती कोण काये । पुसों जातां सांगों नये ॥**

तेव्हां लोकांनीं आपसांत म्हणावें

**आहे ब्राह्मण विदेशी । नाहीं ठाउक आम्हांसी ॥ ४**
**रामीरामदास म्हणे । कोण आहे कोण जाणे ॥ ५**

हें पद उद्धवसुतकृत श्रीसमर्थचरित्राच्या दहाव्या अध्यायांत जेव्हां जेव्हां

मी वाचतों किंवा त्याचें मला स्मरण होतें, तेव्हां तेव्हां माझ्या डोळ्यांपुढें, तीर्थाटणाच्या काळांत, महाराष्ट्राच्या बाहेर, परप्रांतांत स्वच्छंदानें भिक्षा मागत संचार करणाऱ्या श्रीसमर्थांची मूर्ति उभी राहते.

( ६ ) अशा ब्राह्मणाची योग्यता फार मोठी असते. दर तीनशें वर्षांत असा एक जरी ब्राह्मण जन्मास आला तरी अशाच्या पुण्याईवर, ब्राह्मणाविषयीं समाजाला वाटणारा आदर तीनशें वर्षें टिकूं शकतो, हें आपण पाहिलें आहे. सहाशें वर्षांमागें श्री ज्ञानेश्वर झाले. तीनशें वर्षांमागें श्रीसमर्थ झाले. त्यांच्या नांवावर लोक अजून आम्हांस पुसतात, विचारतात, आमचा योगक्षेम चालवितात. आम्ही ब्राह्मण म्हणून सांगून त्यांच्या पुण्याईवर जगत आहोंत. आम्हांमध्यें कांहीं एक गुण नसतां लोक आम्हांस अजून मानतात, तें कां ? तर आम्ही ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास यांचे म्हणवितों, म्हणून ! यायोगें आम्ही मनांत तरी खजिल होऊन ब्राह्मण्याचे कांहीं गुण अंगीं आणण्याचा निश्चय केला पाहिजे. खऱ्या ब्राह्मणाचा अधिकार केवढा असतो, तो श्रीसमर्थांनीं एका स्फुट प्रकरणांत सांगितला आहे.

**ब्राह्मणु ब्रह्मवेत्ता तो । ब्राह्मणु ब्रह्मनिश्चई ।**
**ब्राह्मणु ब्रह्मस्थितीचा । ब्राह्मणु म्हणिजे गती ॥** स्फु. प्र. १७-१०

ज्यानें ब्रह्म जाणलें, ज्याला ब्रह्माचा निश्चय झाला, जो ब्रह्म च होऊन ठेला, अशा ब्राह्मणावांचून जगाचें अडावें, कोणाला च गति नसावी, तो तारील तर जग तरेल, असें जगाला वाटावें ! तो तुम्हां आम्हां सारखा च

**खातो तो जेवितो तो । लेतो तो नेसतो जनीं ।**
**ऐकतो देखतो गातो । नाचतो बहुतांपरीं ॥ १४**

पण त्याची योग्यता केवढी मोठी असते !

**विश्वकर्ता विश्वभर्ता । विश्वभोक्ता परोपरीं ।**
**दरिद्री वैभवी ज्ञाता । सर्व तो जगदांतरें ॥ १५**

( ७ ) श्रीसमर्थांचें बहुतेक वाङ्मय ब्राह्मणांना उद्देशून आहे. ब्राह्मण वर्ग मनांत आणून त्याला त्यांनीं उपदेश केला आहे. कांहीं विशिष्ट प्रसंग सोडून बाकीची त्यांची सारी कविता ब्राह्मणापुरती आहे. श्रीसमर्थवाङ्मयाच्या अभ्यासकांनीं चित्तांत एक गोष्ट वागविली पाहिजे कीं, सर्व समाजाच्या

कल्याणासाठीं ब्राह्मणानें स्वतः दरिद्री राहून अखंड जनसेवा केली पाहिजे, परोपकारार्थ कायेनें, वाचेनें, मनानें त्यानें झटलें पाहिजे, दुसऱ्याचें दुःख पाहून तो दुःखी व्हावा, दुसऱ्याचें सुख तें च आपलें सुख, अशी त्याची वृत्ति बनलेली असावी, असा श्रीसमर्थांचा कटाक्ष असल्यामुळें राष्ट्राच्या सुस्थितीला मूळ कारण जो ब्राह्मणवर्ग, त्यावर च त्यांनीं आपल्या उपदेशाची झोड उठविली आहे. ब्राह्मणदेह त्यागासाठीं आहे, भोगासाठीं नव्हे. कष्ट करणें हें ब्राह्मणाचें ब्रीद असावें.

**घरीं च बैसतां खोटें। ब्राह्मणु हिंडतां बरा।**
**आळसी घातघेणा तो। कष्टला म्हणिजे बरा॥** स्फु. प्र. १–३

ब्राह्मणांविषयीं श्रीसमर्थांच्या कल्पना याप्रमाणें असल्यामुळें त्यांच्या मनांतून ब्राह्मण केव्हां च दूर झाले नव्हते, असें त्यांच्या वाङ्मयावरून दिसतें. त्यांनीं सर्वत्र जो उपदेश केलेला आहे, तो हि ब्राह्मण मनांत आणून च. आपण थोडीं वचनें पाहूं:

(१) **देवीं ब्राह्मणीं सत्ता करी॥** २–१–६८ तो नुसता मूर्ख
(२) **द्वेषी देवां ब्राह्मणांचा॥** २–१०–३८ तो पढतमूर्ख
(३) **ब्रह्मवृत्तीचा उच्छेद॥** २–६–१९ तो तमोगुण
(४) **करी ब्राह्मणसंतर्पण॥** २–७–१६ तो सत्त्वगुण

(५) संप्रदायलक्षणांचें स्फुट ओव्यांचें जें १४ वें प्रकरण आपण मागें पाहिलें आहे, त्यांत हि 'उदंड ब्राह्मणसंतर्पण' आहे च.

(६) कोणी किती हि थोर असला तरी मृत्यूला सारे सारखे च, याचीं अनेक उदाहरणें देत असतां 'कर्मनिष्ठ ब्राह्मणाचें' त्यांना स्मरण झाल्यावांचून राहिलें नाहीं. ३–९–१६

(७) अनेक गेले त्यांत 'ब्राह्मणसमुदाय' हि गेले, हें सांगण्यास ते विसरले नाहींत. ३–९–५८

(८) **गुरु तों सकळांसी ब्राह्मण। जऱ्हीं तो जाला क्रियाहीन। तरी तयासी च शरण। अनन्यभावें असावें॥** ५–१–६

(९) १८×६ त श्रीशिवरायाचा गौरव करतांना म्हणतात:

**देव ब्राह्मण आचार विचार। कितेक जनासी आधार।**
**सदा घडे परोपकार। देणें ईश्वराचें॥ १७**

**देवाचा कैपक्ष घेणें। ब्राह्मणाची चिंता वाहाणें।**
**बहु जनासी पाळणें। देणें ईश्वराचें॥ १९**

**(१०) ब्राह्मणें बाळबध अक्षर। घडसुनी करावें सुंदर॥ १९-१-१**

**(११) ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या॥ १९-६-१४**

( १२ ) सप्तसमासीच्या सातव्या समासांत इहलोक आणि परलोक अशा उभय लोकीं सार्थक करावें, असें सांगून इहलोकींच्या सार्थकतेची कल्पना करून देतांना त्यांच्या मनश्चक्षूपुढें निर्विवाद ब्राह्मण च उभा होता.

**येहलोक आणि परलोक। उभय लोकीं सार्थक।**
**शुद्ध ज्ञान शुद्ध विवेक। यासी म्हणावें॥ ८**

**इहलोक म्हणिजे संसार करावा। नाना येत्नें आटोपावा।**
**लोकामध्यें मिरवावा। पुरुषार्थ आपुला॥ ९**

**कन्या पुत्र योग्य जाले। समर्थ सोईरे पाहिले।**
**ब्राह्मण्य विधियुक्त चाले। स्वहा स्वधा॥ १०**

**लोक म्हणती भला भला। इतुकेन येहलोक साधला।**

( १३ ) मानसपूजा प्रकरणांत येथून तेथून सर्वत्र ब्राह्मणांचा च संबंध आणलेला आहे. उदाहरणार्थ–

**ब्राह्मण स्नान करून आले। येक देवतार्चनास बैसले।**
**येक ते करूं लागले। वेदघोष॥ ८-३**

**देवें केलें सुखायन। आतां ब्राह्मणांचें भोजन॥९-४**

**बैसविल्या ब्राह्मणांच्या वोळी। द्रोण पानें पत्रावळी॥ ९-५**

**ब्राह्मणांचीं घेउनी तीर्थें। पुढें पूजन आरंभिलें॥ ९-६**

**येकारती धूपारती केली। पूजा येथासांग जाली।**
**ब्राह्मणा नमस्कार घाली। साष्टांग भावें॥ ९-८**

**गद्य पद्य प्रबंद नाना श्लोक। नामस्मरणें जेविती लोक।**
**ब्राह्मणमुखीं जगन्नायक। संतुष्ट जाला॥ ११-४**

( १४ ) ब्राह्मणांना दिल्यानें देव संतृप्त होतात :

**वास घे वासनादेवो । स्थूळेंवीण खातां नये ।**
**म्हणोनी ब्राह्मणा द्यावें । विप्रमुखें संतृप्तता ॥** पं. मा. २-२३

**आषाढी कार्तिकी आंवळीचीं बनें ।**
**घालावीं भोजनें ब्राह्मणासीं ॥** स्फु. ओ. ५-७

**ब्राह्मणाच्या तीर्थें पापक्षय होतो ।**
**जन उद्धरतो विप्रवाक्यें ॥ ८**

(१५) **अन्नोदकवस्त्रदानें । धन्य धन्य ब्राह्मणीं भजे ॥** स्फु. प्र. ५२-४

( १६ ) पहिल्या स्फुट प्रकरणांतील सर्व शिकवण केवळ ब्राह्मणांना च उद्देशून आहे.

( १७ ) राम परत आल्यावर जो आनंदोत्सव झाला, त्यांत रामाला आणि रामदासांना ब्राह्मणांचा विसर पडणें शक्यच नव्हतें—

**बहूसाल गंधाक्षता पुष्पमाळा । बरीं धोत्रपात्रें दिल्ही रत्नमाळा ।**
**विरें सुंदरें रम्य यज्ञोपवीतें । धनें चंदनें दीधलीं ब्राह्मणातें ॥** रा. १२-४७

**अळंकार मुक्ताफळें मुक्तमाळा । कितीयेक दिव्यांबरें रत्नमाळा ।**
**कितीयेक धोत्रें कितीयेक पात्रें । दिल्हीं ब्राह्मणा दान राजीवनेत्रें ॥१३-४०**

**कितीयेक कोट्यावधी गौतमाचीं । कितीयेक लक्षावधी कुंजरांचीं ।**
**बळाचे बहू अश्व ते पाखरीले । धनेंसी द्विजाब्राह्मणा दान केले ॥ ४१**

( १८ ) अशीं आणखी किती तरी स्थळें दाखवितां येतील, पण या सतरा ठिकाणचे श्रीसमर्थांचे विचार जरी पाहिले, तरी ब्राह्मण्यरक्षणाविषयीं त्यांना किती आणि कां अगत्य वाटत असे, ते ध्यानांत येतें. ब्राह्मण्यरक्षण म्हणजे तरी दुसरें काय आहे ?

**शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥**

या गुणांचें पोषण म्हणजे च ब्राह्मण्यरक्षण होय.

श्रीसमर्थ जेव्हां असें म्हणतात कीं,

**जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ॥** ५-१-१५

तेव्हां त्यांचें लक्ष मूढ ब्राह्मणाकडे नसून त्याच्या पूर्व परंपरेकडे असतें. ही

कांहीं मूढ ब्राह्मणांना मूढ होऊन राहण्याची सनद नव्हे, तर हा त्याच्या परंपरेचा आणि थोर पूर्वजांचा गौरव होय.

**नरदेहीं विशेष ब्राह्मण । २-४-२**

असें म्हणण्यांत हि हा च भाव असतो. हें जाणून व आपल्या पूर्वजांना स्मरून ब्राह्मणांनीं शुद्धीवर यावें.

**आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शहाणे करावें ॥ १४-२-१**

याचा अर्थ, आतां तरी म्हणजे इतकी विपन्नावस्था प्राप्त झाली ती पाहून ब्राह्मणांनीं स्वतःला शहाणे करावें, म्हणजे उमगावें, शुद्धीवर यावें आणि आपला आणि आपल्या बरोबर होणारा चारी वर्णांचा, सर्व समाजाचा नाश टाळावा. ब्राह्मण्यरक्षण करावयाचें तें यासाठीं, सर्वांच्या सुस्थितीसाठीं.

(९) ही ब्राह्मणावर केवढी जबाबदारी आहे. तिच्यामुळें च सर्व काळीं ब्राह्मणाविषयीं इतरांच्या ठिकाणीं पूज्य बुद्धि असे. रामावतारापासून तों छत्रपति श्रीशिवाजी महाराजांच्या अवतारापर्यंत ती आमच्या प्रत्ययास आलेली आहे. हल्लींच्या पडत्या काळांत सुद्धां ती धुगधुगी धरून आहे, याचें नवल वाटतें. सांगण्याला हरकत वाटत नाहीं, म्हणून या बाबतींत आम्ही अनुभवलेला एक प्रसंग सांगतों. बरीं च वर्षें झालीं, निजामाच्या मुलखांत, आगगाडीच्या मार्गापासून दूर, संशोधनार्थ आम्ही हिंडत असतां एका गांवाबाहेर -त्या गांवाचें नांव स्मरणांत नाहीं, पण माझ्या टिपणवहींत टिपलेलें असेल—एका झाडाच्या गर्द छायेखालीं विहिरीच्या आश्रयानें बाराच्या सुमारास मुक्काम केला. स्नानसंध्या उरकून एक जण भात शिजवावयास बसले व मी वस्तींत कोठें गाईचें दूध मिळेल तर पहावयास गेलों. मराठ्याच्या एका बाईनें दूध दिलें, तें घेऊन परतलों. तिसरा प्रहरीं मुक्काम हलविण्यापूर्वी दुधाचे पैसे देण्यास त्या बाईकडे गेलों असतां, ती माउली म्हणाली; "ब्राह्मणास दिलेल्या दुधाचे आम्ही पैसे घेत नसतो." कांहीं केल्या, तिनें पैसे घेतले नाहींत ! काय म्हणावें ! पूर्वजांच्या पुण्याईशिवाय आमच्या जवळ काय उरलें आहे ! अशा या काळांत सुद्धां ब्राह्मणाविषयीं लोकांत अद्यापि इतका आदर असावा, हें आश्चर्य होय. पण हा आदर आणखी किती शतकें टिकणार आहे ? ब्राह्मणांनीं विचार केला पाहिजे. ब्राह्मणांनीं ब्राह्मण व्हावें, श्रीसमर्थसंप्रदायाचा अभिमान बाळगावा, ब्राह्मण्य राखावें, शुद्ध उपासनेला लागावें आणि जगाला तारावें.

---

## (६) शुद्ध उपासना

(१) चत्वार देव, (२) पूजेचे एकाहून एक वरचढ प्रकार, (३) त्या काळीं पूजेच्या पहिल्या प्रकारांत मोठें विघ्न असे, (४) दुसरा प्रकार–अवताराचें रूप, ध्यान, चरित्र, (५) तिसरा प्रकार—अंतरात्म्याची उपासना, (६) ती च श्रीसमर्थांची उपासना होय, (७) जागतिक सुस्थितीचें साधन, (८) त्रिकालज्ञ श्रीसमर्थ (९) ही व्यापक उपासना हा च जगाचा धर्म, (१०) ही उपासना आणि आत्मज्ञान एक च, (११) उपसंहार

**नारायण असे विश्वीं। त्याची पूजा करीत जावी।**
**याकारणें तोषवावी। कोणी तरी काया॥ १५–९–२५**

(१) सर्वांनीं, विशेषतः ब्राह्मणांनीं विमळहस्तीं देव पूजावा, म्हणजे त्यांत सर्वांचें च कल्याण आहे, हें आपण मागील प्रकरणांत पाहिलें. आतां या प्रकरणांत, तो देव कोणता व त्याची पूजा करावयाची ती कशी, याचा विचार करावयाचा आहे.

श्रीसमर्थांनीं चत्वार देव सांगितले आहेत :

(१) प्रतिमा, (२) अवतार, (३) अंतरात्मा आणि (४) निर्मळात्मा. या चारी देवांना क्रमशः अनुरूप (१) कर्म, (२) भक्तिप्रेम, (३) ज्ञान आणि (४) विज्ञान, असें त्यांच्या पूजेचें स्वरूप मानतां येईल. श्रीसमर्थांच्या वाङ्मयांत या चारी देवांचा उल्लेख अनेक ठिकाणीं आढळतो. या चौघांत समजण्याला अवघड असा अंतरात्मा आहे. त्याची उपासना ती च शुद्ध उपासना होय. तिचा बोध व्हावा म्हणून त्या अनेक ठिकाणांपैकीं तीन महत्त्वाचीं ठिकाणें वाचकांच्या अवलोकनांत असावीं :

**मृत्तिका धातु पाषाणादिक। ऐसिया प्रतिमा अनेक।**
**बहुतेक लोकांचा दंडक। प्रतिमादेवीं॥ २९**

नाना देवांचे अवतार। चरित्रें ऐकती येक नर।
जप ध्यान निरंतर। करिती पूजा ॥ ३०

येक सकळांचा अंतरात्मा। विश्वीं वर्ते जो विश्वात्मा।
द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा। मानिती येक ॥ ३१

येक ते निर्मळ निश्चळ। कदापि नव्हेती चंचळ।
अनन्यभावें केवळ। वस्तु च ते ॥ ३२

येक नाना प्रतिमा। दुसरा अवतारमहिमा।
तिसरा तो अंतरात्मा। चौथा तो निर्विकारी ॥ ३३

ऐसे हे चत्वार देव।

(२) ११×९

पूजा घेताती प्रतिमा। आंगा येतो अंतरात्मा।
अवतारी तरी निजधामा। येऊन गेले ॥ ९

परी ते निजरूपें असती। तें निजरूप ते जगज्जोती।
सत्त्वगुण तयेस म्हणती। जाणती कळा ॥ १०

तये कळेचे पोटीं। देव असती कोट्यानकोटी।
या अनुभवाच्या गोष्टी। प्रत्ययें पाहाव्या ॥ ११

(३) १९×५

मातीचे देव धोंड्याचे देव। सोन्याचे देव रुप्याचे देव।

इत्यादि

उदंड उपासनेचे भेद। किती करावे विशद।
आपलाले आवडीचा वेध। लागला जनीं ॥ ४

परी त्या सकळांचें हि कारण। मुळीं पाहावें स्मरण।
तया स्मरणाचे अंश जाण। नाना देवतें ॥ ५

मुळीं द्रष्टा देव तो येक। त्याचे जाहाले अनेक।
समजोन पाहातां विवेक। उमजों लागे ॥ ६

*    *    *    *

लोकांची पाहातां रीती। लोक देवार्चनें करिती।
अथवा क्षेत्रदेव पाहाती। ठाईं ठाईं ॥ १८

अथवा नाना अवतार। ऐकोनी धरिती निर्धार।
परी तें अवघें सविस्तर। होऊन गेलें ॥ १९

**येक ब्रह्माविष्णुमहेश। ऐकोन म्हणती हे विशेष।**
**गुणातीत जो जगदीश। तो पाहिला पाहिजे॥ २०**

स्वतः श्रीसमर्थांनीं या चारी देवांची पूजा केली होती. चाफळास रामाची मूर्ति व ठिकठिकाणीं मारुतीच्या मूर्ति स्थापून त्यांनीं प्रतिमांची पूजा केली, रामकृष्णादिकांचीं अवतारचरित्रें प्रेमानें वर्णिलीं, अंतरात्म्याची तर त्यांची मुख्य च उपासना होती आणि अखेरीस ते स्वतः वस्तुरूप होऊन ठेले. उपास्य आणि उपासक असा द्वैतभाव पहिल्या तीन देवांच्या पूजेंत च संभवतो. या तिहींपैकीं कोणत्या हि देवाची आपण पूजा करीत असलों, तरी अनुसंधान चवथ्या देवाकडे ठेवलें पाहिजे. प्रतिमेची जरी पूजा करावयाची असली, तरी ती ज्या देवाची प्रतिमा असेल, त्याची ओळख करून घेतली पाहिजे.

(२) हे चार हि पूजेचे प्रकार एकाहून एक वरचढ दिसतात. अधिकारपरत्वें ज्याला जो प्रकार मानवेल तो त्यानें स्वीकारावा. कोणत्या हि प्रकारांत देवाचें भजन केलें, तरी तें मुळाला जाऊन पावतें. म्हणून कोणत्या हि प्रकाराविषयीं अनादर नसावा.

(३) त्या काळीं प्रतिमादेवाची पूजा करण्यांत धोका असे. देवांच्या मूर्तींचें रक्षण कसें करावें, याची चिंता वाटे. देवाची चिंता मनुष्यास करावी लागे ! त्या काळीं देवळें आणि त्यांतील देव यांना निर्भयता नव्हती. देवांच्या रक्षणासाठीं मनुष्याची मदत घ्यावी लागे, कोण हा विचित्र प्रसंग ! देवांना निर्भयता नव्हती आणि त्यांचें रक्षण माणसांना करावें लागे, ही भाषा कानाला कशी विपरीत भासते. पण असा प्रसंग त्या काळीं आला होता खरा. देवाचें रक्षण करा, असें श्रीशिवरायाला सांगण्याचा प्रसंग यावा, याला काय म्हणावें ? असें एका स्फुट अभंगांत प्रत्यक्ष आहे. त्यांत तत्कालीन परिस्थितीचें चित्र आहे आणि त्याबरोबर ज्ञानोपदेश हि आहे.

## स्फुट ओव्या–७२

**बहुसाल सीण होतसे कठीण। देवासी जतन करावया॥ १**
**करावया भक्ति भावें मोहछाव। देवासाठीं राव वोळगावा॥ २**
**वोळगावा राव राखावया देव। देवासी उपाव मनुष्याचा॥ ३**

**मनुष्याचा देव पूजितां कष्टलों । कासावीस जालों वाउगा चि ॥ ४**
**वाउगा चि देव पाषाणाचा केला । भाव हा लागला तयापासीं ॥ ५**
**तयापासीं मन अखंड लागलें । तों तया फोडिलें कोण्ही येकें ॥ ६**
**कोण्ही येकें बरा विवेक पाहावा । देवाआदिदेवा वोळखावें ॥ ७**
**वोळखावें देवा निर्मळा निश्चळा । निर्गुणा केवळा निरंजना ॥ ८**
**निरंजना देवा कोण्ही उच्छेदीना । फुटेना तुटेना कदा काळीं ॥ ९**
**कदा काळीं देव पडेना झडेना । दृढ उपासना रामदासीं ॥ १०**

अशी श्रेष्ठ, शुद्ध उपासना श्रीसमर्थ या अभंगांत प्रतिपादित आहेत.

(४) तथापि आपणांस एकदम निरंजनापर्यंत कसें जाऊन पोंचतां येईल? म्हणून मूर्तीच्या पूजेनंतर, ती ज्याची मूर्ति असेल त्या उपास्य दैवताचें रूप आठवावें, ध्यान करावें, कथा वर्णावी. आपल्या ठायीं, एकांतांत, डोळे मिटून हि, हें करतां येईल. या प्रकारांत धोका कमी. श्रीसमर्थ जें रूप न्याहाळीत तें च आपण हि पहावें, ते जसें ध्यान करीत तसें च आपण हि करावें व ते जी कथा गात ती च आपण हि गावी.

### (१) रूप (गिरिधरलिखित ५९ वें पद)

**आठवे मनीं आठवे मनीं । आठवे मनीं सदा राम चिंतनीं ॥ ध्रु०**
**मुकुट किरटी वक्र भृकुटी । रम्य गोमटीं नयनांबुजें ॥ १**
**मकर कुंडलें ठाण दंडलें । तेज खंडलें मेघदामिनी ॥ २**
**बाणली उटी कास गोमटी । किंकिणी कटीं क्षुद्रघंटिका ॥ ३**
**पदक मेखळा फांकती किळा । रूळती गळा रत्नमालिका ॥ ४**
**तीं सुलक्षणें रत्नभूषणें । वीरकंकणें शोभती करीं ॥ ५**
**रम्य रंगले च्याप चांगलें । सैन्य भंगलें त्रिकुटाचळीं ॥ ६**
**अंदु नेपुरें वाकि गजरें । तीं मनोहरें पाउलें बरीं ॥ ७**
**हृदयकमळीं मूर्ति सांवळी । दास न्याहाळी कुळदैवत ॥ ८**

### (२) ध्यान (गि. लि. ३५ वें)

**लाउनिया लोचन । करावें रामाचें ध्यान ।**
**श्रवण मनन । गुण गावे रे ॥ ध्रु०**

**निर्गुणीं पाहासी काय । सगुण चि उपाय ।**
**वेगीं धरीं सोय । राघवाची रे ॥ १**

**दृढ धरीं रे मना । राघवउपासना ।**
**गोवीं हे वासना । रामपाईं रे ॥ २**

**रामाचे भजनीं मन । हें चि हें समाधान ।**
**असावें अनन्य । दास म्हणे रे ॥ ३**

## ( ३ ) कथा ( गि. लि. ३८ वें )

**करीं धनुष्यबाण । अंतरीं बिंबलें ठाण । वेगळें करील कोण । आतां रे ॥ ध्रु०**
**रामीं बोधिली बुद्धि । सांडुनिया उपाधी । आणिका देवाची शुद्धि । नाहीं रे ॥ १**
**राम आठवे मनीं । राम आठवे वनीं । राम ध्यानीं मनीं । आठवतो रे ॥ २**
**रामदास म्हणे आतां । सांडुनी रामाची कथा । आणीक सर्वथा । चाड नाहीं रे ॥**

ती रामकथा आजपर्यंत किती जणांनीं आणि कितीदां गायिली असेल, त्याची गणती करणें अशक्य आहे. एका श्लोकापासून तों शतकोटि श्लोकांपर्यंत ती विस्तारलेली आहे. श्रीसमर्थांचीं अशीं सुंदर आणि शुद्ध अशीं दोन च कांडें प्रसिद्ध आहेत, पण स्फुट उल्लेख अगणित आहेत. शिवाय श्रीसमर्थवाग्देवता मंदिरांतील बाडांक १ वरून असें दिसतें कीं, त्यांनीं शेंकडों श्लोकांत आणि पदांत रामकथा क्रमशः वर्णिली होती, ते श्लोक आणि पदें अजून प्रकाशित व्हावयाचीं च आहेत. श्रीसमर्थांच्या प्रत्येक श्वासोच्छ्वासांत रामकथा भरलेली होती, असें मी म्हटलें तर तें माझें म्हणणें यथार्थ च होईल; असो.

ती संपूर्ण रामकथा दिनकरांनीं आपल्या स्वानुभवदिनकरांत एका ठिकाणीं ओघांत अवघ्या पंधरा ओव्यांत व मेरुस्वामींनीं आपल्या राम-सोहळ्यांत सोळा ओव्यांत फार गोड आणि आकर्षक रीतीनें आणली आहे. त्या दोन्ही ठिकाणच्या ओव्या आपणांस ऐकविण्याचा मला अनावर मोह होत आहे, त्यास माझा नाइलाज आहे.

( १ ) **रामकथा** — स्वानुभवदिनकर, कलाप १ किरण २

**जी जी परमात्मया श्रीरामा । निजजनमानसविश्रामा ।**
**जगज्जनका मेघश्यामा । पुराणपुरुषा ॥ ६०**

बाळपणीं ताटिका मारिली । ऋषियज्ञाची सिद्धि केली ।
शीळारूपी अहिल्या उद्धरिली । चरणस्पर्शें ॥ ६१

चाप भंगूनि जानकी पर्णिली । रावणाची गर्वसीग हरिली ।
फरशरामाची पुरविली । समश्या पूर्ण ॥ ६२

निज प्रतापें अयोध्ये पदीं बैसतां । तवं ऐकिलें पितृवचनार्था ।
सर्व त्यजूनि सौमित्रसहसीता । वनीं वास्तु वर्षें चौदा ॥ ६३

खरदूषणादि निशाचर । जनस्थानीं वधूनि चौदासहस्र ।
गौतमीतटीं स्वेच्छां ऋषिमुनिवर । सत्कर्में करिती ॥ ६४

तवं जय विजय निज भक्त । जे जाले ब्रह्मकुमरशापोपहत ।
रावण कुंभकर्ण बंधु विख्यात । त्रैलोक्यपीडक ॥ ६५

तयांचें करावया शापमोचन । आठऊनियां पूर्व वचन ।
निजछाया सीताहरण । लीळां करविलें ॥ ६६

मग जो अंजनीवायुकुमर । केवळ रुद्राचा चि अवतार ।
तयासह सुग्रीव वानर । शरणागत ॥ ६७

तयाचें सर्व सहाय करूनि । वाळी निजप्रतापें वधूनि ।
किष्किंधाराज्य सुग्रीवा देऊनि । रुक्षवानरां मेळविजे ॥ ६८

हनुमंतें सीताशुद्धि केली । मग लंकेवरी चाली आरंभिली ।
रुक्षवानरांकरीं करविली । सेतुरचना ॥ ६९

रामनामाचिया निजनेटें । उदकीं पर्वत जैसीं काष्टें ।
हें सामर्थ्य कधीं कोठें । दृष्ट ना श्रुत ॥ ७०

केला शतयोजनें सेतुबंध । सुवेळे वानरांसह सनद्ध ।
रावणकुंभकर्णासीं करूनि युद्ध । सपरिवारीं मारिले ॥ ७१

सोडविली देवांची बांदवडी । बिभीषणा दिधली लंकाराज्यप्रौढी ।
दिव्यमिसें सीता चोखडी । अग्नींतूनि काढिली ॥ ७२

चिच्छक्तीसह सर्व हि पुष्पकविमानीं । बैसोनि येइजे अयोध्याभुवनीं ।
स्वेच्छां प्रतापें राज्यभार चालऊनि । अकरा सहस्र वर्षें ॥ ७३

राज्य कीजे परम निर्मळ । भेणें चळीं कांपे कळिकाळ ।
दरिद्र व्यथा मृत्यु दुष्काळ । नसोनि सदां सुखरूप ॥ ७४

## ( २ ) रामकथा – रामसोहळा, रुद्र ९ उल्लास १०

नित्य कथा रामायणी । बैसला हनुमंत श्रवणीं ।
रामसंभव मूळापासूनि । आरंभली कथा ॥ ७८

देव मुक्त व्हावयासी । प्रगटला राम सूर्यवंशीं ।
अहंरावणवध लंकेसी । वाट पाहाती सुरवर ॥ ७९

विधि येऊनि क्षीरनिधिसी । प्रसन्न केलें विष्णूसी ।
तेणें अवतरणें विष्णूसी । दिल्हें वरदान ब्रह्मया ॥ ८०

अमरीं विक्षेपिलें कैकयेसी । डोहळीयाभिसें मागे भाकेसी ।
विरक्तिदर्शनें उदरासी । आला कौसल्येच्या ॥ ८१

विश्वामित्रें दशरथासी । मागीतला यज्ञसंरक्षणासी ।
जातां सीतेच्या स्वयंवरासी । मार्गीं अहिल्या उद्धरली ॥ ८२

भग्न करूनि शिवशक्ति लीळा । वरिली वैदेही चित्कळा ।
अयोध्येसि येतां परिहरिला । गर्व त्या भार्गवाचा ॥ ८३

पट्टाभिषेकें उद्देशें । परिपालन पितृवाक्यपरितोषें ।
आला दंडकारण्यासि सौरसें । सृष्टि पावन कर्ता ॥ ८४

भरत भेटी घे चित्रकूटासी ।
त्यासी अभय देऊनि पाठविले अयोध्येसी ।
घोरारण्यीं वधिलें विराधासी । भेटोनि ऋषीस चालिला ॥ ८५

वसला पचवटीस लीळा । शूर्पनखेस गौरव दिधला ।
तिच्या चि उद्देशें वधिला । खरदूषणादि राक्षस ॥ ८६

मारीचासि घेऊनि रावण । केलें मृगाकृतीनें विंदाण ।
मृगासवें राम लक्ष्मण । पाठीं सीता हरिली तेणें ॥ ८७

सीतेच्या वियोगें विचरे वनीं । कबंध वधिला तत्क्षणीं ।
शबरीआश्रमा येऊनि । आले पंपा सरोवरा ॥ ८८

तेथें भेटला हनुमंत । जालें सुग्रीव सख्य वाली हत ।
तारा किष्किंधा अभिषेचित । सुग्रीव पट्टीं बैसविला ॥ ८९

मिळाला वानरांचा मेळा । भीमें सीताशुद्धि आणिली लीळा ।
सिंधुबंधनें सुवेळा । पावला लंकेसि श्रीराम ॥ ९०

**रावण सहपरिवारी । निर्दाळिला निर्वाण परी ।**
**सुरवर मुक्त अमरपुरी । पावले रामप्रतापें ॥ ९१**

**बिभीषणासी लंका दीधली । सीता वन्हिस्नानें भेटली ।**
**पुष्पकीं बैसोनि भेटि दिधली । भरतासि श्रीरामें ॥ ९२**

**जननी जनवृंददर्शन । जालें अयोध्याप्रवेशन ।**
**पट्टीं बैसला विराजमान । राजा येकछत्री ॥ ९३**

( ९ ) या पुढची उपासना अंतरात्म्याची. अंतरात्मा आणि आत्माराम एक च. अंतरात्मा म्हणजे हरिसंकल्प मुळींचा। आत्माराम सकळांचा. अंतरात्मा म्हणजे निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणीं चेतलेलें स्मरण. मुळीं मुळींचें स्फुरण। तें चि अंतरात्म्याचें लक्षण. अंतरात्मा म्हणजे जगज्जोति, जाणीव कळा. अंतरात्मा म्हणजे जगदंतर, जगदीश, म्हणजे च महत्तत्त्व, महद्भूत. ती च आदिशक्ती, मूळमाया. तो च नारायण, तो सर्व विश्वांत भरलेला आहे. त्याची ओळख होणें परम भाग्याचें लक्षण होय. त्याची ओळख म्हणजे जन्माचें सार्थक. कठीण—अति कठीण आहे. सद्गुरूनें हात धरून त्याच्या जवळ नेऊन ओळख करून दिली, तर च त्याची ओळख होणार आहे. अशा त्या अंतरात्म्याची पूजा करणें ही च श्रीसमर्थांची उपासना होय.

या त्यांच्या उपासनेनें च त्या संकटकालीं महाराष्ट्राला तारलें. काळ कठीण आला होता. जगावयाचें कां मरावयाचें, धर्म टिकणार कां बुडणार, असल्या पेंचांत महाराष्ट्र सांपडला होता. अशा त्या काळीं श्रीसमर्थांनीं राष्ट्रांतील दिङ्मूढ झालेल्या तरुणांना या उपासनेला लावले आणि राष्ट्राचें आणि धर्माचें रक्षण केलें.

**प्रसंग हा कठीण हो । बहुत पावले मोहो ।**
**परंतु येत्न पाहाती । सुखें चि ते चि राहाती ॥** स्फु. श्लो. ४५–१

**विवेक पाहाणें बरा । बरा विचार तो करा ।**
**उपासकांसि सूचना । उपासना उपासना ॥ २**

एकाद्या महत्त्वाच्या विषयाकडे श्रोत्यांचें लक्ष वेधून घ्यावयाचें असलें म्हणजे श्रीसमर्थ मुद्याचा शब्द दोनदां उच्चारीत. अशा या उपासनेकडे त्यांनीं राष्ट्राचें लक्ष वेधून घेऊन आलेल्या प्राणांतिक संकटाचें निवारण केलें. इतकें ज्या उपासनेचें महत्त्व त्या उपासनेचें स्वरूप आपण समजून घेऊन

ती आचरणांत आणणें हल्लींच्या काळीं हि किती अगत्याचें आहे, हें मी काय सांगावें ? तुम्ही सर्व कांहीं जाणता.

या विषयाचें सविस्तर विवेचन श्रीसमर्थहृदय ग्रन्थांतील प्रकरण [६] श्रीमत् ग्रंथराज दासबोध-(२) उत्तरार्ध, यांतील पोटविभाग ७ आणि ८ यांत आलें आहे. त्याची पुनरुक्ति करणें नको. पण त्याच्या जोडीला पुढील पदें वाचण्यांत असावीं:

## (१) गि. लि. ९१ वें पद

आत्माराम सर्वांचे अंतरीं रे। आत्माराम हा नित्य निरंतरीं रे।
आत्माराम वर्तती देहभरीं रे। आत्माराम नसतां कैंची उरी रे॥ ध्रु०

आत्माराम वर्तवी ब्रह्मादिक रे। आत्माराम चालवी तिन्ही लोक रे।
आत्माराम तों सर्व हि विवेक रे। आत्माराम नसतां कैंचे लोक रे।
दास म्हणे हे माझी उपासना रे। पाहों जातां पुरली त्रिभुवना रे।
पिंडब्रह्मांडतत्त्वविवंचना रे। ज्ञानरूपें दाखवी निरंजना रे॥ १

## (२) गि. लि. ९२ वें

आदिशक्ती परमेश्वरी नारायणी रे। सर्व कांहीं हे इची च करणी रे।
कळों आली तत्त्वविवंचनीं रे। त्रिगुणी हे अवतारमांडणी रे॥ ध्रु०

शक्तिविणें कोण्हाचें काय चाले रे। शक्तीविणें शरीर कैसें हाले रे।
शक्तीविणें वचन कोण बोले रे। शक्तीगुणें सकल थोर जाले रे॥ १

परा पश्यंती मध्यमा वैखरी रे। जयेचेनि उठती वाचा च्यारी रे।
शक्तीविणें बापुडा देहधारी रे। शक्तीविणें तो कांहीं च न करी रे॥ २

मुळारंभीं तयेचा उदो जाला रे। पांचा भूतांचा गोंधळ मांडला रे।
रात्रिदिवस लो मायेचा लागला रे। सदानंदीं आनंद मोठा बोला रे॥ ३

सर्व शक्ती आहे विस्तारली रे। देव दैत्य उदंड ख्याती जाली रे।
संतसाधुविचारीं प्रवर्तली रे। मुळाकडे पाहातां गुप्त जाली रे॥ ४

दास म्हणे हें तिचें च करणें रे। कांहीं येक चालेना तिजविणें रे।
प्रचीतीनें पाहावें निरूपणें रे। लोक व्यर्थ बुडाले मीपणें रे॥ ५

त्या आदिशक्तीचें जगावर साम्राज्य आहे. ती ज्याला जितकी प्रसन्न

वा अनुकूल तितकी त्याची प्रतिष्ठा. तिची उपासना कोणी कळून करतात आणि कोणाला ती न कळत घडते. न कळून तिची उपासना घडली तर ऐहिक वैभव प्राप्त होईल, पण निरंजनाची प्राप्ति होणार नाहीं. पण तिचें स्वरूप कळून तिची उपासना घडण्यांत इह आणि पर, अशा उभय लोकीं कल्याण आहे. ती आदिशक्ती जगदंतरीं भरलेली आहे ना ? मग

**जो जगदांतरें मिळाला। तो जगदांतर चि जाला।**
**अरत्रीं परत्रीं तयाला। काये उणें॥** १५-१-१४

तो विश्वाचा अधिपति च होतो. देहांतला, जगांतला, विश्वांतला अंतरात्मा ज्यानें ओळखला तो ब्रह्मपदाला जाऊन पोचला म्हणून समजावें.

(६) श्रीसमर्थ शुद्ध उपासना म्हणतात, ती ही व ती त्यांनीं केली. ती च आम्हां सर्व सांप्रदायिकांना करतां आली तर च आम्ही त्यांचे खरे भक्त. सांप्रदायिकांनीं अट्टहास करावयाचा असेल, तर तो ही उपासना प्रकट होण्यासाठीं करावा. ती प्रकट न होतां केलेले सारे प्रयत्न विफल होत. ही उपासना सर्व कर्तृत्वाचें मूळ होय, हें लक्षांत घ्यावें. तींत सांप्रदायाचें सारें सामर्थ्य सांठविलेलें आहे. ती साधण्यांत च आपलें आणि जगाचें कल्याण आहे. शिष्य आतुरतेनें म्हणाला असेल, फार विस्तार ऐकून माझें मन भांबावतें, मला कृपा करून एका ओवींत अंतरात्म्याच्या उपासनेचें स्वरूप सांगा व ती मी कशी करावी, तें हि सांगा. दयावंत श्रीसमर्थ अनन्य भक्ताचे लाड पुरविण्यास नेहमीं तत्पर असतात. त्यांनीं म्हटलें, ऐक, हृदयावर कोरून ठेव—

**नारायण असे विश्वीं। त्याची पूजा करीत जावी।**
**याकारणें तोषवावी। कोणी तरी काया॥** १५-९-२५

जगांत च नव्हे, तर साऱ्या विश्वांत नारायण भरलेला आहे आणि त्याची पूजा करावयास श्रीसमर्थ सांगत आहेत ! अशा विश्वव्यापक भगवंताची पूजा कशी करावी ? कोणाला हि मोठें कोडें वाटेल. तें कोडें अत्यंत सुलभ रीतीनें उलगडून श्रीसमर्थ सांगतात—

**याकारणें तोषवावी। कोणी तरी काया॥**

आपल्या बोलण्याचालण्यानें, आपल्या कोणत्या हि कृतीनें, कोणत्या हि

जीवाचा—केवळ मनुष्याचा च नव्हे, तर कोणत्या हि प्राण्याचा—संतोष झाला, म्हणजे ती परमेश्वराची पूजा झाली, असें समजावें !

(७) किती उच्च तत्त्व या शिकवणींत भरलेलें आहे. कोणत्या हि जीवाचा संतोष ! कुत्र्यामांजराच्या जीवाला संतोष दिला, गाढवाहून नीच प्राणी कोठून आणावा, त्या गाढवाच्या हि जीवाला आपण आपल्या कृतीनें संतोषविलें, त्याला जीवदान दिलें, तळमळत असतां पाणी पाजलें, उपाशी मरत असतां खायाला घातलें, तर ती जर परमेश्वराची पूजा होत असेल, तर माणसांना सुख दिलें, समाजाची सेवा केली, राष्ट्राला सुखी ठेवलें, तर ती ईश्वराची पूजा होणार नाहीं काय ? प्राणीमात्रांत नारायण भरलेला आहे, हें पटल्यावर मला तुमचा किंवा तुम्हांला माझा द्वेष करतां येईल काय ? या समाजानें त्या समाजाला किंवा त्या समाजानें या समाजाला पाण्यांत पाहणें योग्य होईल काय ? नारायणाच्या घरीं तें रुजू होईल काय ? एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राला पायाखालीं तुडवावें, लुबाडावें, सर्वस्वीं नागवावें, दास्यांत ठेवावें, हें ईश्वराला सहन होईल काय ? नारायण असें विश्वीं, याचा शेवटचा अर्थ, मी च सर्वांत आहे, असा च होत नाहीं काय ? मग मी च माझा द्रोह कसा करावा ? मी च माझा छळ कसा करावा ? शंका वाटत नाहीं कीं, विश्वांत भरलेला नारायण दिसूं लागला, म्हणजे वास्तविक आत्मौपम्य बुद्धि निर्माण होऊन जगांत सर्वत्र सुखशांतीचें साम्राज्य अवतीर्ण झालें पाहिजे.

सांगा, जागतिक कल्याणाचें याहून उदात्त तत्त्व, जगांत आजपर्यंत अन्य कोणी प्रतिपादिलेलें आहे काय ? जोंवर हें तत्त्व सर्वांना मान्य झालें नाहीं व सर्वांनीं तें प्रामाणिकपणें आचरणांत आणलें नाहीं तोंवर जगांत सुख, समाधान, शांति हीं नांदणार नाहींत. हें तत्त्व पाळण्याचा जगानें संकल्प केला तर जगांत लढाया संभवतील काय ? समाजांत कलह माजतील काय ? व्यक्तिव्यक्तींत भांडणें लागतील काय ? हें तत्त्व हा च राजनीतीचा ध्रुवाचा तारा समजून तो अखंड डोळ्यापुढें ठेवून राष्ट्रें वागूं लागतील, तर World Order कां World Security म्हणून जी म्हणतात, ती जागतिक सुस्थिति प्राप्त होण्याला विलंब लागेल काय ? सांगा, या उपासनेंत अन्याय, अत्याचार, अतिक्रमण यांना थारा कोठें आहे ? तात्पर्य, धर्मांत, व्यवहारांत, राजकारणांत, कोठें हि हें उपासनेचें तत्त्व आचरणांत आणा, त्याचें फळ जें सुख—शांति—

समाधान, तें प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं. विश्वांत भरलेल्या त्या नारायणाच्या चरणीं माझी प्रार्थना इतकी च कीं, जगाचें बरें वाईट करण्याची सत्ता ज्या राष्ट्रांच्या हातीं आज आहे, किंवा कालांतरानें जाईल, त्यांचें लक्ष श्रीसमर्थांच्या या शुद्ध उपासनेकडे जावो आणि जगांत पुन्हां कृतयुग अवतीर्ण होवो.

(८) मी श्रीसमर्थांना त्रिकालज्ञ मानतों. सर्व काळीं अखिल जगाला मान्य व्हावीं अशीं जीं हजारों सिद्धांतवचनें त्या ईश्वरी पुरुषाच्या मुखांतून निघालीं, त्यांपैकीं हीं त्यांच्या उपासनेचीं वचनें होत. पुनरुक्ति होते म्हणून संकोच न करतां सांप्रदायिकांनीं तीं निरंतर घोकावीं आणि अखंड हृदयीं सांठवावीं.

**नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।**<br>**याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥ १५–९–२५**

**उपासना शोधून पाहिली । तों ते विश्वपाळिती जाली ।**<br>**न कळे लीला परीक्षिली । न वचे कोणा ॥ २६**

**देवाची लीळा देवेंविण । आणीक दुसरा पाहे कोण ।**<br>**पाहाणें तितुकें आपण । देव चि असे ॥ २७**

**उपासना सकळां ठाईं । आत्माराम कोठें नाहीं ।**<br>**याकारणें ठाईं ठाईं । रामें आटोपिलें ॥ २८**

**ऐसी माझी उपासना ।**

पण ती सहसा समजणार नाहीं,

**आणितां नये अनुमान ।**

पण एकदां का प्रत्ययाला आली, म्हणजे ती उपासकाला

**नेऊन घाली निरंजना । पैलिकडे ॥ २९**

या ओवींतील **नारायण** आणि त्या आतांपर्यंत सर्वतोमुखीं झालेल्या

**सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें ।**<br>**परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २०–४–२६**

या ओवींतील **भगवंत**, हे दोन्ही एक च, म्हणजे अंतरात्मा, म्हणजे च जनीं

जनार्दन. तो जनीं जनार्दन, तो भगवंत, तो नारायण ज्याला अनुकूल होतो, त्याला कधीं कोठें कमी पडत नाहीं.

(९) अशी ही श्रीसमर्थांची व्यापक उपासना आहे. नारायणाची व्यापकता जशी सर्व विश्वभर, तशी त्याची उपासना हि विश्वव्यापक च असणार.

(श्री) **रामउपासना माझी। त्रैलोक्यव्यापिनी पाहा॥** स्फु. प्र. ५५/६
(रा) **रामउपासना माझी। त्रैलोक्य सुख पावलें॥** स्फु. प्र. ६७/३
(म) **रामउपासना ऐसी। ब्रह्मांडव्यापिनी पाहा॥** मा. पं. ४–१७

अशा या व्यापक उपासनेंत धर्माचा, वर्णाचा, जातीचा, पंथाचा, कशाचा हि भेदाभेद नाहीं. अंतरात्मा सर्वत्र भरलेला आहे ना? मग त्याच्या उपासनेंत द्वेषमत्सरादि दुर्गुणांना थारा मिळणार कसा? अंतरात्मा म्हणजे मी च आणि मी सर्वव्यापी आहें. त्या मला कोणाचा द्वेष करतां येत नाहीं, द्रोह करतां येत नाहीं, कोणाला त्रास देतां येत नाहीं, कोणाच्या कशावर हि अतिक्रमण करतां येत नाहीं. जगांत कायमची शांतता नांदण्याला, या उपासनातत्त्वाचा स्वीकार केल्यावांचून दुसरा मार्ग नाहीं. सर्व जगाचा एक च धर्म होण्याची पात्रता श्रीसमर्थांच्या या शुद्ध उपासनेची आहे.

(१०) या सर्व प्रतिपादनाचें सार काढलें तर असें दिसतें कीं, ही अंतरात्म्याची उपासना आत्मज्ञानाहून निराळी नाहीं. अंतरात्म्याची उपासना आणि आत्मज्ञान एक च आणि हें शुद्ध ज्ञान च जगाचा उद्धार करील!

**ज्ञान आणि उपासना। दोनी येक चि पाहाना।**
**उपासनेकरितां जना। जगोद्धार॥** १३–२–८

आणि भौतिक ज्ञानानें काय होईल? त्याचा अनुभव जग आजपर्यंत घेत च आलें आहे. आतां यापुढें तरी जगानें शुद्ध ज्ञानाचा सर्वथैव आश्रय केला पाहिजे.

श्रीसमर्थोपदिष्ट शुद्ध मार्गांतील उपासनेच्या पुढची पायरी म्हणजे विमल ज्ञान होय.

**उपासना ज्ञानस्वरूप। ज्ञानीं चौथा देह आरोप।**
अंतरात्मा = मूळमाया = चौथा महाकारण देह = ज्ञान
**याकारणें सर्व संकल्प। सोडून द्यावा॥ १९–४–१०**

**पुढें परब्रह्म विशाळ । गगनासारिखें पोकळ ।**
**घन पातळ कोमळ । काये म्हणावें ॥ २१**

**उपासना म्हणिजे ज्ञान । ज्ञानें पाविजे निरंजन ।**
**योगियांचें समाधान । येणें रीतीं ॥ २२**

त्या समाधानाचा आतां आपण आपल्या मगदुराप्रमाणें पुढील प्रकरणांत विचार करूं.

( ११ ) या प्रकरणाचा उपसंहार करतांना मला इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, श्रीसमर्थवाङ्मयांत हा अंतरात्म्याच्या शुद्ध उपासनेचा विषय अत्यंत महत्त्वाचा आहे. श्रीसमर्थचरित्राच्या मागील खंडांत मीं माझ्या मतीप्रमाणें त्याचें विवेचन केलें आहे. पण विषयाच्या महत्त्वाच्या मानानें माझी मति कोती पडली. म्हणून माझी विश्वांत भरलेल्या नारायणाच्या चरणीं प्रार्थना कीं, त्यानें पुढें केव्हां तरी कोणा तरी विशाल बुद्धीच्या माणसाला हा विषय हातीं घेण्याची प्रेरणा करून त्याच्या कडून विषयाचें संपूर्ण महत्त्व जगाच्या निदर्शनास आणवावें. ग्रन्थारंभीं अकरावी फलश्रुति सांगतांना माझ्या मनांत मुख्यतः हा च शुद्ध उपासनेचा विषय घोळत होता. म्हणून या प्रकरणाचा शेवट करतांना मी पुन्हां ही च आशा प्रकट करतों कीं, या विषयाकडे जगांतील सर्व विचारवंतांचें, तत्त्वज्ञान्यांचें, राष्ट्रभक्तांचें आणि राजकारणी पुरुषांचें लक्ष जावो व श्रीसमर्थोपदिष्ट शुद्ध मार्गांतील अंतरात्म्याची शुद्ध उपासना हा च जगाचा धर्म होऊन जगांत सर्वत्र सुख, शांति, समाधान हीं नांदोत.

---

## ( ७ ) विमल ज्ञान

(१) सर्व कांहीं शुद्ध पाहिजे, (२) विमलाच्या उलट तें बहुधा ज्ञान, (३) विमल ज्ञानाची प्रस्तावना, (४) विमल ज्ञान – अहं ब्रह्मास्मि – ५×६, (५) विमळ ब्रह्म ७×४, (६) लोकमान्यांनीं उलगडलेलें कोडें च शिष्यानें श्रीसमर्थांपुढें टाकलें, (७) तें कोडें ७ × ६ त श्रीसमर्थ उलगडून दाखवितात, (८) ब्रह्मज्ञान म्हणजे भ्रम नव्हे, (९) तें ज्ञान होण्याला कोणत्या गोष्टी जुळून याव्या लागतात, (१०) तें ज्ञान नसेल तर बाकी सारें व्यर्थ, (११) जगाचा उद्धार करणारें हें ज्ञान म्हणजे प्रचंड शक्ति होय.

**जेथें नाहीं दृश्यभान। जेथें जाणीव हें अज्ञान।**
**विमळ शुद्ध स्वरूपज्ञान। यासि बोलिजे॥ ५–६–५**

(१) श्रीसमर्थांच्या धर्मकारणांतील शेवटचें प्राधान्य म्हणजे विमल ज्ञान होय. नुसतें ज्ञान नव्हे, विमल ज्ञान. श्रीसमर्थांना सर्व कांहीं शुद्ध, निर्मल, विमल पाहिजे होतें. शुद्धतेवर त्यांचा अति भर असे. काया, वाचा, मन, क्रिया, भाषा, धाटी, मुद्रा, चित्त, भाव, भक्ति, विवेक, विचार, भजन, निरूपण, गुण, हृदय सर्व कांहीं त्यांना शुद्ध पाहिजे होतें. हें मी त्यांच्या बोलण्याकडे पाहून च सांगत आहें. शुद्धतेविषयीं हा त्यांचा कटाक्ष पाहिला म्हणजे ते स्वतः कसे वागत असले पाहिजेत व दुसऱ्यांनीं कसें वागलेलें त्यांना आवडत असेल याविषयीं मला कांहीं कांहीं कल्पना होतात, पण त्या तशा तुम्हांला हि करतां येतील, म्हणून सांगणें नलगे. कांहीं ठिकाणीं तर प्रत्यक्ष ब्रह्माच्या मागें हि त्यांनीं विमल विशेषण लावलेलें आढळतें, मग ज्ञानाच्या मागें ते तें विशेषण लावतात, याचें नवल काय ? श्रीरामाच्या गुणादिकांच्या मागें हि त्यांनीं विमळ विशेषण लावलेलें आहे च ना ?

**विमळगुणशिळा रघुनायका। विमळकीर्ति परात्परदायका।**
**विमळमानस पुण्यपरायणा। विमळ नाम तुझें करुणाघना॥** करुणा० ६६

बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो।
सकळ त्यजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो।
विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी
विमळ हृदय होतां उद्धरे कूळकोटी ॥ करुणा० १४६/३

विमळगुणशिळाचे आदरें गूण गावे।
विमळगुणशिळाचे दास वाचे वदावे।
विमळगुणशिळाचा अंतरीं वेध लागो।
विमळगुणशिळाचा रंगणीं रंग जागो ॥ ४

खरें म्हणजे, विमळ विशेषणाचें निमित्त करून, श्रीसमर्थहृदयांत दाटलेलें या श्लोकांतील श्रीरामावरील प्रेम च मला आपल्या नजरेस पाडावेंसें वाटलें.

(२) ज्ञान विमल पाहिजे, असें म्हटलें म्हणजे साहजिक प्रश्न उत्पन्न होतो कीं, विमलाच्या उलट, विमल नव्हे असें मलिन किंवा शबल ज्ञान असूं शकतें तर? हो, असूं शकतें. अशा ज्ञानाला श्रीसमर्थ ‘बहुधा ज्ञान’ म्हणतात व त्याचें सविस्तर वर्णन पांचव्या दशकाच्या पांचव्या समासांत त्यांनीं केलें आहे. विमलज्ञानाव्यतिरिक्त सारें ज्ञान ‘बहुधा ज्ञान’ होय. आज आपण खालीं पाण्यांतून आणि वर आकाशांतून संचार करीत आहोंत, पण उद्यां पाण्यावरून च सरळ चालतां येण्याचा जरी शोध लागला, तरी त्यास विमल ज्ञान म्हणतां येणार नाहीं. एकदम एका क्षणांत एकाद्या राष्ट्राचा च काय, पण सबंध पृथ्वीचा संहार करण्याची ज्ञानानें शक्ति आली, तरी तें शुद्ध ज्ञान नव्हे. तिऱ्हाईत, अनोळखी मनुष्य आपणाजवळ येऊन बसला आणि आपणांस त्याच्या मनांतलें सारें ओळखतां आलें, तर त्यास आपण अद्भुत चमत्कार मानूं, पण तें हि खरें ज्ञान नव्हे, तें हि ‘बहुधा ज्ञान’ च होय.

जाणावें दुसऱ्याचे जीवीचें। हें ज्ञान वाटे साचें।
परंतु हें आत्मज्ञानाचें। लक्षण नव्हे ॥ ५-५-३४

माहानुभाव माहाभला। मानसपूजा करितां चुकला।
कोणी येकें पाचारिला। ऐसें नव्हे म्हणोनी ॥ ३५

मानसपूजेंत च ती आंखूड झालेल्या माळेची गोष्ट १४-८-४३ ते ४५ त आलेली सर्वांना ठाऊक च आहे. कोणी एकानें डोळे मिटून मानसपूजा करीत असतां देवाला आधीं मुकुट घातला व मग तो माळ घालवयास लागला, तर माळ कांहीं जाईना, ती आंखूड झाली होती—कुठली माळ? मानसपूजेंतील—तेव्हां गृहस्थ मोठ्या फिकिरींत पडला, आतां काय करावें? घातलेला मुकुट काढावा, तरी पंचाईत, न काढावा तर माळ तशी च राहते! असा मानसपूजेंत त्याच्या मनांत गोंधळ चालला असतां, त्याला भेटावयास दुसरे एक गृहस्थ आले, त्यांनीं पाहिलें, हे ध्यानस्थ बसले आहेत, म्हणून ते हळू च येऊन बसले. पहिल्या गृहस्थाची मानसपूजा संपून ते डोळे उघडून पाहतात, तों ते दुसरे गृहस्थ बसलेले दिसले, तेव्हां यांनीं विचारलें, आपण केव्हां आला? त्यांनीं उत्तर दिलें, आपण माळ घालण्याच्या फिकिरींत पडला होतां, तेव्हां येऊन बसलों! असें जरी दुसऱ्याच्या मनांतलें ओळखतां आलें,

**ऐसी जाणे अंतरस्थिती। तयासी परम ज्ञाता म्हणती।**
**परंतु जेणें मोक्षप्राप्ती। तें हें ज्ञान नव्हे॥ ३६**

तें शुद्ध, निर्मल, विमल ज्ञान निराळें च आहे! तें प्राप्त करून घेणें, हें नरजन्मांतील श्रेष्ठ कर्तव्य होय. नरदेहांतील अंतिम साध्य तें तें. त्यानें च या देहाचें सार्थक होणार आहे. आकाशांत उडतां आलें तर जरूर उडा, पाण्यांत दडतां आलें तर निर्भयपणें दडा, गांवेंच्या गांवें एकदम ओस पाडतां आलीं तर बेलाशक पाडा, लक्षावधी माणसांचे प्राण क्षणार्धांत घेतां आले तर खुशाल घ्या, पण त्यायोगें जन्माची सार्थकता झाली, असें मात्र समजूं नका. अशा ज्ञान्याला कोणती गति मिळत असेल ती मिळो, पण ती सद्गति मात्र नसणार. विमल ज्ञानावांचून सद्गति दुर्मिळ होय!

(३) असें तें सद्गतिदायक विमल ज्ञान कोणतें बरें? तें श्रीसमर्थांनीं सांगितलेलें शंभर ठिकाणीं आढळेल. आठव्या दशकाचें नांव च ज्ञानदशक आहे व त्याचा आरंभ च मुळीं

**श्रोतीं व्हावें सावध। विमळ ज्ञान बाळबोध।**
**गुरुशिष्यांचा संवाद। अति सुगम परियेसा॥ ८-१-१**

असा केला आहे. कल्याणस्वामी तर दासबोधाच्या आरतींत सबंध ग्रन्थराजाला च

**विमळ ज्ञान बाळबोधा ।**

म्हणून संबोधीत आहेत. ती च ग्वाही निवृत्तिरामग्रंथकार देत आहेत.

**समर्थग्रंथ श्रीदासबोध । तेथूनि सर्व हि बोध प्रबोध ।**
**विमळ ज्ञान बाळबोध । सच्छिष्यांसी बाणेल ॥ ११-१८४**

परंतु, आपल्या सर्वांची क्षमा मागून म्हणतों कीं, माझ्या मतें सबंध दासबोधांत शुद्ध ज्ञानाचा मुख्य समास म्हणजे पांचव्या दशकाचा सहावा समास होय. त्या समासाचें नांव हि 'शुद्धज्ञाननिरूपण' असें च आहे. त्या समासांत फार सुंदर प्रस्तावना करून तें ज्ञान श्रीसमर्थांनीं अवघ्या तीन च शब्दांत सांगितलें आहे. त्या ज्ञानापेक्षां त्याची प्रस्तावना च फार मोठी आहे. श्रीसमर्थांना त्या ज्ञानाची महती शिष्याच्या मनावर बिंबवावयाची होती, त्याची जिज्ञासा वाढवावयाची होती, म्हणून त्यांना प्रस्तावनेंत च शिष्याला अर्धा अधिक वळवून घेण्यासाठीं प्रस्तावना च मोठी करावी लागली आहे. न पाहतां मी म्हणूं शकतों कीं, त्या प्रस्तावनेचा बराचसा भाग, किंबहुना, सर्व च प्रस्तावना 'हृदयांत' उद्धृत केलेली असणार, कारण या समासांत श्रीसमर्थांनीं आपल्या 'जीवींचें गुज' सांगितलेलें असल्यामुळें तें अवतार, हृदय आणि संप्रदाय, या चरित्राच्या तिन्ही खंडांत सारखेंच व्यापून उरणारें आहे. त्याची पुनरुक्ति होत असली तरी मला प्रिय च आहे व आपणांस हि प्रिय च वाटेल.

विमल ज्ञानाची श्रीसमर्थ प्रस्तावना करितात :

**ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान ।**
**पाहावें आपणासि आपण । या नाव ज्ञान ॥ ५-६-१**
**मुख्य देवास जाणावें । सत्य स्वरूप वोळखावें ।**
**नित्यानित्य विचारावें । या नाव ज्ञान ॥ २**
**जेथें दृश्य प्रकृति सरे । पचभूतिक वोसरे ।**
**समूळ द्वैत निवारे । या नाव ज्ञान ॥ ३**
**मनबुद्धिअगोचर । न चले तर्काचा विचार ।**
**उंलेख परेहूनि पर । या नाव ज्ञान ॥ ४**
**जेथें नाहीं दृश्य भाव । जेथें जाणीव हें अज्ञान ।**
**विमळ शुद्ध स्वरूपज्ञान । यासि बोलिजे ॥ ५**

सर्वसाक्षी अवस्ता तुर्या । ज्ञान ऐसें म्हणती तया ।
परि तें जाणिजे वायां । पदार्थज्ञान ॥ ६

दृश्य पदार्थ जाणिजे । त्यास पदार्थज्ञान बोलिजे ।
शुद्ध स्वरूप जाणिजे । या नाव स्वरूपज्ञान ॥ ७

जेथें सर्व चि नाहीं ठाईचें । तेथें सर्वसाक्षत्व कैंचें ।
म्हणोनि शुद्ध ज्ञान तुर्येचें । मानूं चि नये ॥ ८

ज्ञान म्हणिजे अद्वैत । तुर्या प्रत्यक्ष द्वैत ।
म्हणोनि शुद्ध ज्ञान तें सतंत । वेगळें चि असे ॥ ९

ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण । शुद्ध स्वरूप चि आपण ।
या नाव शुद्ध स्वरूपज्ञान । जाणिजे श्रोतीं ॥ १०

महावाक्य उपदेश भला । परी त्याचा जप नाहीं बोलिला ।
तेथीचा तो विचार चि केला । पाहिजे साधकें ॥ ११

माहांवाक्य उपदेशसार । परी घेतला पाहिजे विचार ।
त्याच्या जपें अंधकार । न फिटे भ्रांतीचा ॥ १२

माहावाक्याचा अर्थ घेतां । आपण वस्तु चि तत्त्वतां ।
त्याचा जप करितां वृथा । सीण चि होये ॥ १३

माहावाक्याचें विवरण । हें मुख्य ज्ञानाचें लक्षण ।
शुद्ध लक्ष्यांशें आपण । वस्तु च आहे ॥ १४

आपला आपणासि लाभ । हें ज्ञान परम दुल्लभ ।
जें आदिअंतीं स्वयंभ । स्वरूप चि स्वयें ॥ १५

जेथून हें सर्व हि प्रगटे । आणि सकळ हि जेथें आटे ।
तें ज्ञान जालियां फिटे । भ्रांति बंधनाची ॥ १६

मतें आणि मतांतरें । जेथें होती निर्विकारें ।
अति सूक्ष्म विचारें । पाहातां ऐक्य ॥ १७

जें या चराचराचें मूळ । शुद्ध स्वरूप निर्मळ ।
या नाव ज्ञान केवळ । वेदांतमतें ॥ १८

शोधितां आपलें मूळ स्थान । सहज चि उडे अज्ञान ।
या नाव म्हणिजे ब्रह्मज्ञान । मोक्षदायेक ॥ १९

आपणासि वोळखों जातां। आंगीं बाणे सर्वज्ञता।
तेणें येकदेसी वार्ता। निशेष उडे॥ २०

मी कोण ऐसा हेत। धरून पाहातां देहातीत।
आवलोकितां नेमस्त। स्वरूप चि होये॥ २१

असो पूर्वीं थोर थोर। जेणें ज्ञानें पैलपार।
पावले ते साचार। ऐक आतां॥ २२

व्यास वसिष्ठ माहामुनी। शुक नारद समाधानी।
जनकादिक माहांज्ञानी। येणें चि ज्ञानें॥ २३

वामदेवादिक योगेश्वर। वाल्मीक अत्रि ऋषेश्वर।
शोनिकादि अध्यात्मसार। वेदांतमतें॥ २४

सनकादिक मुख्यकरूनि। आदिनाथ मीन गोरक्षमुनी।
आणीक बोलतां वचनीं। अगाध असती॥ २५

सिद्ध मुनी माहानुभाव। सकळांचा जो अंतर्भाव।
जेणें सुखें माहादेव। डुल्लत सदा॥ २६

जें वेदशास्त्रांचें सार। सिद्धांतधादांत विचार।
ज्याची प्राप्ती भाग्यानुसार। भाविकांस होये॥ २७

साधु संत आणि सज्जन। भूत भविष्य वर्तमान।
सर्वत्रांचें गुह्य ज्ञान। तें सांगिजेल आतां॥ २८

तीर्थें व्रतें तपें दानें। जें न जोडे धूम्रपानें।
पंचाग्नी गोरांजनें। जें प्राप्त नव्हे॥ २९

सकळ साधनाचें फळ। ज्ञानाची सीग चि केवळ।
जेणें संशयाचें मूळ। निशेष तुटे॥ ३०

छपन्न भाषा तितुके ग्रन्थ। आदिकरून वेदांत।
या इतुकियांचा गहनार्थ। येक चि आहे॥ ३१

जें नेणवे पुराणीं। जेथें सिणल्या वेदवाणी।
तें चि आतां ये चि क्षणीं। बोधीन गुरुकृपें॥ ३२

पाहिलें नस्तां संस्कृतीं। रीग नाहीं मऱ्हाष्टग्रन्थीं।
हृदईं वसल्या कृपामूर्ती। सद्गुरुस्वामी॥ ३३

आतां नलगे संस्कृत । अथवा ग्रन्थ प्राकृत ।
माझा स्वामी कृपेसहित । हृदई वसे ॥ ३४

न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास ।
प्रेत्नेंविण सौरस । सद्गुरुकृपा ॥ ३५

ग्रन्थमात्र मऱ्हाष्ट । त्याहून संस्कृत श्रेष्ठ ।
त्या संस्कृतामध्यें पष्ट । थोर तो वेदांत ॥ ३६

त्या वेदांतापरतें कांहीं । सर्वथा श्रेष्ठ नाहीं ।
जेथें वेदगर्भ सर्व हि । प्रगट जाला ॥ ३७

असो ऐसा जो वेदांत । त्या वेदांताचा हि मथितार्थ ।
अति गहन जो परमार्थ । तो तूं ऐक आतां ॥ ३८

अरे गहनाचें हि गहन । तें तूं जाण सद्गुरुवचन ।
सद्गुरुवचनें समाधान । नेमस्त आहे ॥ ३९

सद्गुरुवचन तो चि वेदांत । सद्गुरुवचन तो चि सिद्धांत ।
सद्गुरुवचन तो चि धादांत । सप्रचीत आतां ॥ ४०

जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन ।
जेणें माझें समाधान । अत्यंत जालें ॥ ४१

तें हें माझे जीवीचें गुज । मी सांगेन म्हणतों तुज ।
जरी अवधान देसी मज । तरी आतां ये च क्षणीं ॥ ४२

सांगतों, ऐक, असें नुसतें म्हणत आहेत, पण सांगत मात्र नाहींत. असें आणखी कितीदां म्हणणार आणि सांगण्याचें टाळणार, निदान लांबणीवर टाकणार ? शिष्य अगदीं उतावीळ झाला, त्याला धीर निघेना, त्याचा चेहरा उतरला, डोळे भरून आले, आवाज बदलला, केविलवाणा होऊन त्यानें सदुरूचे पाय घट्ट धरिले,

शिष्य म्लानवदनें बोले । धरिले सद्दढ पाउलें ।
मग बोलों आरंभिलें । गुरुदेवें ॥ ४३

श्रीसमर्थांना त्याची परीक्षा च पहावयाची होती. त्याची ती स्थिति अवलोकन करून श्रीसमर्थांचें चित्त उल्हसित झालें असलें पाहिजे.

( ४ ) शिष्य परीक्षेंत उतरला. श्रीसमर्थांना त्याची खात्री पटली आणि

मग अवघ्या तीन च शब्दांत त्यांनीं तें शुद्ध ज्ञान सांगून त्याचें समाधान केलें. आपण हि ते तीन शब्द ऐकूं या. ' ऐकूं ' एवढें आपलें भाग्य कोठें आहे ? आपण वाचूं ते तीन शब्द. पण त्या तीन शब्दांपेक्षां सध्यां तरी आम्हांस वरील प्रस्तावना च जास्त आकर्षक वाटत आहे. ते तीन शब्द श्रीरामानें श्रीसमर्थांच्या कानांत सांगितले आणि श्रीसमर्थांनीं ते हजारों शिष्यांच्या कानांत सांगितले. आज ते आपणांस कागदावर नुसते वाचावयास मिळत आहेत. ते शब्द आमच्या कानांत जेव्हां श्रीसमर्थ सांगतील, तेव्हां आम्हांस वरील प्रस्तावनेचा विसर पडून ते च तीन शब्द आमच्या कानांत सारखे घुमत राहतील. तोंवर त्यांची प्रस्तावना च आम्हांस चटका लावीत राहील; असो.

ते तीन शब्द म्हणजे ' अहं ब्रह्मास्मि '.

**अहं ब्रह्मास्मि माहांवाक्य । येथीचा अर्थ अतर्क्य ।**
**तो हि सांगतो ऐक्य । गुरु शिष्य जेथें ॥ ४४**

मी ब्रह्म आहें आणि तूं कोण आहेस ? तत्त्वमसि । तूं हि तें च आहेस. तेव्हां तूं आणि मी एक च आहोंत, असें म्हणून श्रीसमर्थ शिष्यास निःशंक होण्याविषयीं बजावीत आहेत :

**ऐक शिष्या येथींचें वर्म । स्वयें तूं चि आहेसि ब्रह्म ।**
**येविषईं संदेह भ्रम । धरूं चि नको ॥ ४५**

यापुढील सहा ओंव्यांत आत्मनिवेदनभक्तीचें स्वरूप सांगून गुरुशिष्याच्या ऐक्याचें स्पष्टीकरण केल्यावर

**असो गुरूचे ठाईं अनन्यता । तरी तुज कायेसी रे चिंता ।**
**वेगळेपणें अभक्ता । उरों चि नको ॥ ५२**

असें शिष्यास अभयवचन देत आहेत आणि शेवटीं हें शुद्ध ज्ञान दृढ होण्याचा म्हणजे अंतरीं कायमचें ठसण्याचा उपाय सुचवितात—

**आतां हें चि दृढीकर्ण । व्हावया करी सद्गुरुभजन ।**
**सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५३**

तात्पर्य, ' अहं ब्रह्मास्मि ' चा साक्षात्कार होणें, हें विमल ज्ञान होय. सद्गुरुकृपेवांचून, नुसते ग्रंथ वाचून तो साक्षात्कार होणार नाहीं. तेव्हां

आपण हि सद्गुरुचरणीं अचल दृष्टि ठेवून त्यांचें अखंड भजन करीत राहूं या, केव्हां तरी त्यांना दया येऊन ते कृपा करतील, हा दृढ विश्वास असावा.

( ९ ) मी ब्रह्म आहें, पण ब्रह्म म्हणजे काय, तें सर्व लहान मोठ्या काव्यांत आणि हजारों हजार ओव्यांत श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. आपण किती ठिकाणचें पाहूं शकणार ? प्रस्तुत आपला विषय चालला आहे विमळ ज्ञानाचा, तेव्हां एका ठिकाणीं श्रीसमर्थांनीं विमळब्रह्माचें निरूपण केलें आहे, तेवढें च स्थळ आपण पाहिलें म्हणजे आपलें काम भागेल. सातव्या दशकाचा चवथा समास विमळब्रह्मनिरूपणाचा आहे. ५ × ६ आणि ७ × ४ हे दोन समास आपण कृपा करून अवलोकावे. ५ × ६ त मी ब्रह्म आहें, हें ठरलें व मी ब्रह्म आहें म्हणजे काय आहें, हें ७ × ४ वाचून समजतें.

**जेथें अज्ञान सरे। ज्ञान तें हि नुरे।**
**विज्ञानवृत्ति मुरे। परब्रह्मीं ॥ ७–४–५१**
**ऐसें ब्रह्म शाश्वत। जेथें कल्पनेसी अंत।**
**योगी जना येकांत। अनुभवें जाणावा ॥ ५२**

येथें येकांत म्हणजे ब्रह्माशीं ऐक्य, तादात्म्य. त्या ऐक्याचा अनुभव ७ × ५ त घेऊन व द्वैताचें निरसन होऊन शिष्यानें समाधानाचे उद्गार काढले कीं, महाराज, आपण

**अद्वैत ब्रह्म निरोपिलें। जें कल्पनेरहित संचलें।**
**क्षणयेक तद्‌ाकार केलें। मज या निरूपणें ॥ ७–६–१**

आणि म्हणाला, मला आतां असें वाटतें कीं, असें च अखंड तदाकार होऊन निश्चेष्ट पडून रहावें ! मी ब्रह्म झालों, तो मी आतां पुन्हां संसाराकडे कां वळूं, व्यवहारांत कां पडूं, कामक्रोधाच्या आधीन कां होऊं ! हें माझें च मला आतां बरें वाटत नाहीं. म्हणजे लोकमान्यांनीं गीतारहस्यांत जें कोडें उलगडलें, तेंच कोडें येथें शिष्यानें श्रीसमर्थांपुढें टाकलें. तो म्हणतो—

**ब्रह्म होऊन संसार करणें। हे हि विपरीत दिसे ॥ ७–६–८**

**जो स्वयें ब्रह्मचि जाला। तो मागुता कैसा आला।**
**ऐसें ज्ञान माझें मजला। प्रशस्त न वटे ॥ ९**

**ब्रह्म चि होऊन जावें। कां तें संसारीं च असावें।**
**दोहींकडे भरंगळावें। किती म्हणूनी ॥ १०**

**ब्रह्म सुख नेलें संसारें। संसार गेला ज्ञानद्वारें।**
**दोनीं अपुरीं, पुरें। येक हि नाहीं ॥ १४**

**याकारणें माझें चित्त। चंचळ जालें दुश्चीत।**
**काये करणें निश्चीत। येक हि नाहीं ॥ १५**

**ऐसा श्रोता करी विनती। आतां राहावें कोणे रीतीं।**
**म्हणे अखंड माझी मती। ब्रह्माकार नाहीं ॥ १६**

(७) या प्रश्नाचें श्रीसमर्थांनीं सुंदर उत्तर देऊन शिष्याचें समाधान केलें आहे. मी विस्तार करीत नाहीं. वाचकांस च विनंति करतों कीं, तो सबंध समास आपण च कृपा करून अवलोकावा. श्रीसमर्थांच्या उत्तराला अनुरूप असें च रहस्य गीतेंतून हि लोकमान्यांनीं काढलें आहे. श्रीसमर्थांच्या उत्तरांतील मर्म तीन ओंव्यांत आलें आहे:

**ब्रह्म चि होऊन जे पडिले। ते चि मुक्तपदास गेले।**
**येर ते काये बुडाले। व्यासादिक ॥ ७-६-१८**

**म्हणोनी बोलतां चालतां। निचेष्टित पडिलें नस्तां।**
**मुक्ति लाभे सायोज्यता। सद्गुरुबोधें ॥ ४४**

**मीपणापासून सुटला। तो चि येक मुक्त जाला।**
**मुका अथवा बोलिला। तरी तो मुक्त ॥ ५४**

तात्पर्य, ज्ञानोत्तर कर्म करीत राहिल्यानें ज्ञानाला बाध येत नाहीं.

(८) हें ब्रह्मज्ञान म्हणजे निवळ भ्रम होय, असें मानणारे तेव्हां होते, आज हि आहेत व सर्व काळीं असणार च. नांव, गांव सांगणें नलगे, पण वेदांतावर ग्रन्थ लिहिणाऱ्या एका विद्वानाच्या तोंडून एका व्याख्यानांत असले उद्गार निघालेले मीं ऐकले आहेत. आपणांस उमगत नाहीं म्हणून ब्रह्मज्ञान हें थोतांड होय, असें बेलाशक प्रतिपादन करण्यानें आपण किती ग्रन्थांचा उच्छेद करीत आहोंत व प्रत्ययानें बोलणाऱ्या किती महापुरुषांचा आपण अविचारानें उपमर्द करीत आहोंत, याचें अशा विद्वानांना भान नसतें, असें वाटतें. ब्रह्म नाहीं च असें मानलें तर, श्रीसमर्थ म्हणतात—

अभाव चि म्हणों सत्य। तरी वेदशास्त्र कैसे मिथ्य।
आणि व्यासादिकांचें कृत्य। वाउगें नव्हे ॥ ७-७-३१

म्हणोनि मिथ्या म्हणतां नये। बहुत ज्ञानाचे उपाये।
बहुतीं निर्मिलें तें काये। मिथ्या म्हणावें ॥ ३२

अद्वैतज्ञानाचा उपदेश। गुरुगीता तो महेश।
सांगता होये पार्वतीश। पार्वतीप्रती ॥ ३३

अवधूतगीता केली। गोरक्षीस निरोपिली।
ते अवधूतगीता बोलिली। ज्ञानमार्ग ॥ ३४

विष्णु होऊन राजहंस। विधीस केला उपदेश।
ते हंसगीता जगदीश। बोलिला स्वमुखें ॥ ३५

ब्रह्मा नारदा उपदेशित। चतुश्लोकी भागवत।
पुढें व्यासमुखें बहुत। विस्तारलें ॥ ३६

वसिष्ठसार वसिष्ठऋषी। सांगता जाला रघुनाथासी।
कृष्ण सांगे अर्जुनासी। सप्तश्लोकी गीता ॥ ३७

ऐसें सांगावें तें किती। बहुत ऋषी बोलिले बहुतीं।
अद्वैत ज्ञान आदिअंतीं। सत्य चि असे ॥ ३८

म्हणोनि मिथ्या आत्मज्ञान। म्हणतां पाविजे पतन।
प्रज्ञेरहित ते जन। तयांसी हें कळेना ॥ ३९

तितक्या उच्च कोटीला आपली प्रज्ञा जाऊं शकत नाहीं, म्हणून ब्रह्मज्ञान मिथ्या आहे, असें म्हणणें योग्य होणार नाहीं. अहंकार बाजूस सारून सद्गुरूला शरण जाऊन त्यांना विचारिलें पाहिजे. त्यांना तें ठाऊक असतें. त्यांना विमळ ज्ञान झालेलें असतें. प्रत्ययज्ञानी महापुरुष जें सांगतात, त्यावर सकृद्दर्शनीं विश्वास टाकला पाहिजे. असे पुरुष थोडे असतात, हें खरें, पण पृथ्वीच्या पाठीवर मुळीं च नसतील, असें कसें म्हणावें ? तें असो, पण श्रीज्ञानेश्वर, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम, श्रीसमर्थ यांच्यावरील तरी महाराष्ट्राचा विश्वास अढळ आहे ना ?

(९) या सर्वांनीं प्रतिपादिलेलें विमळ ज्ञान आपल्या प्रत्ययास येण्यासाठीं पुढील गोष्टी जुळून आल्या पाहिजेत :

**साधन अभ्यास आणि सद्गुरु ।**
**सच्छिष्य आणि सच्छास्त्र विचारु ।**
**सत्कर्म सद्वासना पारु ।**
**पाववी भवाचा ॥ ५-३-१२**

**सद्गुरुपासना सत्कर्म । सत्क्रिया आणि स्वधर्म ।**
**सत्संग आणि नित्य नेम । निरंतर ॥ १३**

**ऐसें हें अवघें चि मिळे । तरी च विमळ ज्ञान निवळे ।**
**नाहीं तरी पाषांड संचरे बळें । समुदाईं ॥ १४**

१ साधन, २ अभ्यास, ३ सद्गुरु, ४ सच्छिष्य, ५ सच्छास्त्रविचार. ६ सत्कर्म ( त्यांत च सत्क्रिया आली ), ७ सद्वासना, ८ सदुपासना, ९ स्वधर्म, १० सत्संग आणि ११ नित्य नेम, अशा या अकरा गोष्टींची अनुकूलता असावी, तेव्हां विमळ ज्ञान निवळे, म्हणजे आपल्या शुद्ध स्वरूपांत प्राप्त होतें. या अकरांपैकीं प्रत्येक च बाब सारख्या महत्त्वाची म्हटली पाहिजे. कारण यांतली कोणती हि एक गोष्ट कमी पडली म्हणजे समाजांत पाखंड माजतें. एक एका स्वतंत्र प्रकरणाचा विषय होऊं शकेल, अशी ही प्रत्येक बाब आहे. त्या सर्वांचें विवेचन केलेलें वाचकांस ग्रन्थराजांत व इतर काव्यांत आढळेल. उदाहरणार्थ नित्य नेमाविषयीं मला पट्कन् सांगतां येतें कीं, अंतर्भाव या लघु काव्याचा नित्य नेम हा च विषय आहे.

साधन, अभ्यास, स्वधर्म आणि नित्य नेम या चार बाबी वगळून बाकीच्या सात बाबींच्या मागें सत् हें विशेषण लावलेलें आहे, त्याकडे वाचकांचें लक्ष गेलें च असेल. सत् म्हणजे तरी शुद्ध च. आणि शुद्धता ही श्रीसमर्थांच्या पंचविध धर्मकारणांतली अधिष्ठात्री देवता च दिसते, हें आतांपर्यंतच्या विवेचनावरून आपल्या सर्वांच्या लक्षांत येऊन चुकलें च असेल.

एकदां विमळ ज्ञान झालें तरी या अकरा गोष्टींपैकीं कोणती च गोष्ट केव्हां हि सोडून चालणार नाहीं. मी ज्ञानी झालों, सिद्ध झालों, त्या मला आतां साधन आणि अभ्यास आणि नित्य नेम आणि सत्कर्म आणि स्वधर्म या गोष्टी पाहिजेत च कशाला, अशा घमेंडींत राहूं नये, तींत अधःपात आहे.

**मी तों ब्रह्म चि जालों स्वता ।**
**साधन कोण करील आतां ॥ ७-७-५४**

असें मनांत हि येऊं देऊं नये, त्यांत घात आहे. विमल ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें असेल आणि तें टिकवावयाचें असेल तर या अकरा हि बाबींची आराधना केली पाहिजे.

(१०) असें हें ज्ञान झालें नाहीं, आणि बाकी सर्व साधलें, तर तें सारें निरर्थक होय. विमल ज्ञान हें च जीवन. त्या ज्ञानावांचून जगणें आणि मरणें, दोन्ही सारखीं च.

**निरार्थक तीर्थें व्रतें तपें दानें ।**
**येका ब्रह्मज्ञानें वांचूनीयां ॥** ओ. श. ६–६

किंवा

**सर्व कांहीं येका आत्मज्ञानेंविण ।**
**दिसताहे सीण वाउगा चि ॥** स्फु. ओ. ४०–३

किंवा

**ज्ञानेंवीण योग ज्ञानेंवीण याग ।**
**ज्ञानेंवीण त्याग वाउगा चि ॥** स्फु. ओ. ४९–३
**वाउगा चि धर्म वाउगें चि कर्म ।**
**गर्भगीता वर्म बोलीयेली ॥ ४**
**बोलीयेली वर्म ज्ञान हें सार्थक ।**
**येर निरार्थक सर्व धर्म ॥ ५**

ग्रन्थराजांत हि ब्रह्मज्ञानाची अशी च थोरवी वर्णिली आहे :

**ध्यान धारणा मुद्रा आसन । भक्ती भाव आणि भजन ।**
**सकळ हि फोल, ब्रह्मज्ञान । जव तें प्राप्त नाहीं ॥ ५–१–३६**

हीं श्रीसमर्थवचनें ऐकावीं आणि मग आपल्याकडे पहावें. आपण सर्व जण– वाटल्यास बहुतेक जण म्हणूं या–आपलें आयुष्य कसें दवडीत असतों ? खाणें, पिणें, झोपीं जाणें, जागे होणें–पुन्हां तो च क्रम–खाणें, पिणें, झोपीं जाणें, जागे होणें आणि शेवटीं एकदां केव्हां तरी मरणें. शुद्धीवर म्हणून केव्हां च येणें नाहीं !

**नेणे मी मज काय करूं । नेणे मी मज काय करूं ।**
**मज माझा पडिला विसरु ॥ ध्रु० ॥**

**असतां योग वियोग पातला। जाउनि सज्जनसंग धरूं॥ १॥**
**जाउनि सद्गुरुपाय धरूं॥**
**दास म्हणे मज माझी भेटी। होतां भेद समस्त हरूं॥ २॥**

(११) हें विमल ज्ञान ही केवढी शक्ति आहे याची कल्पना च कधीं आपल्या मनांत येत नाहीं. मी ब्रह्म आहें, हें ज्ञान ज्याला झालें, त्याचें वर्तन कसें होईल, याचा विचार मनांत आणावा. तो किती निर्भय होत असेल. सर्वांत मोठें भय ज्या मरणाचें, तें त्याला कोठून होणार? त्याला जन्ममरण च नाहीं, तर त्याचें भय कोठलें? तो म्हणणार—

**आतां होणार तें होयेना कां। आणि जाणार तें जायेना कां।**
**तुटली मनांतील आशंका। जन्ममृत्याची॥** ६–२–४४
**संसारीं पुंडावे चुकले। देवां भक्तां ऐक्य जालें।**
**मुख्य देवास वोळखिलें। सत्संगेंकरूनि॥ ४५॥**

असा पुरुष म्हणजे दुसरे समर्थ च! समर्थांचें सामर्थ्य तें च त्याचें सामर्थ्य. समर्थांचें सारें कर्तृत्व त्याच्यांत आढळणार. तो प्रखर बुद्धीचा, अपार धारणेचा, निरभिमान वृत्तीचा, शांत, सत्त्वस्थ, विरक्त असणार. तो सर्वज्ञ, त्रिकालज्ञ म्हणावा. तो सहज जें बोलेल, तें च ब्रह्मज्ञान.

**जया अंतरीं भगवंत। अचळ राहिला निवांत।**
**तो स्वभावें जें बोलत। तें ब्रह्मनिरूपण॥ १४–३–२५**

असा पुरुष अखिल जगाचें कल्याण करूं शकेल, यांत काय नवल आहे?

**आत्मज्ञानें त्याग सर्वांचा करावा**
**मग उद्धरावा विश्व जन॥** ओ. श. ११–१३

जसें श्रीसमर्थांनीं स्वतः केलें.

**ऐसें आत्मज्ञान उद्धरी जगासी।**
**पाहेना तयासी काय करूं॥** स्फु. ओ. ५१–१

जगाचा उद्धार करण्याचें ज्या तत्त्वज्ञानाचें सामर्थ्य, त्याच्या कडे जग पाहीचना, त्याला कोण काय करणार? जगांत सुखशांति नांदावी म्हणून सत्ताधारी लोकांना चिंता लागली आहे, असें म्हणतात, तें खरें असेल तर त्यांच्या कानांवर श्रीसमर्थांची ही पंचविध योजना, हा त्यांनीं जगत्कल्याणाचा

दाखविलेला पंचलक्षणात्मक शुद्ध मार्ग कोणी तरी घातला पाहिजे. श्रीसमर्थांच्या महाराष्ट्रानें, खास त्यांचे म्हणविणारांनीं, त्यांची दीक्षा घेणारांनीं, त्यांचें नांव घेऊन भिक्षा मागणारांनीं त्यांच्या संपूर्ण तत्त्वज्ञानाचा विचार सर्वांच्या आधीं केला पाहिजे व जगास मार्गावर आणलें पाहिजे. जगाची तऱ्हा विचित्र असेल, तर जगाचा नाद सोडून द्या. श्रीसमर्थांचा अभिमान बाळगणारांनीं ही शिकवण स्वतःच्या तरी आचरणांत आणली पाहिजे.

या शुद्ध मार्गाच्या आचरणाचें फळ फार मोठें आहे. तें किती मोठें आहे, हें आपणांस कळावें, म्हणून त्या पत्रांतील शेवटच्या दोन ओंव्या पुन्हां नीट लक्ष्यांत आणा, अशी मी विनंति करतों.

**शुद्ध उपासना विमल ज्ञान ।**
**वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।**
**गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्ध मार्ग ॥**

**ऐसें हें पंचधा बोलिलें । इतुकें पाहिजे यत्नें केलें ।**
**म्हणिजे सकळ हि पावलें । म्हणे दासानुदास ॥**

या पांच गोष्टी तुम्ही हरप्रयत्नानें करा म्हणजे माझा आनंद आहे, म्हणजे मला तुमच्यापासून सर्व कांहीं पावलें, असें श्रीसमर्थ म्हणत आहेत. त्या पांच गोष्टी त्यांना इतक्या जिव्हाळ्याच्या वाटतात. तेवढ्या करा म्हणजे माझा संतोष आहे, मला आणखी कांहीं नको, माझें आणखी कांहीं मागणें नाहीं, असें च म्हणण्याचा ना श्रीसमर्थांचा आशय आहे ? जगाचें आणि राष्ट्राचें कल्याण जग आणि राष्ट्र पाहून घेतील. पण हा शुद्ध मार्ग आचरणें म्हणजे श्रीसमर्थांची कृपा संपादन करण्याच्या मार्गाला लागणें होय. असा च त्यांच्या या वचनाचा अर्थ होत आहे. तेव्हां श्रीसमर्थांची कृपा व्हावी म्हणून आपल्या जीवाला जर खरोखर च तळमळ लागली असेल तर, जें केल्यानें आपणांस सर्व कांहीं पावलें, असें ते म्हणत आहेत, तें करणें आपलें–माझें, तुमचें आणि सर्वांचें–आद्य आणि पवित्र कर्तव्य होय !

# ( ८ ) दुसरें तें राजकारण

( १ ) राजकारणाची आवश्यकता व तें कोणी केव्हां करावें, ( २ ) राजकारण हें प्रपंचाचें श्रेष्ठ स्वरूप होय, ( ३ ) राजकारण शब्दाच्या अर्थाविषयीं अकारण वाद, ( ४ ) राजकारणांत उपयोगीं पडणाऱ्या हजारों सूचना, ( ५ ) सर्व सूचनांच्या मूर्ध्नि शोभणारी मुख्य सूचना, ( ६ ) या बाबतींत सांप्रदायिकांचें कर्तव्य, उपसंहार

**ऐसा पाहिजे कीं राजा ।**
**कैपक्षी परमार्थी ॥ १९-९-२५**

म्हणून राजकारण करावयाचें. प्रजेचा कैवार घेणारी आणि धर्माचें रक्षण करणारी राजसत्ता असली म्हणजे सांप्रदायिकांना राजकारण उरत नाहीं, पण तोंवर त्यांना राजकारण करणें भाग आहे. राजसत्ता ज्याच्या हातीं असते तो राजा, मग ती एक व्यक्ति असो, किंवा अनेक व्यक्तींची समिति असो. तो राजा कैपक्षी परमार्थी असावा. तो सनातन धर्माचा उच्छेद करणारा, देवळें पाडणारा आणि मूर्ति फोडणारा नसावा, इतकेंच नव्हे, तर तो धर्माविषयीं उदासीन हि नसावा. तो धर्माचा कैपक्षी म्हणजे कैवारी असल्यावांचून धर्माचें रक्षण होणें नाहीं. तें व्हावें म्हणून श्रीसमर्थांना राजकारण करावें लागलें व त्यांच्या संप्रदायाच्या लक्षणांत राजकारणाला दुसरें स्थान मिळालें. राजा परमार्थाचा कैवारी असावा, यावरून च हें उघड होत आहे कीं, धर्मरक्षणार्थ राजकारणाची आवश्यकता भासते. मुख्य बाब, धर्मरक्षण ही. परधर्मी राजसत्तेखालीं स्वधर्मरक्षण होऊं शकत नाहीं, म्हणून राजसत्ता परधर्मीयांच्या हातीं असली व ती धर्मांत हात घालणारी असली, किंवा उदासीन असली, तर धर्मरक्षण व्हावें म्हणून सांप्रदायिकांनीं राजकारण करणें इष्ट होय. त्यांतून त्या काळीं तर, राजसत्ता ज्या परधर्मीयांच्या हातीं गेली होती, ते आर्यधर्माचा उच्छेद करणें, हें राजसत्तेचें एक कर्तव्य च मानीत !

**देवमात्र उच्छेदिला । आपुला स्वधर्म उडविला ।**
**नित्यापरीस मृत्यु भला । ऐसें समजावें ॥** क्षेत्रधर्म—बाडांक ६३

असा काळ आला होता. अशा काळीं एक तर मरण पतकरावें किंवा परधर्मीयांच्या हातीं गेलेली राजसत्ता स्वधर्मीयांच्या हातीं येण्यासाठीं राजकारण करावें, असा प्रश्न श्रीसमर्थांना पडला होता. त्यांनीं मृत्यु न पतकरतां जिवंत राहून राजकारण करण्याचें ठरविलें. परमार्थाचा कैवारी, असा राजा त्यांना पाहिजे होता, तो मिळाल्यावर त्यांचें राजकारण संपून निर्वेधपणें स्नानसंध्या करण्याला ते मोकळे झाले. त्या क्षणीं त्यांना जी कृतार्थता वाटली, ती त्यांनीं आनंदवनभुवन या मार्मिक आणि प्रोत्साहक प्रकरणांत व्यक्त केली आहे. तात्पर्य, धर्मरक्षणार्थ प्रसंगानुसार सांप्रदायिकांनीं राजकारण अवश्य करावें, पण त्यांचें मुख्य कर्तव्य आत्मोद्धार साधणें हें होय. खुद्द श्रीसमर्थांनीं आपल्या सर्व शिष्यांना राजकारणांत पडण्याची मोकळीक ठेवलेली नव्हती. कोणी कोणत्या भूमिकेवरून जनसेवा करावी, हें ते शिष्याशिष्यांचा अधिकार पाहून ठरवीत. अधिकाराबाहेर कोणी दुसऱ्याच्या कामांत ढवळाढवळ केली तर ती त्यांना खपत नसे, असे दाखले त्यांच्या चरित्रांत आढळतात. त्यांनीं सर्वांना अधिकारपरत्वें कामें नेमून दिलेलीं असत. धर्मरक्षणासाठीं राजकारण करावयाचें असल्यामुळें, धर्माला गुंडाळून ठेवून राजकारण करणारा, श्रीसांप्रदायिक असूं शकणार नाहीं; पण राजकारणांत न पडतां हि स्वधर्माचा सांभाळ करणारा, सांप्रदायिक असणें संभवतें. भोळाराम राजकारण कोठून करणार ? तें काम महाबळेश्वरच्या दिवाकरांनीं च करावें. "हा महाबळेश्वरकर आहे बुद्धि हि महाबळ आहे राजद्वारीं कित्येक प्रसंगीं पाठवायास योग्य आसे" अशी खुद्द श्रीसमर्थांनीं च दिवाकरांची शिफारस केलेली आहे.

प्रसंगीं सर्वांनीं च राजकारण करावें, पण एरव्हीं

**रायानें करावे राजधर्म । क्षेत्रीं करावे क्षेत्रधर्म ।**
**ब्राह्मणीं करावे स्वधर्म । नाना प्रकारें ॥** राजधर्म–बाडांक १२४०

परमार्थाचा कैवार घेणारी राजसत्ता असल्यावर ब्राह्मणांचें तरी राजकारणांत कांहीं काम उरत नाहीं, असें समजणें योग्य होईल. त्यांतून, राजसत्ता स्वधर्मीयांच्या हातीं असून हि धर्मरक्षणाला ती क्वचित् असमर्थ ठरली, तर तेवढ्यापुरते ब्राह्मण राजकारणांत पडले, तरी चालेल, पण ब्राह्मणांची दृष्टि त्यांच्या मुख्य कर्तव्यावरून केव्हां हि ढळली, तर त्यांत सर्वांचा घात आहे, म्हणून समजावें.

(२) सांप्रदायिकांनीं परिस्थित्यनुरूप राजकारण करावयाचें असतें. प्रसंगानुसार राजकारण करणें आवश्यक असतां, तिकडे दुर्लक्ष करून केवळ बायकापोरांचा च प्रपंच करणें दोषास्पद होईल. राजकारण हें प्रपंचाचें च श्रेष्ठ स्वरूप होय. प्रपंच करणाऱ्या सांप्रदायिकांनीं आवश्यकता असतां हि राजकारणाची उपेक्षा करणें योग्य नव्हे, असा बोध

**प्रपंचीं जाणे राजकारण। परमार्थीं साकल्य विवरण।**
**सर्वांमध्यें उत्तम गुण। त्याचा भोक्ता॥ १९-४-१७**

या ओवीवरून होत आहे. या ओवींतून सरळ अर्थ असा निघतो कीं, साकल्य विवरणावांचून परमार्थ आणि राजकारणावांचून प्रपंच, हीं दोन्ही फिकीं होत, राजकारण हें प्रपंचाचें उत्तमांग होय, जे भाग्यवान् पुरुष असतात, ते प्रपंचांत राजकारण साधतात आणि परमार्थांत महावाक्याचें पूर्ण विवरण करितात. श्रीसमर्थ प्रपंचांत राजकारणाचें इतकें महत्त्व मानीत.

(३) असें असतां, मध्यंतरीं कित्येकांनीं राजकारण शब्दाच्या अर्थाविषयीं एक अकारण वाद उत्पन्न केला होता. त्यांचें म्हणणें, श्रीसमर्थांनीं कोणतें च राजकारण केलें नाहीं, इतकें च नव्हे, तर त्यांच्या वाङ्मयांत राजकारण हा शब्द जरी अनेक ठिकाणीं आला असला, तरी त्या सर्व ठिकाणीं त्याचा अर्थ, आपण राजकारण म्हणून जें कांहीं समजतों, तो नसून त्याचा अर्थ केवळ चातुर्य असा आहे. श्रीसमर्थांनीं जें राजकारण केलें तो पहिल्या खंडाचा विषय होय. येथें आपणांस, संप्रदायाचें एक प्रमुख अंग जें राजकारण त्याचा अर्थ राजकारण च दुसरा कांहीं नाहीं, एवढें च पहावयाचें आहे. या वादाचें मूळ गढूळ असल्यामुळें तो तत्काळ निष्फळ ठरला. समर्थांच्या पूर्वीं, समर्थांच्या काळीं, समर्थांच्या नंतर सारें जग राजकारण म्हणजे राजकारण च समजत आलें, फक्त समर्थांनीं मात्र तो शब्द चातुर्य या अर्थीं योजिला, हें कोण खरें मानील ? ११ × ५ व १९ × ९ हे नुसते दोन समास वाचून पहा आणि मग राजकारण म्हणजे राजकारण नव्हे, असें कोण म्हणूं शकेल, तें सांगा. फार काय, पण संप्रदायाच्या लक्षणाची ती मुख्य ओवी ग्रन्थराजांत तीन ठिकाणीं आली आहे, तेवढी च नुसती पाहून सुद्धां, राजकारण म्हणजे राजकारण नव्हे, तर चातुर्य, असें क्षणभर तरी मानतां येईल काय, याचा विचार करा.

(१) मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ ११-५-४

(२) हरिकथानिरूपण । नेमस्तपणें राजकारण ।
वर्तायाचें लक्षण । तें हि असावें ॥ ११-६-४

(३) हरिकथानिरूपण । बरेपणें राजकारण ।
प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२-२-२१

या तीन ओव्या वाचून काय म्हणतां येईल ? नरजन्माला येऊन आयुष्यांत करावयाच्या गोष्टींचें ठोकळ वर्गीकरण करतांना हरिकथानिरूपण आणि राजकारण असें वर्गीकरण कराल, कां हरिकथानिरूपण आणि चातुर्य, असें ? परलोक आणि इहलोक असें वर्गीकरण करण्याऐवजीं परलोक आणि चातुर्य, असें म्हणणें बरोबर होईल काय ? परमार्थ आणि प्रपंच असे कर्तव्याचे दोन भाग न मानतां, परमार्थ आणि चातुर्य म्हणणें शोभेल काय ? धर्मकारण आणि राजकारण न म्हणतां धर्मकारण आणि चातुर्य म्हणाल काय ? नेमस्तपणें किंवा बरेपणें करावयाचें असतें तें राजकारण का चातुर्य ?

(१) राजकारण बहुत करावें । परंतु कळों च नेदावें ॥ ११-५-६
(२) मऱ्हाष्ट्र देश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला ।
अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ १५-२-४
(३) कष्ट घालून राजकारणा । लोक लावी ॥ १५-२-२५
(४) समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना ।
नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ १८-६-६
(५) मोठीं राजकारणें चुकती । राजकारणीं वेढा लागती ।
नाना चुकीची फजीती । चहुंकडे ॥ १९-८-११
(६) हे धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ।
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ १९-९-२७
(७) उदंड राजकारण तटलें । तेणें चित्त विभागिलें ॥ पत्र

आणखी किती वचनें द्यावींत ? हीं थोडीं वचनें विचारांत घ्या, मुळांत त्यांचे संदर्भ पहा आणि ठरवा, राजकारण म्हणजे चातुर्य असें मानतां येईल काय ? वरील वचनांत राजकारण शब्दाऐवजीं चातुर्य शब्द योजून पहा त्या वचनांचा कांहीं अर्थ होतो का ?

मुळांत च हा वाद निरर्थक होता व तो निरर्थक च ठरला. वाद निघाला तेव्हां च त्याला श्री रामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील भाग सव्विसावा–श्रीसमर्थांचें राजकारण–या निबंधांत उत्तर देण्यांत आलें. जास्त विस्तार करणें आवश्यक वाटत नाहीं. तथापि मी त्या निबंधांत जें विवेचन केलें आहे किंवा आज येथें करीत आहें, त्याला स्वानुभवदिनकर व निवृत्तिराम या दोन ग्रन्थांत प्रत्यंतर आढळतें, तेवढें आपल्या नजरेस आणूं इच्छितों. या दोन्ही ग्रन्थांचा आपणांस जास्त परिचय पुढच्याच प्रत्यंतराच्या प्रकरणांत करून देण्यांत येईल. स्वानुभवदिनकरकार हे प्रत्यक्ष श्रीसमर्थांचे शिष्य, ते राजकारण म्हणजे काय समजत, हें त्यांच्या ग्रन्थांतील एका ओवीवरून स्पष्ट होत आहे. ती ओवी अशी —

> **जैसा राजा जालियां विषयांध**
> **सर्व राजकारण होय स्तब्ध ।**
> **तैसें ब्रह्यासी गाढमूढत्व होतां शुद्ध ।**
> **सृष्टिकार्य राहे सहजें ॥** स्वा. दि. १३–५–६४

राजा विषयांध झाला म्हणजे राजकारण आटोपलें च म्हणावयाचें. येथें राजकारणाचा काय अर्थ होतो ? राजा आणि राजकारण यांचें साहचर्य काय दर्शवितें ? राजानें करावयाचें तें राजकारण नव्हे, तर काय चातुर्य ?

यापेक्षां हि निवृत्तिरामग्रन्थकारांची साक्ष विशेष महत्त्वाची आहे. ते मुळीं अकराव्याच्या पांचव्या आणि सहाव्या समासांत आणि एकोणिसाव्याच्या नवव्या समासांत श्रीसमर्थांनीं जें राजकारण सांगितलें आहे, त्याचा च अर्थ आपल्या ग्रन्थांत सांगत आहेत. वेणाबाईची शिष्यीण बाईयाबाई व बाईयाबाईचे शिष्य गिरिधर, अशी जरी परंपरा असली तरी या तिन्ही व्यक्ति श्रीसमर्थांच्या हयातींत आणि त्यांच्या सान्निध्यांत होत्या. या तिघांपैकीं एकानें —बहुधा गिरिधरांनीं—हा निवृत्तिराम नांवाचा फार अप्रतिम ग्रन्थ लिहिलेला आहे. श्री रामदासी मालेंतील चवदावा भाग म्हणून तो प्रसिद्ध झाला होता. त्याचे बावीस समास असून ओवीसंख्या २०२६ आहे. पैकीं १९ वा समास २०२ ओव्यांचा असून त्यांत ग्रन्थराजांतील २०० समासांतील विषयांचें क्रमशः दिग्दर्शन केलें आहे. त्यांतील ओवी १२३ वी ११ × ५ व ११ × ६ ला अनुलक्षून आहे, ती अशी—

**मूळमाया सर्वांसी कारण। प्रपंच परमार्थ राजकारण।**
**राजयोग साकल्य विवरण। लिहिणें वाचणें महंती॥ १२३**

व १८८ वी ओवी १९×९ ला अनुलक्षून आहे—

**संत साधु ज्ञानी उदास। जगदोद्धाराचा हव्यास।**
**येकांतीं राजकारणें सावकाश। राजयोगें विवरिती॥ १८८**

राजकारण म्हणजे राजकारण च, चातुर्य नव्हे किंवा आणखी कांहीं नव्हे, याविषयीं शंका घेण्याला यत्किंचित् तरी जागा आहे काय ?

(४) असें हें राजकारण, श्रीसमर्थांनीं आपल्या संप्रदायाचें एक प्रमुख अंग ठरविलें आहे. राजकारण या शब्दांत कांहीं विशेष जादू आहे, असें नव्हे. तो शब्द त्यांच्या वाङ्मयांत मुळीं च न येता, तरी त्यांच्या वाङ्मयांत प्रपंच आणि परमार्थ, राजकारण आणि धर्मकारण यांची सांगड घातलेली आहे, असें च जगानें मानलें असतें. त्यांत धर्मकारणाची जशी शिकवण आहे, तशी राजकारणाची हि पण आहे. राजकारणी पुरुषांना राजकारणांत मार्गदर्शक होतील, अशा शेंकडों सूचना श्रीसमर्थांनीं केलेल्या त्यांच्या वाङ्मयांत वाचकांस आढळतील. बहुतांना राजी राखावें, समुदाय करावा, बहुतांचें बहुत सोसावें, उपाधीस कंटाळूं नये, कशा हि प्रसंगीं धीर सोडूं नये, अखंड सावधानता ठेवावी, केव्हां हि दुश्चित्त नसावें, प्रयत्नाची पराकाष्ठा करावी, जीवाची हि पर्वा करूं नये, नीतिन्याय सोडूं नये, अकारण भरीं भरूं नये, फड नासूं देऊं नये, चालणेचा आळस करूं नये, अखंड तजवीजा करीत असावें, जशास तसें धोरण ठेवावें, संघटनेंत ढिलेपणा येऊं देऊं नये, धर्मस्थापनेचा सतत हव्यास असावा, इत्यादि असंख्य सूचनांत, राजकारण म्हणजे चातुर्य म्हणणारांना कांहीं राजकारण दिसतें किंवा नाहीं ? चरित्राच्या पहिल्या दोन खंडांत अशा किती तरी राजकारणपर सूचना वाचकांस वाचावयास मिळतील. मी या ठिकाणीं या क्षणीं, ज्या कांहीं थोड्या सूचना माझ्या सहज मनांत आल्या त्या दाखल केल्या आहेत. राजकारणांत सर्व कालीं उपयोगीं पडणाऱ्या अशा शेंकडों, नव्हे हजारों सूचना जो महापुरुष देऊन गेला, तो राजकारणी नव्हता, असें क्षणभर तरी कोणास म्हणतां येईल काय ?

(९) या सर्व सूचनांच्या शिरोभागीं शोभणारी अशी जी एक सूचना, जगानें आदरानें ऐकावी आणि निष्ठेनें पाळावी, अशा योग्यतेची मला वाटते, तिच्याकडे मी सर्वांचें लक्ष वेधूं इच्छितों. तिच्या वरून श्रीसमर्थहृदयाची प्रगल्भता वाचकांच्या प्रत्ययास येणार आहे व जागतिक कल्याणाविषयीं श्रीसमर्थांचें मार्गदर्शन कसें अचूक आहे, हें सर्वांस कळून चुकणार आहे. माझ्या क्षुद्रतेविषयीं मला पूर्ण जाणीव असून हि, श्रीसमर्थांविषयीं वाटणाऱ्या अभिमानामुळें मी म्हणूं शकतों कीं, जगांतील सर्व बलवान् राष्ट्रें श्रीसमर्थांची हीं सूचना मनोभावें पाळण्याचा संकल्प करतील तर प्रस्तुत चालू असलेलें जगड्व्याळ युद्ध हें शेवटचें च जागतिक युद्ध निःसंशय ठरेल. राजकारण गुप्त करा वा उघड करा तो काळ गुप्तपणें च राजकारण करण्याचा होता आणि आतांचा हि म्हणजे विशेष बदलला आहे, असें म्हणतां येत नाहीं—पण जें कांहीं राजकारण करावयाचें, त्यांत

**परपीडेवरी नसावें। अंतःकरण ॥ ११-५-१९**

एवढी एक श्रीसमर्थांची आज्ञा पाळा, म्हणजे जग सुखी होईल. साम्राज्याची धुंदी चढलेल्या राष्ट्रांचें लक्ष या शिकवणीकडे जाण्याचा संभव नाहीं !! पण, कोणत्या हि अन्य राष्ट्रास पीडा द्यावयाची नाहीं, असा सर्व राष्ट्रांनीं संकल्प केला म्हणजे साम्राज्यवाद लयास जाईल, आक्रमण करण्याची बुद्धि नष्ट होईल, प्रत्येक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राच्या वाटेस न जातां व त्यास पिळून काढण्याची इच्छा न करतां आपआपलें हित पाहील आणि अखिल जगांत सुख, शांति, समाधान हीं नांदूं लागून पृथ्वीवर च स्वर्ग अवतरेल !

**आवघे चि सुखी असावे ॥ १९-४-१३**

हें ज्या संप्रदायाचें ब्रीद त्या संप्रदायानें

**सृष्टि सुखें चि भरावी ॥**

आणि

**परपीडेवरी नसावें। अंतःकरण ॥**

अशी शिकवण जगाला द्यावी, हें स्वाभाविक होय. पण जग या शिकवणीचा विचार करील काय ? कोणत्या हि राष्ट्राच्या कपाळीं गुलामगिरी, रोगराई, उपासमारी, हीं लादण्याची किंवा स्वातंत्र्य, आरोग्य, समृद्धि, हीं उपभोगूं

देण्याची ज्यांच्या ठिकाणीं शक्ति आहे, अशांचें लक्ष या तत्त्वज्ञानाकडे जाईल काय ?

(६) जगाचें भवितव्य काय असेल तें खरें. इहपरलोकीं व्यक्तीचें आणि समष्टीचें कल्याण साधून देणारें, इतक्या उच्च कोटीला पोचलेलें तत्त्वज्ञान शिकविणारा दुसरा एकादा संप्रदाय असेल, नसेल असें मी म्हणत नाहीं, पण मला ठाऊक झाला नाहीं. कोणत्या हि देशांतील राजसत्तेचें जसें स्वरूप असेल, तसें स्वरूप त्या देशांतील राजकारण धारण करील, पण देश आणि काळ यांची बाधा न होणारे, वरील स्वरूपाचे सिद्धांत, हे सर्वत्र सारखे च मान्य होण्यासारखे होत. जगाला त्यांची माहिती करून देणें, हें सांप्रदायिकांचें कर्तव्य होय. जगाला मार्ग दाखविण्याची महत्त्वाकांक्षा सांप्रदायिकांनीं मनांत बाळगल्यास ती त्यांच्या पूर्व परंपरेला आणि श्रीसमर्थांच्या आज्ञेला धरून च होईल. श्रीसमर्थ संप्रदाय म्हणजे च महाराष्ट्रधर्म व सर्वांनीं मिळून त्या धर्माचें रक्षण करावें, अशी श्रीसमर्थांची आज्ञा आहे. सांप्रदायिकांनीं तिचें पालन निष्ठेनें केल्यास त्यांत त्यांचें, समाजाचें, राष्ट्राचें, किंबहुना जगाचें कल्याण आहे.

## उपसंहार

असें हें, माझ्या मतें, श्रीसमर्थसंप्रदायाचें स्वरूप आहे. सर्वांचें इहलौकिक आणि पारलौकिक कल्याण करणारा हा संप्रदाय आहे. त्याच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें ऐहिक कर्तव्यांत नेटका प्रपंच येतो व नेटक्या प्रपंचांत राजकारणाचा समावेश होतो, आणि तें राजकारण न्याय, नीति, आत्मौपम्य-बुद्धि इत्यादि उच्च तत्त्वांवर उभारलेलें असावें लागतें. पारलौकिक कर्तव्य पंचविध आहे. अशा या द्विविध स्वरूपाच्या सांप्रदायाच्या लक्षणांचा विचार केला म्हणजे अवघ्या जगानें त्याचा स्वीकार करावा आणि पृथ्वीवर च स्वर्ग आणावा, असें म्हणावेंसें वाटतें.

आपण आपल्या मतीप्रमाणें येथवर संप्रदायाचें जें विवेचन केलें तें श्रीसमर्थांच्या शिष्यप्रशिष्यांना कितपत संमत आहे, हें पुढील प्रकरणांत पाहून ग्रन्थाच्या तिसऱ्या भागांत प्रवेश करूं. त्या भागांत संप्रदायाच्या भूत, वर्तमान व भविष्य काळांतील स्थितीचा विचार करून ग्रन्थाचा शेवट करूं.

---

# ( ९ ) शिष्यप्रशिष्यांची संमति

( १ ) प्रत्यंतरासाठीं योजिलेले तीन ग्रंथ—( २ ) त्यांचें स्फूर्तिस्थान जें श्रीसमर्थवाङ्मय, तो च आपला हि आधार असल्यामुळें त्या ग्रन्थांत आपणांस प्रत्यंतर मिळालें पाहिजे—( ३ ) स्वानुभवदिनकर म्हणजे दासबोधाची प्रतिमा होय—( ४ ) दिनकरांचें चरित्र आणि त्यांच्यावर गुरुकृपा—( ५ ) स्वानुभवदिनकरग्रंथाचें स्वरूप—( ६ ) अनंतमौनी व मेरुस्वामी या गुरुशिष्यांचें चरित्र—( ७ ) मेरुस्वामींच्या रामसोहळा ग्रन्थाचें स्वरूप—( ८ ) गिरिधरांचा परिचय आणि श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाचें महत्त्व—( ९ ) निवृत्तिराम ग्रन्थाचें स्वरूप—(१०) उतारे अपरिहार्य होत—(११) गुरुपरंपरेचें लक्षण—(१२) विरक्ति—(१३) ब्राह्मण्यरक्षण—(१४) उपासनेची उपासना—(१५) शुद्ध उपासनेच्या पूर्वीची विज्ञानस्थिति—(१६) शुद्ध उपासना—(१७) त्रयोदशाक्षरी मंत्राचा महिमा—(१८) उघडा मंत्र श्रीराम—(१९) धर्मकारणाचें शेवटचें लक्षण विमळ ज्ञान—(२०) कल्याणादिकांचीं संमतिवचनें—(२१) संप्रदायाच्या दुसऱ्या अंगाला प्रत्यंतर नको.

**दिनकर मेरु गिरिधर । इत्यादिक थोर थोर ।**
**सांप्रदायिक ग्रन्थकार । संमतीस बोलिलें येथ ॥**

( १ ) मुख्य ग्रन्थ श्रीमत् दासबोध आणि श्रीसमर्थांचे इतर सर्व ग्रन्थ अवलोकन करून आपण आतांपर्यंत जें विवेचन केलें—पूर्व तयारीच्या ज्या चार गोष्टी ठरविल्या व लक्षणांसहित संप्रदायाचें जें द्विविध स्वरूप पाहिलें—तें जर बरोबर असेल, तर त्याला श्रीसमर्थांच्या शिष्यप्रशिष्यांच्या ग्रन्थांत प्रत्यंतर मिळालें च पाहिजे. जे त्यांचे प्रत्यक्ष शिष्य होते त्यांच्या पुढें श्रीसमर्थांचें वाङ्मय असून शिवाय त्यांना श्रीसमर्थांपासून च दीक्षा मिळाली असल्यामुळें त्यांच्या ग्रन्थांत तिचें प्रतिबिंब उमटणें साहजिक च आहे. प्रशिष्यांपैकीं ज्यांच्या कडे मी प्रत्यंतरासाठीं आशेनें पाहणार आहें, त्यांच्या पर्यंत तरी श्रीसमर्थांची परंपरा खंडित झाली नव्हती. परंपरेचें ज्ञान त्यांच्या पर्यंत, खंड न पडतां, येऊन पोचलें होतें. त्यामुळें त्यांच्या ग्रन्थांत

तें ज्ञान जसेंच्या तसें उतरलेलें असणार, अशी अपेक्षा करणें चूक होणार नाहीं. शिवाय मीं जे दोन प्रशिष्य मनांत आणले आहेत, ते जरी परंपरेनें श्रीसमर्थांपासून तिसरे आणि चवथे असले, तरी त्या दोघांना हि कांहीं काळ श्रीसमर्थांचा सहवास घडला होता.

अशा शिष्यप्रशिष्यांच्या ग्रन्थांनीं आपल्या विवेचनाचा पाठपुरावा केला, तर संप्रदायाच्या पूर्व तयारीची आणि लक्षणांची आपली मीमांसा बरोबर आहे, याविषयीं आपलें मन निःशंक होईल. हें खरें आहे कीं, आज आपण जसें वर्गीकरण करून कार्यकारणसंबंध जोडीत असतों, तसें त्यांनीं केलेलें नसणार, त्यामुळें त्यांच्या ग्रंथांत, आपणांस पाहिजे असलेलीं संमतिवचनें एकत्रित केलेलीं अशीं कदाचित् आढळणार नाहींत, तीं हुडकून काढावीं लागतील. कंटाळा करून चालणार नाहीं.

हा प्रत्यंतराचा विषय मोठा आहे व पुढें मागें आपण च त्याचा विस्तार करूं किंवा आणखी अन्य कोणी तरी करील. आज मीं श्रीसमर्थशिष्यांपैकीं तिसगांवमठपति दिनकर यांचा **स्वानुभवदिनकर** ग्रंथ व प्रशिष्यांपैकीं मन्नारगुडीचे मेरुस्वामी यांचा **रामसोहळा** ग्रंथ व बीडमठाचे अधिपति गिरिधर यांचा **निवृत्तिराम** ग्रंथ, अशा तीन ग्रंथांत प्रत्यंतराचा शोध घेण्याचें योजिलें आहे. शेवटीं, साधल्यास कल्याण, बालकराम, रोकडाराम, हरिहर इत्यादि शिष्यप्रशिष्यांच्या स्फुट कवितेकडे हि कदाचित् वळूं.

( २ ) या सर्व शिष्यप्रशिष्यांचें स्फूर्तिस्थान म्हणजे श्रीसमर्थांचें वाङ्मय आणि त्यांत हि मुख्य ग्रन्थराज श्रीमत् दासबोध होय. दृष्टांतानें बोलावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, या सर्व शिष्यप्रशिष्यांचे ग्रन्थरूपी नद आणि नद्या श्रीमत् दासबोधाच्या हिमालयापासून च उगम पावल्या आहेत.

गिरिधर निवृत्तिराम ग्रन्थाचा शेवट करतांना म्हणतात—

**समर्थग्रंथ श्रीदासबोध । तेथूनि सर्व हि बोध प्रबोध ।**
**विमळ ज्ञान बाळबोध । सत्शिष्यांसी बाणेल ॥ २१-८४**

**एवं श्रीदासबोध समर्थग्रंथ । तेथूनि सर्व हि परमार्थ ।**
**जाणती योगी संत महंत । ग्रंथराज मुगुटमणि ॥ ८५**

समर्थप्रतापांत तर गिरिधर म्हणतात, ग्रन्थकार म्हणून आम्ही जर प्रौढी

मिरवावी, तर वानरांनीं च आपल्या प्रतापानें सेतु बांधला असें कां न म्हणावें ? पण तें जसें खोटें आणि तो जसा सारा श्रीरामनामाचा प्रताप, तद्वत् च आमच्या ग्रंथकर्तृत्वाचें सर्व श्रेय ग्रन्थराज दासबोधाकडे आहे, आम्हांकडे नाहीं. श्रीमत् दासबोधाच्या जिवावर आम्ही ग्रन्थकार !

**सर्व हि ग्रंथ समर्थांचे ।**
**स्तवनगर्भ श्रीदासबोधाचे ।**
**सेतुबंधक मर्कट नव्हती साचे ।**
**तथापि होती समर्थप्रतापें ॥** प्र. ११–५४

मेरुस्वामी हि आपल्या रामसोहळा ग्रन्थांत श्रीसमर्थस्तवनपूर्वक धर्मकारणाच्या पंचविध लक्षणांचा उल्लेख करून श्रीमत् दासबोधाचें महत्त्व स्वानुभवानें वर्णन करून सांगत आहेत:

**शाश्वत एकछत्री राजा । परम समर्थ स्वामी माझा ।**
**विश्वउद्धार भक्तकाजा । लीला अवतरला ॥** रा. सो. १–१०–९१
**आत्मस्थिती स्वधर्माचरणें । सन्मार्ग अद्वैत संचरणें ।**
**ज्ञानविरक्तिभक्तीनें । प्रजा पाळिल्या ॥ ९२**
**कृपासिंधु उचंबळला । परमार्थरूप ग्रंथ केला ।**
**जो कल्पकोटी जाला । उपेगासी ॥ ९३**
**श्रवण करितां दासबोध । तात्काळ उपतिष्ठे प्रबोध ।**
**तुटे संसारसंबंध । मननमात्रें ॥ ९४**
**अपार श्रवणीं फळश्रुति । तात्काळ प्रगटे विरक्ति ।**
**दासबोध अर्थप्रतीती । भवरोग जाय ॥ ९५**
**दासबोधीं समर्थनिवास । ग्रंथीं वरदान निजध्यास ।**
**निजध्यासें चि प्रत्ययास । येत ग्रंथस्वरूपें ॥ ९६**

तात्पर्य, या ग्रन्थकारांचा मुख्य भर ज्या श्रीसमर्थवाङ्मयावर, त्या च वाङ्मयाच्या आधारावर आपण हि आपली संप्रदायाची इमारत उभारीत असल्यामुळें तिला त्यांच्या ग्रन्थांत अनुरूप संमतिवचनें आढळलीं च पाहिजेत.

(३) दिनकर, मेरुस्वामी आणि गिरिधर असे हे तिघे हि, माझ्या समजुतीप्रमाणें, या संप्रदायांत महान् थोर अधिकारी पुरुष होऊन गेले.

तिघांचीं हि चरित्रें अलौकिक आहेत व विद्वत्ता गाढ आहे. याची साक्ष त्यांचे ग्रन्थ च देतील. श्रीमत् दासबोध ग्रंथ झांकावा आणि स्वानुभवदिनकर ग्रंथ पुढें करावा, श्रोत्यांच्या लक्षांत पट्कन् येणार नाहीं. आतां दासबोधांतील समास वाचतों, असें म्हणून स्वानुभवदिनकरांतील एकादा किरण खुशाल वाचून दाखवावा, तत्काळ कोणाला उमगणार नाहीं. म्हणतात ना, **आत्मा वै पुत्र नामाऽसि**, त्याप्रमाणें **आत्मा वै शिष्य नामासि** म्हणतां येईल, याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून श्रीसमर्थ आणि श्रीदिनकर या गुरुशिष्यांचें सांगतां येईल. स्वानुभवदिनकर म्हणजे दासबोधाची केवळ प्रतिमा होय. श्रीसमर्थांचें तत्त्वज्ञान दिनकरांनीं किती आत्मसात् केलें होतें, याची साक्ष स्वानुभवदिनकर ग्रंथ वाचून पटते. या ग्रन्थाची मला फार अपूर्वता वाटते. जयरामांच्या जयबोधांत हजारों ओव्या दासबोधांतील च घेतलेल्या आहेत, तसें स्वानुभवदिनकराचें नाहीं. दासबोधांतील च तत्त्वज्ञान दिनकर स्वतंत्रपणें आपल्या शब्दांत, पण तितक्या च प्रासादिक वाणीनें सांगत आहेत.

(४) नगरजवळ भिंगार म्हणून शहर आहे. तेथील जोशीपणाची वृत्ति करून दिनकरांचे पूर्वज असत. श्रीसमर्थ लग्नांतून पळाले, तसे हे हि पळाले, पण लग्न झाल्यावर. भिंगारच्या ईशान्येस सुमारें चवदा कोसांवर डोंगरांत वृद्धेश्वराचें एक पुरातन रम्य स्थान आहे, तेथें राहून सबंध शक १५७५ त वर्षभर दिनकरांनीं यथाविधि पुरश्चरण केलें. वर्ष झालें, फाल्गुन शुद्ध १५ ला रात्रीं नामस्मरण करीत करीत दिनकरांना निद्रा लागली. धड झोंप नव्हती, जागृति नव्हती व स्वप्न हि नव्हतें; तों एक मूर्ति त्यांचे पुढें आली. दिनकर तटस्थ झाले, त्यांनीं हात जोडले व त्या मूर्तीनें त्यांच्या मस्तकीं डावा हात ठेवला. मूर्तीचे पाय धरावे म्हणून दिनकर मनांत आणतात, तों ती मूर्ति अदृश्य झाली ! पूर्ण जागे होऊन पाहतात तों मूर्ति वगैरे कांहीं नसून कोनाड्यांत फक्त एक दिवा जळत होता. दिनकरांची वृत्ति कावरीबावरी झाली. हें स्वतः दिनकरांनीं लिहून ठेवलेलें आहे.

**ठेउनि मस्तक श्रीपदिं भावें। स्वामिनें बाळ सनाथ करावें।**
**ऐकुनि हास्य करी प्रभुराजा। दिनकराशिरीं हा कर माझा॥ १**
**बोधुनि बोध प्रबोधनमार्गें। ठेवित वाम करा शिरिं वेगें।**
**विप्रकुळक्रमकर्म करावें। रामउपासन चित्तिं धरावें॥ २**

**तत्त्वमसीसें प्रतिष्ठुनि दिल्हें । निर्शुनि देह निःसंदेह केलें ।**
**कर्म उपासन ज्ञान निजाचें । साधन नित्य अखंड परेचें ॥ ३**

**जागृति येउनि जों पुढें पाहे । दीप असे परि मूर्ति न लाहे ।**
**विस्मय तो येक राघव जाणे । मूढमति हिण कांहिं न जाणे ॥ ४**

ती मूर्ति पुन्हां आपल्या दृष्टीस केव्हां पडेल, असें त्यांना झालें. त्यांनीं अन्न-पाणी सोडलें. बाह्योपाधींचें त्यांचें भान हारपलें. जणूं काय त्यांची एकादी वस्तु हारवली आहे, अशा रीतीनें त्या डोंगरांत ते ती वस्तु शोधूं लागले. ते बाहेरून दुश्चित्त दिसत, पण अंतरीं सुचित्त होते. ते काय शोधीत होते ?

**गुरुराज माझ्या सोयरे जिवाचे । देखेन तयांचे पाय केव्हां ॥ १**
**पाय केव्हां दृष्टी पडतील साचे । उतरीन देहाचें निंबलोण ॥ २**
**निंबलोण सर्व भावेंसीं करीन । नुरोनि उरेन सेवेलागी ॥ ३**
**सेवेलागी देह देहेंविण राहे । दिनकरा पाहे नवलाव ॥ ४**

त्यांचा जीव अगदीं उतावीळ झाला. सारें जगत् त्यांना तुच्छ होतें. डोळे असून त्यांना दुसरें कांहीं दिसत नव्हतें आणि कान असून दुसरें कांहीं ऐकूं येत नव्हतें. त्यांना एक च ध्यास लागला होता, ते पाय पुन्हां केव्हां दृष्टीस पडतील ! दिवस चालले तसा त्यांचा धीर सुटत चालला.

**न धरवें धीर वाटतसे खंती । केव्हां कृपामूर्ति देखेन मी ॥**

इतकी तळमळ लागल्यावर सद्गुरूंनीं कृपा केली नाहीं, असें कधीं घडलें आहे काय ? काय चमत्कार आहे पहा, स्वप्नांत दर्शन दिल्यानंतर पुढें बरोबर एक वर्षानें त्या च मित्तीला म्हणजे १५७६ च्या फाल्गुन शुद्ध १५ ला, बरोबर निस्पृह शिष्यांचा परिवार घेऊन श्रीसमर्थांचें आगमन वृद्धेश्वराकडे झालें ! आदल्या वर्षीं स्वप्नांत पाहिलेली मूर्ति ती च ही मूर्ति होय ! त्या वेळीं हातीं न लागलेले पाय दिनकरांनीं आतां घट्ट धरिले.

**त्राहे त्राहे सद्गुरुराया । निरसी अहं माया ।**
**कृपा करी लवलाह्या । काळ जाला सिद्ध खाया ॥ ध्रु०**

**तव कृपेवीण जाण । वेदशास्त्रव्याख्यान ।**
**हरिकथाकीर्तन । संगीतकळा ॥**
**योग याग तीर्थाटण । स्नान संध्या मुद्रा ध्यान ।**
**सकळ हे फोल जाण । देवाधिदेवा ॥ १**

हरिहरब्रह्मादिक । ते हि प्रभुपदीं रंक ।
चालती सकळ लोक । तुझिया सत्ता ॥
व्यास अंबरीष शुक । साधु संत सकळिक ।
तव कृपा निजसुख । भोगिती सदा ॥ २

भक्ति भाव निरूपण । भूतदया अनुष्ठान ।
देवोदेवीं चिंतन । सप्रेम जऱ्हीं ॥
तऱ्हीं तव कृपेवीण । जो जो कीजे तो तो शीण ।
दिनकर शरण । श्रीरामदासीं ॥ ३

श्रीसमर्थांनीं आपला सव्य कर दिनकरांचे मस्तकीं ठेविला आणि दिनकर कृतार्थ झाले! आपणांस होते का कांहीं कल्पना त्या दिवसाच्या दिनकरांच्या आनंदाची! संवादांत पुढें समर्थांनीं दिनकरांना सांगितलें, गतवर्षीं आम्ही आलों नव्हतों, आम्हांस ठाऊक हि नाहीं, पण तुमची भक्ति पाहून प्रभु रामचंद्रानें आमच्या वेशांत तुम्हांस दर्शन दिलें असेल व सद्गुरुवांचून सव्य हस्त मस्तकीं ठेवण्यास कोणास अधिकार नसल्यामुळें त्यांनीं वाम हस्त तुमच्या मस्तकीं ठेवला असेल!

(५) याप्रमाणें प्रभुदर्शनाला आणि गुरुकृपेला पात्र झालेल्या दिनकरांचा स्वानुभवदिनकर ग्रंथ होय. तो त्यांनीं श्रीसमर्थांच्या पश्चात् अवघ्या तेरा वर्षांनीं च म्हणजे १६१६ च्या चैत्र शुद्ध ९ स पूर्ण केला. स्वानुभव-दिनकराच्या पहिल्या कलापाच्या पांचव्या किरणांत सद्गुरुस्तवनानंतर प्रसन्न होऊन, ग्रंथांत कोणकोणत्या विषयाचें प्रतिपादन करावें म्हणून श्रीसमर्थांनीं आपणास आज्ञा केली, ती दिनकरांनीं सांगितली आहे. धर्मकारणाचीं आपण जीं पांच अंगें ठरविलीं, तीं च नेमकीं श्रीसमर्थांनीं सांगितलेलीं पाहून मला साहजिक आनंद वाटला. पुढें ग्रंथांत कोणते विषय येणार ते ग्रन्थारंभीं च सांगितलेले आपल्या कल्पनेशीं जुळत असल्यामुळें, पुढें ग्रन्थांत जें प्रतिपादन आलेलें असेल तें आपण विचारांत न घेतलें तरी चालेल. पण मी तसें करणार नाहीं. त्या प्रत्यक्ष प्रतिपादनांत जें स्वारस्य असेल तें अनुभवल्यावांचून आपणांस राहवणार नाहीं.

स्तवन ऐकून संतोष पावून श्रीसमर्थ आशीर्वाद देतात:

सखया तुवा प्रीतिभावें करून । केलें स्तवन अर्चन वंदन ।
शेवटीं आत्मनिवेदन । आपणा सगट ॥ स्वा. दि. १-५-८६

नाहंपणें जें जें केलें। तें तें मज सर्वस्वें पावलें।
यया सुखें संतोषलें। पूर्ण मानस ॥ ८७

आतां जे जे तुझे मनोरथ। ते पूर्ण होतु कां समस्त।
स्वानुभवदिनकर प्रस्तुत। वदसी सकळ ॥ ८८

असा आशीर्वाद देऊन ग्रन्थांत कोणते विषय आणावेत, ते सुचवितात—

कर्मउपासनायुक्त ज्ञान। बोलिजे विवेकसह वैराग्यसाधन।
वर्णाश्रमधर्म संरक्षून। वेदशास्त्रविधि ॥ ८९

भक्तीची महिमा पदोपदीं। बोलिजे पूर्वग्रन्थानुवादीं।
सगुणभक्तिउच्छेदीं। न प्रवर्तावें ॥ ९०

मितलां बोलीं बोलिजे। अर्थप्रमय न सोडिजे।
ऐसें बोलिलें श्रीगुरुराजें। कृपावरदस्नेहें ॥ ९१

गुरूची च आज्ञा, तेव्हां विश्वासपूर्वक गुर्वाज्ञापालन हें जें गुरुपरंपरेचें लक्षण, तें तींत आलें च, तें निराळें सांगावयास नको. बाकीचीं चारी लक्षणें—उपासना, ज्ञान, वैराग्य, ब्राह्मण्यरक्षण—हीं ८९ व्या ओवींत आलीं.

श्रोते कसे असावेत, हें सांगतांना सुद्धां या पांच लक्षणांचा विसर पडलेला नाहीं.

जेथ भक्ति उपासना ज्ञान।
वैराग्य विवेकयुक्त गहन।
स्वकर्म धर्म संरक्षून।
चालणें जयां ॥ स्वा. दि. १-६-३६

गुरुभजनीं जे सप्रेम।
गुरुसेवा जयां नित्यनेम।
मुखीं उच्चार जयां निजनाम।
श्रीगुरु ऐसें ॥ ३७

फार काय, पण स्वानुभवदिनकरग्रंथाची नुसती अनुक्रमणिका जरी पाहिली तरी आपल्या कल्पनेचें पूर्ण समर्थन होत आहे. या ग्रन्थाचे सोळा कलाप आहेत. पैकीं दुसरा कलाप संसारलक्षणाचा असून त्यांत जन्मदुःख, संसाराची भ्रांति आणि असारता, त्रिविध ताप हे विषय आहेत, विवेकयुक्त वैराग्य तिसऱ्या

आणि चवथ्या कलापांत आहे, पांचवा कर्मकलाप असून त्यांत सद्गतिप्राप्तीसाठीं सत्कर्माचरणाची आवश्यकता दर्शविली आहे आणि ब्राह्मणांची दुर्दशा सांगून ब्राह्मण्यरक्षणाचें अगत्य सूचित केलें आहे, सहाव्या आणि सातव्या कलापांत उपासना सांगितली आहे, आठवा कलाप भक्तिलक्षणाचा आहे, अकरा ते पंधरा कलापांत ज्ञान आणि विज्ञान हीं सविस्तर प्रतिपादिलीं असून शेवटच्या सोळाव्या कलापांत गुरुपरंपरा अत्यंत प्रेमभरानें वर्णिली आहे.

श्रीमत् दासबोधाशीं ज्यांचा पूर्ण परिचय आहे ते, वरील वर्णन वाचून, सहज म्हणतील कीं, स्वानुभवदिनकर ग्रंथ म्हणजे दुसरा दासबोध च दिसतो. आहे च तो तसा. कलाप नववा आणि दहावा खेरीजकरून सबंध स्वानुभवदिनकरांत आपल्या संप्रदायांतील पूर्व तयारीच्या चार हि बाबी व धर्मकारणाचीं पंचविध लक्षणें, यांचें च विवेचन आहे. स्वानुभवदिनकर म्हणजे ग्रन्थराज दासबोधाची दुसरी प्रतिकृति होय. पण ती केवळ शाब्दिक नव्हे. श्रीसमर्थांच्या उपदेशाचा ठसा दिनकरांच्या हृदयावर उमटला जाऊन तो उपदेश दिनकरांच्या मुखांतून, दिनकरांच्या शब्दांत, स्वानुभवदिनकरांत बाहेर पडला आहे. ग्रन्थ अप्रतिम आहे हें माझें म्हणणें परमार्थतः ग्रहण करा अशी विनंति करतों. मी वर कोठें तरी म्हटलें च आहे कीं, दासबोध लपवावा आणि स्वानुभवदिनकर पुढें करावा, वाचकांस भुरळ पडेल. अशा या प्रतिदासबोध ग्रन्थाकडे दासबोधाप्रमाणें च सर्वांचें लक्ष जावो. स्वानुभवदिनकर वाचल्यानें दासबोध वाचल्याचें फळ तर पदरांत पडेल च, पण वरती आणखी श्रीसमर्थभक्तिप्रेमरसाचे सारखे घुटके घेण्यास सांपडतील.

नववा आणि दहावा हे दोन कलाप हठयोगाचे आहेत. श्रीसमर्थ स्वतः महान् योगी असून त्यांनीं आपल्या दासबोधांत किंवा दुसऱ्या कोणत्या हि लहान मोठ्या ग्रन्थांत हठयोगाची शिकवण दिली नाहीं. देशकालवर्तमान हठयोगाला अनुकूल नव्हे, असें त्यांचें मत होतें. ते सरसकट सर्व शिष्यांना हठयोग शिकवीत नसत. दिनकरांनीं विचारलें असतां हठयोगाचा हट्ट धरूं नकोस असें च त्यांना प्रथम सांगितलें, पण अखेरीस दिनकरांची फार च आतुरता पाहून त्यांस श्रीसमर्थांनीं श्रीज्ञानेश्वरींतील सहाव्या अध्यायाला अनुसरून जो हठयोग सांगितला तो या दोन कलापांत दिनकरांनीं दिला आहे.

(६) प्रशिष्यांपैकीं मेरुस्वामींच्या रामसोहळा ग्रन्थांत आपण प्रत्यंतराचा शोध घेणार आहोंत. हे मेरुस्वामी श्रीसमर्थांच्या शिष्याचे शिष्य होत. श्रीसमर्थांचे अनंतमौनी व अनंतमौनींचे मेरुस्वामी. या उभयता गुरु-शिष्यांचा मठ आणि समाधी तंजावरप्रांतीं मन्नारगुडीस आहेत. या मन्नारगुडीस दक्षिणद्वारका म्हणतात. तेथें च श्रीरामाची स्थापना करून अनंतमौनींनीं मन्नारगुडीस दक्षिण अयोध्येचें स्वरूप आणलें. मन्नारगुडीस मी एकवार जाऊन आलों आहे, पण तेथें एक च रात्र मुक्काम झाला. आणखी एकवार या गुरुशिष्यांच्या दर्शनास जाऊन येण्याची तीव्र इच्छा धारण करून आहें. उभयता गुरुशिष्य अति विद्वान् होते. मेरुस्वामींच्या विद्वत्तेची साक्ष त्यांचे रामसोहळा आणि भीमोपदेश हे दोन प्रमुख ग्रन्थ देत राहतील. अनंतमौनींची कांहीं ग्रन्थरचना असल्याचें दिसत नाहीं, पण त्यांच्या विद्वत्तेविषयीं मेरुस्वामी च म्हणतात—

**अनंत अत्रिगोत्रसमुत्पन्न । अनंत वेदपाठक निपुण ।**
**अनंत वर्चस्वें देदीप्यमान । अपर सूर्य ॥** स्तो. २-३-४२

**वक्ता वेदांतशास्त्रींचा । षड्दर्शनें रूढली वाचा ।**
**व्याकरणसिद्ध प्रत्ययाचा । प्रबोध चाले ॥ ४३**

**सर्वदा सहस्रवदनअभ्यंतर । वदे येका चि वदनें अपार ।**
**अनंत श्रुतींचें सार । प्रांजळ करी ॥ ४५**

**दृष्टांत दार्ष्टांत महासंमती । महाचातुर्य बोधवित्पत्ती ।**
**अमृताचा दिवस संगती । जैं होय अनंतासी ॥ ४७**

**क्षणभरी सहवासीं असतां । संभाषणें निववी चित्ता ।**
**स्वानंदसिंधूमाजी तत्त्वता । मज्जन होय ॥ ४८**

अनंत मौनी अरुणाचळ येथील राहणारे होत. अनंत मौनींचा समाधीकाळ १६१९ भाद्रपद वद्य ९ शनिवार होय.

असे हे तंजावरप्रांतीं श्रीसमर्थांचे एक प्रमुख शिष्य होऊन गेले. त्यांचे मेरुस्वामी हे शिष्य होत. मेरुस्वामींची जन्मभूमि कृष्णातीरीं मेरुलिंग ही होय. तेथून दैवगतीनें फिरत फिरत व तीर्थें करीत ते अरुणाचळास पोचले.

**तये स्थळींचा निवासी । सद्गुरु अनंत निश्चयेसीं ।**
**जोडला जिवलग आम्हांसी । पूर्वसुकृतयोगें ॥** सो. ९-१-४१

तो आत्मा चि होय परम । जिवीचा जीव निजविश्राम ।
परम कृपाळु सुखैकधाम । परत्रीचा सखा ॥ ४२
स्नेहसहवासीं ठेऊनि । आपंगिलें तेणें मजलागुनि ।
आपल्या जीवींच्या गोष्टी सांगोनि । वेध केला हृदयासी ॥ ४३
प्रवृत्तिऐश्वर्यें श्रीमंत । मी असतां हि भवउन्मत्त ।
स्नेहसहवासें कृपायुक्त । दिवसेंदिवस बोधिलें ॥ ४४
सद्गुरु अनंताची पत्नी । परम स्नेहाळ ते माझी जननी ।
परमार्थरूप मजलागूनि । संभविलें तिनें ॥ ४५
मजकारणें स्वामीसी प्रार्थूनि । महावाक्य सांगविलें श्रवणीं ।
परम प्रीतीनें अंतःकरणीं । अर्थ प्रांजळ केला ॥ ४६
मार्ग चुकोनि आडरानीं । जात होतों मरमरोनि ।
पंथ दाऊनि निजनयनीं । आणिलें सुखवस्तीसी ॥ ४७
तिये मातेचा कृतोपकार । मी उत्तीर्ण नव्हे चि पामर ।
जन्ममरणसंस्कार । अपार चुकविले माझे ॥ ४८

याहून या उभयतांचें चरित्र जास्त कांहीं उपलब्ध नसावें, हें दुर्दैव होय; असो.

(७) आपण प्रत्यंतरासाठीं घेतलेला दुसरा ग्रन्थ म्हणजे या मेरुस्वामींचा रामसोहळा ग्रन्थ होय. या ग्रंथाकडे यापूर्वी माझें हि जावें तसें लक्ष गेलें नव्हतें, याबद्दल मी स्वतःला किती तरी बोल लावून घेतला. या ग्रन्थाकडे इतके दिवस माझें दुर्लक्ष झालें, हें माझ्या हातून पाप घडलें, असें च मला वाटलें व मी अनन्य भावानें शरण जाऊन मेरुस्वामींची क्षमा मागितली. आज मी येथें खरोखर च दोन्ही हात वर करून मोठ्यानें ओरडून सर्व सांप्रदायिकांच्या कानांवर घालूं इच्छितों कीं, ज्याला श्रीसमर्थसंप्रदाय म्हणजे काय, हें समजून घ्यावयाचें असेल, रामकृपा, गुरुकृपा, उपासना इत्यादि शब्द आपले पाठ झालेले असतात, पण त्यांचें अलौकिक रहस्य जाणावयाची इच्छा असेल, त्यानें रामसोहळा ग्रंथ अवलोकावा. ग्रन्थ किंचित् कठीण आहे. त्यांतून खेदाची गोष्ट अशी कीं, सत्कार्योत्तेजक सभेनें तो मूळ प्रतीवरून प्रकाशित केलेला नाहीं. तंजावर येथील सरस्वतीमहालांत जी प्रत आहे, तिच्या वरून माझ्या दोघां मित्रांनीं प्रत करून आणली, त्या प्रतीवरून सभेनें हा ग्रन्थ प्रकाशित केला आहे. म्हणजे चुक्या करण्याचे पूर्वींचे दोन प्रसंग व छापखान्यानें ज्या केल्या असतील, तो तिसरा प्रसंग.

या ग्रन्थाचे एकादश रुद्र आहेत व प्रत्येक रुद्रांत अकरा अकरा उल्लास आहेत. श्रीसमर्थांपासून अनंतांना जो ठेवा मिळाला, तो च त्यांनीं मेरुस्वामींच्या हवालीं केला व मेरुस्वामी तो च आपल्या पर्यंत आणून पोंचवीत आहेत.

**लाधलों पूर्वजांचा ठेवा । दिल्हा मज अनंतें विसांवा ।**
**तो चि पुढतपुढती सांगावा । वाटे चित्तीं ॥** सो. २–७–६९

त्यामुळें, मेरुस्वामींनीं जें कांहीं सांगितलें असेल त्याचें मूळ श्रीसमर्थांच्या शिकवणींत आढळलें पाहिजे, म्हणजे च याच्या उलट, समर्थांच्या च शिकवणीचा प्रतिध्वनि मेरुस्वामींच्या ग्रन्थांत आपणांस ऐकावयास मिळाला पाहिजे. तसा तो कितपत मिळतो, हें आपण थोड्या वेळानें पाहूं.

श्रीसमर्थांचा जो शुद्ध मार्ग, त्याला च मेरुस्वामींनीं व इतरांनीं केव्हां केव्हां पुण्यमार्ग, राजमार्ग, ज्ञानमार्ग, सन्मार्ग, विमल मार्ग, नेमस्त मार्ग इत्यादि नांवांनीं संबोधिलेलें आढळतें. या मार्गाविषयीं मेरुस्वामींची निष्ठा पहा—

**हा ज्ञानपंथ सुगम । श्रवणगती उत्तमोत्तम ।**
**येणें प्राप्तीसी पाविजे परम । परंधाम स्वयें ॥** सो. ८–१–५६

**हा राजमार्ग अति सोपारा । अभ्यंतरवस्तीनें अगोचरा ।**
**पावलासे निजमंदिरा । स्वरूपवस्तीच्या ॥ ५७**

**टाकूनि हा राजमार्ग प्रसिद्ध । अन्य मार्गें प्रवर्ततां प्रारब्धें ।**
**तेणें अन्यथा गति विरुद्ध । अधोगतीसी पाविजे ॥ ५८**

श्रीसमर्थांचा स्वरूप संप्रदाय तो हाच.

**मार्ग काळत्रयअबाधित । निर्विकल्प निर्हेतु अद्वैत ।**
**हा पंथ चि परब्रह्म सदोदित । गुरुकृपानुयोगें ॥** सो. ८–२–४

**मार्ग निजशुद्धि निराश्रय । असतां कुपंथ कां जाणें होय ।**
**याचें प्रत्योत्तर निश्चयें । निवळोनि द्यावें ॥ ५**

**स्वयें स्वरूप विद्यमान । द्रष्टा ज्ञानप्रकाशघन ।**
**तो हृदयस्थ परम गहन । निजआस्तिक्यसाक्षी ॥ ६**

‘ अहं ब्रह्मास्मि ’ हेंच स्वरूपसंप्रदायाचें वर्म होय.

**विमळ मार्ग ब्रह्मप्रत्ययें। आत्मा परब्रह्म स्वयें।**
**मुळींहूनि भेद न साहे। केवळ सिद्धांत हा॥ १०**

अशा या संप्रदायांत भोळेपणाला वाव कोठून असणार? सर्व कांहीं शुद्ध, निर्मल, विमल, केवळ असावयाचें: उपासना शुद्ध, ज्ञान शुद्ध, तसें वैराग्य देखील शुद्ध च. विवेकयुक्त वैराग्य तें च शुद्ध वैराग्य होय. हा विमळ शब्द मेरुस्वामींचा हि आवडता दिसतो. त्यांना हि सर्व विमल पाहिजे होतें.

**विमळ मती विमळ क्रिया। विमळ उपासना निजचर्या।**
**विमळ भजनस्थिति जया। सर्व काळ॥** रा. सो. १-५-५९

**विमळ योगअनुष्ठानविधि। विमळ ध्यानधारणासिद्धि।**
**विमळ वैराग्यउपलब्धी। दीक्षा सहजें॥ ६०**

संप्रदायाची दीक्षा हि ओघानें च शुद्ध, साचार, विमल असणार! असो.

(८) प्रत्यंतराला आपण तिसरा ग्रन्थ घेऊं इच्छितों तो गिरिधरांचा निवृत्तिराम ग्रन्थ होय. समर्थप्रताप ग्रन्थाचे कर्ते या नात्यानें गिरिधरांचा परिचय सर्वांना झालेला आहे. यांचा मठ बीड येथें आहे. या मठाचे आपल्या-वर फार उपकार झाले आहेत. 'रामेण रामदासेन लिखितं वाल्मीकिरामायणम्' ची प्रत या च मठांत आपणांस उपलब्ध झाली. श्रीसमर्थांच्या वेणाबाई, वेणाबाईंच्या बाइयाबाई आणि त्या बाइयाबाईंचे गिरिधर हे शिष्य होत. याप्रमाणें ते श्रीसमर्थांचे परमार्थांतील पणतु होत असले, तरी त्यांना कांहीं वर्षें श्रीसमर्थांचा सहवास घडला होता. त्यांचे लहान मोठे असे बेचाळीस ग्रन्थ उपलब्ध आहेत. त्या सर्वांत माझा अत्यंत आवडता ग्रन्थ म्हणजे श्रीसमर्थप्रताप ग्रन्थ होय. या ग्रन्थाचे मजवर कल्पनातीत उपकार झालेले आहेत. नुसतें कबूल केल्यानें ऋण फिटत नसतें तरी एकवार शेवटचें म्हणून सांगून ठेवतों कीं, श्रीसमर्थप्रताप हा फार मौल्यवान् ग्रंथ आहे. श्रीसमर्थां-विषयीं इतकी विश्वसनीय आणि बारीक माहिती असलेला दुसरा ग्रन्थ उपलब्ध नाहीं. श्रीसमर्थांपाशीं शेवटचीं कांहीं वर्षें गिरिधर होते, त्यामुळें या ग्रन्थाला विशेष विश्वसनीयता आली आहे. त्यावर माझा प्रेमाचा राग असला तर एवढा च कीं, ग्रन्थ फार लहान आहे. गिरिधरांनीं दासविश्रामधामा एवढा श्रीसमर्थप्रताप ग्रन्थ लिहावयास पाहिजे होता. त्यांना आवश्यकता वाटली नाहीं, कारण सर्व प्रसंग त्यांच्या नजरेसमोर होते. पण पुढच्या

काळांतील आम्हां सारख्या दरिद्री आणि हतभागी जीवांची दया येऊन त्यांनीं प्रचंड ग्रंथ लिहावयास पाहिजे होता. त्यांचा ग्रंथ आज आम्हांस सूत्रमय भासतो. त्या सूत्रांतील प्रसंग तेव्हां सर्वांना अवगत असल्यामुळें त्या काळीं श्रीसमर्थप्रतापांतील सूत्रमय भाषा अडचणीची भासली नसेल, पण आज आम्हांस तीं सूत्रें उलगडण्याला मारामार पडते. प्रतापांत शें दीडशें कोडीं आहेत. पैकीं आम्हांस पांच पंचवीस उलगडलीं असतील नसतील, बाकीचीं सर्व पुढिलांसाठीं राखून ठेवलीं आहेत. अखंड संशोधन चालू राहो.

श्रीसमर्थप्रतापांत समर्थांच्या अवताराचें गिरिधरांनीं जें प्रयोजन सांगितलें आहे, त्यानें हि आपल्या कल्पनेचें समर्थन होत आहे :

**समर्थांचीं अवतारप्रयोजनें ।**
**उत्कट भक्ति-ज्ञान-वैराग्य-लक्षणें**
**कर्म उपासना संरक्षणें ।**
**विचारसंन्यास वाक्यार्थें ॥** प्र. १९-५१

**समर्थदेवें जें जें केलें ।**
**तें कोण्ही नसेल ऐकिलें देखिलें ।**
**भक्ति ज्ञान वैराग्य गाजले ।**
**न भूतो न भविष्यति ॥** ५२

**समर्थ स्थितीसी मानवती संत ।**
**मोक्षश्रिया भाग्यवंत ।**
**येकंकार नसे निभ्रांत ।**
**येक विचार परमार्थीं ॥** ५३

यांत हि धर्मकारणाचीं पंचविध लक्षणें, माझ्या स्पष्टीकरणावांचून वाचकांच्या प्रत्ययास सहज येतील.

(९) निवृत्तिराम ग्रन्थ हि गिरिधरांचा च होय, असें आपण धरून चाललों आहोंत. शके १५९६ त श्रीसमर्थांनीं श्रीवेणाबाईंना आज्ञा केली कीं, प्रभु रामचंद्रचरणीं सर्व अर्पण करून आपण निवृत्त झालों आहों, असें तूं म्हणतेस तर निवृत्तिराम नांवाचा ग्रन्थ करून ती निवृत्ति कसकशी झाली, याचें तूं प्रतिपादन कर. आज्ञा ऐकून श्रीवेणाबाईंना हर्ष झाला, पण कां कोण जाणे, त्या म्हणाल्या, आपल्या परंपरेंत असा ग्रंथ अवश्य होईल! त्याप्रमाणें प्रस्तुतचा ग्रंथ शके १६३४ त निर्माण झाला. ग्रंथ अपूर्व आहे.

कोणतें हि कर्म सोडावयास पाहिजे असें नाहीं. सर्व कर्मे करीत राहून अलिप्त राहतां आलें म्हणजे कर्मांची बाधा न होतां प्रपंच आणि परमार्थ हीं दोन्हीं साध्य होऊं शकतील.

> प्रपंचें परमार्थ ढळेना । पवनें गगन चळेना ।
> वृत्तीनें निवृत्ति मळेना । सुखसमाधि स्वरूपीं ॥ नि. रा. ९–५२

हें तत्त्व, या ग्रन्थांत, अनेक दृष्टांत आणि दाखले देऊन प्रतिपादिलें आहे ग्रन्थ लहान आहे, पण समजण्यास जरा कठीण जातो. परंतु समजून घेण्याचा नाद सोडून चालणार नाहीं. ग्रन्थाचे अवघे बावीस समास आहेत. ओवीसंख्या २०२६ आहे.

पहिल्या च समासांत श्रीसमर्थचरित्र आहे. त्यांत श्रीसमर्थांच्या अवताराचा हेतु सांगतांना, श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाप्रमाणें, धर्मकारणाच्या पंचविध लक्षणांचा त्यांत उल्लेख आला आहे. तो आपल्या कल्पनेला पोषक असा च आहे.

> श्रीरामदासस्वामी योगींद्र । रामध्यानपरायण कृपासमुद्र ।
> हनुमानरूपें निःकलंक चंद्र । भक्तचकोर अवलोकिती ॥ नि. रा. १-३२
> आत्मज्ञानविहीन जन । कर्माकर्म न कळे ज्ञान ।
> भक्तिमार्गें रघुपति आपण । अत्यद्भुत प्रकाशिला ॥ ३३
> निस्सीम वैराग्य रघुनाथभक्ति । विशद ज्ञान लोकांप्रति ।
> विषयांधासी सूर्यदीप्ति । अटण केलें पृथ्वीचें ॥ ३४
> व्यापकपणें सकळां ठाईं । न कळे देही कीं विदेही ।
> षड्गुणसंपन्न ईश्वर पाहीं । नाना मतें निरसावया ॥ ३५
> नाना मतीं भेद नाना । निर्भीड कोण्ही च बोलेना ।
> संशयनिवृत्ति होईना । माया आणि ब्रह्मींची ॥ ३६
> सर्वब्रह्में शाब्दिक ज्ञान जालें । भक्ति ज्ञान वैराग्य लोपलें ।
> सकाम भजनें जन लागले । कामनेपाठीं प्रत्यक्ष ॥ ३७
> परलोकप्राप्तीचा विचार । कोण पाहातो सारासार ।
> तारक ब्रह्म राम साचार । मूढ लोकां कळेना ॥ ३८
> म्हणोनि निर्भीड वीतरागी । धगधगीत ज्ञानशक्ति आंगीं ।
> ऐसा अवतार कलयुगीं । समर्थवेषें प्रगटला ॥ ३९

**संग कोणाचा न साहे। निःसंग वनीं विचरत आहे।**
**जगदोद्धार करीत पाहे। धर्मस्थापक सर्वोत्तम॥ ४३**

**भक्तजन जेथें जेथें भाविती। तेथें तेथें दर्शनें होती।**
**संत सर्वज्ञ सर्वत्र म्हणती। अवतारपुरुष निर्धारें॥ ४५**

**ब्राह्मण्यरक्षणीं शंकरमूर्ति। प्रगट जाले विख्यात कीर्ति।**
**तेवि प्रगटले रघुनाथमूर्ति। त्रिकांड वेद रक्षावया॥ ५५**

वरील ३७ व्या ओवींतील शरसंधान कोणावर आहे, याविषयीं वाचकांस कांहीं कल्पना होते काय? असो.

(१०) आतां आपण गुरुपरंपरा, वैराग्य, ब्राह्मण्यरक्षण, शुद्ध उपासना आणि विमल ज्ञान या धर्मकारणाच्या पंचविध लक्षणांना स्वानुभवदिनकर आणि रामसोहळा या दोन ग्रंथांत मिळणाऱ्या प्रत्यंतराचा क्रमशः शोध घेऊन हें प्रकरण संपवूं. बोलून चालून त्या दोन ग्रंथांत प्रत्यंतराचा शोध घेण्यास आपण प्रवृत्त होत आहोंत, तेव्हां अर्थात् येथून पुढें आपणांस जास्त च उतारे द्यावे लागतील. म्हणून येथें आरंभीं च वाचकांस विनंति करून ठेवतों. या उताऱ्यांचा, कृपा करून, कंटाळा करूं नका. ते उतारे देणें मला अपरिहार्य वाटतें. त्यांपैकीं कांहीं मी माझ्या भाषेंत रूपांतर करून सांगूं शकेन. पण अशा रूपांतरांत काय स्वारस्य असणार? माझें मन मला सांगतें कीं, मुळांतील एक शतांश हि गोडी मला माझ्या भाषेंत आणतां येणार नाहीं. शिवाय संमतिवचनें हीं जशींच्या तशीं च दिलीं पाहिजेत ना? उतारे देण्याचें तें च तें समर्थन करून यापुढें मी आतां आपणांस वारंवार शिणविणार नाहीं.

(११) संप्रदायाचीं धर्मकारण आणि राजकारण अशीं दोन अंगें. राजकारण हें असाधारण असतें, त्याची लक्षणें असंख्य असतात व तीं सर्व सांगतां हि येणें शक्य नसतें. धर्मकारणाचीं जीं पांच लक्षणें त्यांपैकीं गुरुपरंपरेचें लक्षण ही पहिली बाब होय.

**लागतां सद्गुरुवचनपंथें। जालें ब्रह्मांड पालथें।**
**तरी जयाच्या शुद्ध भावार्थें। पालट न धरिजे॥**

इतकी निस्सीम भक्ति असणें, हे गुरुपरंपरेच्या लक्षणाचें बीज होय. श्रीसमर्थांच्या सर्व शिष्यांची त्यांच्या चरणीं इतकी निस्सीम भक्ति होती. ती आपणांस या दोन्ही ग्रंथांत पहावयास मिळत आहे.

गुरूवांचून तरणोपाय नाहीं, हें खरें, पण वाटेल तो गुरु करून तरणोपाय लागेल, असें समजूं नका. गुरु कसा असावा, त्याच्या ठायीं कोणते गुण असावेत, तें श्रीदिनकर सविस्तर सांगत आहेत:

असो आतां गुरुत्वासी निश्चय जाला।
जे गुरु ब्राह्मण चि पाहिजे केला।
तो हि ज्ञानी सत्पुरुष पाहोनि भला।
कर्मनिष्ठ सुशीळ॥ स्वा. दि. ५-१-९

स्नानसंध्या आचारशीळ। सज्जन सात्विक परम दयाळ।
शरणांगतजनवत्सळ। प्रबोधकर्ता॥ १०

बुद्धि जयाची असाधारण। शांति क्षमा दया परिपूर्ण।
अध्यात्मग्रंथमात्रीं परिच्छिन्न। दृष्टि पुरे जयाची॥ ११

जाणे देहचतुष्टयनिर्शन। पंचीकर्ण महावाक्यविवरण।
आत्मज्ञानाचा विचार संपूर्ण। सारासार नित्यानित्य॥ १२

सगुण साक्षात्कारी असोन। ब्रह्मानुभवी परिपूर्ण।
अध्यात्मग्रंथाचें निरूपण। प्रबोधूं जाणे॥ १३

सगुण भक्तीचे ठाई आवडी। कथाकीर्तनीं नित्य गोडी।
जयंतिया महोत्साव यत्नापरवडी। यथायुक्तीं करणें॥ १४

वर्णाश्रमधर्म संरक्षून। सदा प्रपंचावरी उदासीन।
जयासी देहाचें नाहीं भान। विरक्त सदैव॥ १५

ऐसें सर्वगुणसंपन्न। तें चि सद्गुरूचें अधिष्ठान।
साधकें तेथें चि रिघावें शरण। अनन्यभावेंकरूनि॥ १६

ही कसोटी लावून दिनकरांनीं श्रीसमर्थांकडे पाहिलें आणि त्यांना काय वाटलें, तें ऐका:

पाहा सद्गुरु समर्थासारिखे।
कोण पां आणिक असे सखे।
जेणें अनेकें संसारदुःखें।
कृपाकटाक्षें वारिलीं॥ स्वा. दि. ५-१-३२

सद्गुरु देव धर्म तीर्थ व्रत।
सखा सोयरा साह्यकर्ता समर्थ।

**इष्ट मित्र सुहृद बंधुत्वें विख्यात।**
**मायबाप निजांचा ॥ ३३**
**त्यापरतें आणिक थोर दैवत।**
**नाहीं नाहीं सहसा इत्थंभूत।**
**ऐसिया समर्थासी उत्तीर्ण उचित।**
**काइसेन पैं व्हावें॥ ३४**

अशा सद्गुरूचें कसें उत्तीर्ण व्हावें? आपल्या जवळ आपलें असें काय उरलें आहे, तर तें अर्पण करून त्यांच्या ऋणांतून आपण किंचित् तरी मुक्त होऊं, असा दिनकरांना प्रश्न पडला. देहावांचून आपणाजवळ कांहीं उरलें नाहीं, असें पाहून दिनकरांनीं तो देह हि श्रीचरणीं अर्पण केला. देह हि अर्पण केला म्हणजे काय केलें? तर सर्व कर्मेंद्रियें आणि ज्ञानेंद्रियें श्रीगुरु-सेवेकडे लाविलीं. तीं कशीं? तीं अशीं :

**निजवाचें श्रीगुरुनामस्मरण। निजमस्तक श्रीगुरुपदीं ठेऊन।**
**निजकरें श्रीगुरूचें पूजन। नित्यनेमेंसीं कर्तव्य॥** स्वा. दि. ८–३–१६.

**निजकर्णीं श्रीगुरुचरित्रकथा। ऐकोनि लागावें भजनपंथा॥**
**श्रीगुरुवाक्याचा शब्दगाथा। स्वहितासी श्रवण करावा॥ १७॥**

**श्रीगुरूचें सगुण निर्गुण ध्यान। निजनेत्रीं करावें अवलोकन।**
**श्रीगुरूचें निर्माल्यजिघ्रण। निजघ्राणीं करावें॥ १८॥**

**निजपदीं प्रदक्षिणा श्रीगुरूसी। नमस्कार घालावे साष्टांगेंसीं।**
**मस्तकीं धरूनि श्रीगुरुआज्ञेसी। कार्यकारणीं वर्तावें॥१९॥**

**निज वाचें श्रीगुरूसी वर्णावें। निज हृदईं श्रीगुरूसी आलिंगावें।**
**निज अंतरीं अहर्निश करावें। श्रीगुरूचें चिंतन॥ १०॥**

दिनकरांची ही गुरुभक्ति पाहून कोणाला हि त्यांची धन्यता वाटेल. आत्मनिवेदन भक्ति याहून कांहीं निराळी असते काय?

ही च गुरुभक्तीची पराकाष्ठा मेरुस्वामींत हि पहावयास मिळते. आपण किती उतारे देऊं शकूं? सारा रामसोहळा ग्रंथ उद्धृत करावा लागेल, इतका तो ग्रंथ गुरुभक्तिरसानें थबथबलेला आहे. श्रीसमर्थांचे गुरु श्रीराम,

अनंतमौनींचे गुरु श्रीसमर्थ आणि स्वत: मेरुस्वामींचे गुरु अनंतमौनी. तेव्हां आपले गुरु, परम गुरु आणि परात्पर गुरु या तिघांविषयीं मेरुस्वामी काय म्हणतात, तें पहा:

## श्रीराम — समर्थ — अनंत

संभवल्या सद्गुरु अवतार। संपूर्ण होय विश्वोद्धार।
तो परात्पर गुरु साचार। दाशरथी राम॥ सो. २-३-७

गुरु राम परंपरा। चित्सूर्यबोध अभ्यंतरा।
महावाक्यश्रवणद्वारा। प्रगट होय॥ ८

जे अनुभव शंकरें सेविली। जे महासिद्धी प्रशंसिली।
जे आत्मारामापासून चालिली। आत्मपरंपरा॥ ९

भक्तपरंपरा विख्याती। निगम निरंतर स्थिती।
उपदेश बोध पद्धती। विमळ समर्थांची॥ १०

समर्थांसी श्रीराम भेटी। परस्परें जाहल्या गोष्टी।
दासबोध प्रसिद्धि सृष्टीं। विमळ ज्ञान॥ ११

राम स्वानंदसदन। निजावधानें भवकंदन।
समर्थ बोधकथन। उपदेश चर्चा॥ १२

परब्रह्म दासासी बोध। स्वानुभवाचा दासबोध।
पावन परंपरा प्रसिद्ध। दाशरथीची॥ १३

श्रीरामें समर्थ पावन। समर्थें पावन बहु जन।
हे परंपराआख्यान। रामउपासना॥ १४

निर्दोष परंपराज्ञान। निर्मळ साधन समाधान।
विमळ वैराग्य भजन। परंपरेसी॥ १५

विमळ योग अनुष्ठान। विमळ बोध अनुसंधान।
विमळ दीक्षा पावन। परंपरेसी॥ १६

काशी पासूनि रामेश्वर। समर्थसांप्रदाय अपार।
बोधप्रसिद्धी थोर थोर। प्रस्थानें रूढलीं॥ १७

तारकब्रह्मउपदेशें। तारिलें सृष्टीसी आदिपुरुषें।
परात्पर निजध्यासें। प्रत्यक्ष केलें॥ १८

**संत महंत साधु मंडळी। विख्यातीनें भूमंडळीं।**
**समर्थज्ञानवंशावळीं। प्रगट सूर्य ॥ १९**

**महंतामाजी महा महंत। महा विख्यात मौनी अनंत।**
**समर्थप्रचीतीनें अखंडित। समर्थ चि रूढला ॥ २०**

**ऐसा अनंत सर्वार्थें समर्थ। समर्थ तो समर्थ विख्यात।**
**श्रीराम समर्थांचा समर्थ। त्रिभुवनपती ॥ ५३**

**श्रीराम समर्थ अनंत। नामें रूपें वस्तु येक संत।**
**निर्गुण अगुण गुणातीत। अभिन्न त्रयें ॥ ५४**

**श्रीराम गुरु परात्पर। परम गुरु समर्थ साचार।**
**अनंत सद्गुरु उद्धार। कर्ता होय माझा ॥ ५५**

**अनंत समर्थ रघुवीर। सद्गुरु परम परात्पर।**
**निर्गुण ब्रह्म साक्षात्कार। स्वयंभकर्तें ॥ ५६**

याप्रमाणें वरून खालीं या, किंवा खालून वर जा, हे त्रिवर्ग मिळून एक च होत असें, अनेक दृष्टांत देऊन प्रतिपादन करीत करीत मेरुस्वामींच्या वक्तृत्वाचा प्रवाह सारखा पुढें वाहत चालला च आहे! आपण च आपला हात आंखडला.

**रहस्य हें बरवें उमजोनि। सद्गुरु रामासी वोळखोनी।**
**अनन्य प्रतीतीनें अंतःकरणीं। हृदयस्था भजिजे ॥**

(१२) संप्रदायाच्या धर्मकारण अंगापैकीं दुसरी बाब म्हणजे विरक्ति. विरक्ति म्हणजे केवळ बाह्य पदार्थत्याग नव्हे, तर अंतस्त्याग मुख्य पाहिजे. एकादा प्रपंची असून हि अंतस्त्यागी असेल, तर त्याला हि विरक्त च म्हणावयाचें. त्यामुळें, तुम्ही प्रपंची असा किंवा निस्पृह असा, विरक्ति दोघांना हि सारखी च आवश्यक होय. श्रीसमर्थसांप्रयदायिक कसा असावा याचें दिनकरांनीं एका ठिकाणीं सहज वर्णन केलें आहे, त्यांत त्यांनीं हें स्पष्ट म्हटलें आहे. त्या वर्णनाकडे सर्व सांप्रदायिकांनीं अवश्य लक्ष पुरवावें. तुम्ही कोणी हि असा, प्रपंची असा वा नसा, सर्व सांप्रदायिकांनीं च आपण सांगतो ते नियम पाळले पाहिजेत, असें दिनकर म्हणतात:

**परंतु हो प्रपंची अथवा निस्पृह।**
**तेणें वैराग्ययुक्त असावें निःसंदेह।**

वर्णाश्रमधर्म कर्मसमूह ।
प्राणांतीं हि न सोडिजे ॥ स्वा. दि. १५-५-४५

अहर्निश करावी श्रीरामभक्ति ।
वर्णाश्रमधर्माचिया युक्ती ।
श्रीरामउपासनेची अभिव्यक्ति ।
केली च करावी निःशंक ॥ ४६

वैराग्य करावें विवेकयुक्त ।
प्रतिज्ञा म्हणवावें श्रीरामभक्त ।
पदार्थमात्रीं कदापि आसक्त ।
प्राणांतीं हि न व्हावें ॥ ४७

जितुकी गोष्टी मुखें बोलावी ।
तितुकी क्रिया करूनि दाखवावी ।
सत्क्रिया उत्तरोत्तर चालवावी ।
धर्मशास्त्रविचारेंसीं ॥ ४८

करावें वेदपारायण । शास्त्रचर्चा अध्यात्मनिरूपण ।
कां तें श्रीरामगुणानुवादकीर्तन । यथासांग करावें ॥ ४९

ही विरक्ति कशी असते, कशी असावी, तिचें स्वरूप कसें आहे, तिचें महत्त्व किती, याचें मेरुस्वामींनीं फार सरस वर्णन केलेलें आहे :

दुराराध्य विषय मनीं । विषयध्यासें जाय मरोनि ।
त्याप्रति विरक्तिसंजीवनी । देतसे गुरु दयाळ ॥ सो. ५०/१

महावैराग्य मुमुक्षाप्रति । यावें ईश्वरकृपेनें अवाचिती ।
कैसी ते विरक्तीची स्थिती । कांहीं येक आईका ॥ ५१

विखार झोंबलियां देहीं । नावडे सुखचंदन वनिता हि ।
शिरछेदासी नेतां पांहीं । काय ते विषयोपचार ॥ ५२

भेदलें मृत्यूनें जिव्हार । नावडे तयासी कांहीं संस्कार ।
तेवीं विरक्तासी संसार । विश्रांति रुचेना ॥ ५३

दृढ वैराग्य अभ्यंतरीं । सद्गुरुभजनीं आस्था धरी ।
नामस्मरण निरंतरीं । रक्षी अनुसंधान ॥ ५४

हरिकथानिरूपण । अध्यात्मचर्चा अवधान ।
भगवद्भजनीं संपूर्ण । प्रीति जयासी ॥ ५५

सर्वस्वत्यागें निराभिमान । तें चि विरक्तीचें अधिष्ठान ।
सद्भावसंपत्तीनें पूर्ण । आर्जवी सद्गुरूसी ॥ ५६

गुरुभक्ति अवंचकता । जीवें सर्वस्वें आर्जवी हितार्था ।
प्रळय जालियां हि सर्वथा । धारिष्ट ढळेना ॥ ५७

पूर्व सुकृतें धैर्य न चळे । त्रैलोक्यनिदानीं धृति प्रबळे ।
भोगी स्वानंदसुखसोहळे । सद्गुरुकृपेनें ॥ ५८

कल्पांतवायु सुटोनि । पृथ्वी जावो कां उडोनि ।
ना ते द्वादशादित्यकिरणीं । हो कां विश्व दग्ध ॥ ५९

स्वरूप अभ्यंतरींचें चळेना । तेवि विरक्तिवृत्ति सुलीना ।
उन्मनीची अंतर्भावना । निराश्रय नैराशबळें ॥ ६०

स्वरूपावधान सगळें । सद्गुगुरुकृपेनें निवळलें ।
कृपांबर कवळलें । विस्तीर्ण गुरुकृपेचें ॥ ६१

एवं निर्वाणविरक्ति । तेणें दृढावली गुरुभक्ति ।
तेथें वोळगण्या जाल्या मुक्ती । सर्वस्वें पाहतां ॥ ६२

अशी विरक्ति अंगीं बाणावी, तेव्हां गुरुभक्तीला जोर चढतो आणि चारी मुक्ति (वोळगणा = दास. वोळगणी = दासी) दासी होऊन पायांशीं लोळण घेतात.

दिनकरांनीं स्वानुभवदिनकराच्या ४ × ३ त संतांचें वर्णन करतांना श्रीसमर्थांची च मूर्ति डोळ्यांपुढें ठेवली होती. त्या वर्णनांत वैराग्याबरोबर इतर लक्षणांचा हि उल्लेख केलेला आहे.

जे शुद्ध वैराग्यें वोतले । सत्क्रियाभूषणें अळंकारले ।
दयाधर्में अवतरले । मूर्तिमंत अवतार ॥ स्वा. दि. ४-३-७९

उपासना साजिरी ज्याकरितां । शोभा शोभली विधिविधानता ।
जेथ निगमागम स्वभावता । विश्रांति पावले ॥ ८०

जे विद्यावैभवें संपन्न । मोक्षश्रिया विराजमान ।
नित्यानित्यविवेक परिछिन्न । वर्तणें अखंड ॥ ८१

सद्भक्तीचें जे निवासस्थान । आत्मज्ञानाचें येकायतन ।
सुखावलें निःशेष विज्ञान । सहजास्थिति जेथ ॥ ८२

इत्यादि.

(१३) तिसरी बाब ब्राह्मण्यरक्षणाची. त्या काळीं ब्राह्मणांची अति हीन दशा झाली होती आणि म्हणून श्रीसमर्थांना ब्राह्मण्यरक्षणाची आवश्यकता भासून त्यांनीं आपल्या संप्रदायाचें तें एक लक्षण च ठरविलें. ब्राह्मणांच्या निकृष्ट स्थितीचें वर्णन जसें दासबोधांत आलें आहे, तसें तें स्वानुभवदिनकरांत हि आहे. त्या काळीं एकंदर च चातुर्वर्ण्याची घडी बिघडली होती. ब्राह्मण स्वतः ब्राह्मण्याला कंटाळून समाजांत भ्रष्टाकार माजवीत होते. हें श्रीसमर्थां-प्रमाणें दिनकरांना हि दिसत होतें. त्यांनीं या बाबतींत श्रीसमर्थांच्या प्रमाणें च दुःखाचे उद्गार काढले आहेत. ते वाचून एकाद्याच्या मनांत सहज येऊन जावयाचें कीं, कांहींनीं ब्राह्मण्य बुडविण्याचे प्रयत्न करावे व इतरांनीं त्याच्या रक्षणार्थ झटावें, असें ब्राह्मणांचें अदृष्ट च आहे कीं काय, न कळे !

**कलियुगीं यवनाचें राज्य जालें । सत्कर्मविधान सर्व मोडलें**
**ब्राह्मण कर्मभ्रष्ट जाले तेणें राहिले । स्वाहास्वधाकार अवघे ॥**

स्वा. दि. ५-४-३०

**या विश्वाचें गुरुत्व ज्यांचिया आंगीं । ते ब्राह्मण सेऊं लागले भांगी ।**
**षट्कर्मेंसी त्यागूनि स्नानालागी । ज्ञानी म्हणविती आपणांला ॥ ३१**

**आश्रमाचें नांव ठेऊनियां मठ । तेथें भरूनि ठेविती भांगीचे घट ।**
**सर्वब्रह्म उपदेशूनि कर्मभ्रष्ट । विधिविधान सोडतील ॥ ३२**

**गांजेतमाखूची धुमाळी करितील । गुर्गुडीची गवांदि घालितील ।**
**ऐसियां भ्रष्टाचारें विख्यात म्हणवितील । आपणांलागीं संत ॥ ३३**

**म्हणौनि दिनकर म्हणे युग कलीचें ।**
**त्यावरी राज्य परम उत्कृष्ट यवनाचें ।**
**ऐसियामध्यें रक्षण स्वधर्माचें ।**
**कोणें कीजेल पैं ॥ ३४**

आणि म्हणून तर ब्राह्मण्यरक्षण करणें हें आपल्या संप्रदायाचें एक लक्षण श्रीसमर्थांना ठरवावें लागलें. वास्तविक ब्राह्मणांचा केवढा अधिकार ! तो श्रीसमर्थांनीं सांगितलेला आपण मागील एका प्रकरणांत पाहिला च आहे. त्याला च दिनकरांचें जें प्रत्यंतर मिळतें, तें हि पाहिलें पाहिजे.

**तरी आतां गुरुत्वाचें अधिष्ठान । विचारितां सर्वांचा गुरु ब्राह्मण ।**
**वर्णानां ब्राह्मणो गुरुः हें वचन । शास्त्रांतरीं प्रसिद्ध ॥** स्वा. दि. ४-५-१६

म्हणौनि सकळांसी गुरु ब्राह्मण । ऐसें वेदवचन प्रमाण ।
अन्य याती जे कां वर्णहीन । त्यांसी गुरुत्व न घडे चि ॥ १७

पाहातां च्यान्ही वर्ण अठरापगड याती ।
लोम विलोम अनुलोम प्रतिलोम स्थिति ।
दर्शनें उपदर्शनें उदंड असती । छत्तीस हि पाषांडें ॥ १८

या हि वेगळीं अनेक बंडपाषांडें । नवीं जुनीं जालीं आहेती उदंडें ।
इतुक्यां हि शासन ब्राह्मणदंडें । अद्यापि चालत असे ॥ १९

वेद शास्त्र पुराण ज्योतिष । स्मृतिसमुच्चय धर्मशास्त्रसारांश ।
वैद्यक गायनविद्या नाना परिभाष । ब्राह्मणगृहीं सर्व हि ॥ २०

ब्राह्मणांकरितां यज्ञ चालती । पृथ्वीवरी स्वाहास्वधाकार होती ।
तेणें पर्जन्याची वृष्टि होऊनि पिकती । सकळ हि धान्यें ॥ २२

तीर्थें क्षेत्रें प्रतिमा मूर्ति । ब्राह्मणांकरितां त्यांची महंती ।
व्रतें उद्यापनें सकळ चालती । ब्राह्मणांचेनि योगें ॥ २३

ब्राह्मणांचे घरीं जें नाहीं । तें अमान्य कीजे लोकत्रईं ।
म्हणौनि सकळ चराचरांचा ठाईं । ब्राह्मण पूज्य सर्वस्वें ॥ २६

ब्रह्मचर्य आणि गृहस्थाश्रम । वानप्रस्थ तथा संन्यासधर्म ।
या चहूं आश्रमांचें स्वधर्मकर्म । ब्राह्मणांकरितां चि ॥ २७

देवदेवतांचा सकळ महिमा । ब्राह्मणमुखें तृप्त परमात्मा ।
अग्नीसी थोरपणाची गरिमा । ब्राह्मणें दिधली ॥ २८

म्हणौनि ब्राह्मण तो चि नारायण । ऐसें बोलिलें वेदवचन ॥
याकरितां गुरुत्वें वरिष्ठ ब्राह्मण । सकळांसी निश्चयें ॥ २९

असा त्या काळीं सर्वानुमतें निश्चय झालेला होता व त्यावर जरी सारखे आघात होत आले आहेत, तरी तो अद्यापि ढळलेला नाहीं, असें दृष्टोत्पत्तीस येत आहे. वरील प्रत्येक ओवी विचार करण्यासारखी आहे. तत्कालीन समजुतींचें प्रतिबिंब या ओव्यांत उमटलेलें आहे. शके १६१६ त ब्राह्मणांची प्रतिष्ठा 'अद्यापि चालत असे' असें दिनकर म्हणून गेले आणि आज बरोबर ३५० वर्षांनंतर आपण हि म्हणूं शकतों कीं, ती च त्यांची प्रतिष्ठा अद्यापि हि चालत आहे आणि असें निश्चयानें म्हणतां येईल कीं, श्रीसमर्थांच्या आज्ञेप्रमाणें ब्राह्मण उमगले आणि 'शहाणे झाले' तर त्यांची

ती च प्रतिष्ठा अखंड चालत राहील, मग 'नवीं जुनीं बंडपाषांडें' किती हि उदयास येवोत !

(१४) संप्रदायाच्या धर्मकारणाचें चवथें लक्षण म्हणजे शुद्ध उपासना होय. या उपासनेचें जें शुद्ध स्वरूप आपण या भागाच्या सहाव्या प्रकरणांत पाहिलें, तें आपल्या संप्रदायाचें वैशिष्टय होय. मुख्यतः त्याला शिष्यप्रशिष्यांच्या ग्रन्थांत प्रत्यंतर मिळालें पाहिजे, असें मला वाटे व तसें तें मिळेल तर च, हरिकथानिरूपण म्हणजे धर्मकारण आणि तें धर्मकारण पंचविध लक्षणात्मक आहे, ही जी आपण कल्पना केली आहे, ती बरोबर आहे, असें मानतां येईल, असें मीं माझ्या मनाशीं ठरविलें होतें. स्वानुभवदिनकर आणि रामसोहळा या दोन्ही ग्रन्थांत तशीं संमतिवचनें आढळलेलीं पाहून मला आनंद वाटावा, हें स्वाभाविक आहे. सगुणोपासना सर्वत्र सर्व साधुसंतांच्या ग्रन्थांत सारखी च असणार. तशी ती श्रीसमर्थांच्या शिकवणींत आणि या दोन्ही ग्रन्थांत आहे. वैशिष्टय आहे उपासनेच्या शुद्ध स्वरूपाचें आणि त्याला च आपणांस प्रत्यंतराचा शोध घ्यावयाचा आहे.

दिनकर म्हणतात, श्रीसमर्थ आपणांस जो मार्ग दाखवितील त्या च मार्गानें आपण गेलें पाहिजे, ज्या पद्धतीनें जगदीशाचें भजन करावें म्हणतील ती च पद्धति अनुसरली पाहिजे, जी उपासना सांगतील ती च केली पाहिजे. पण तत्पूर्वीं हि, ते म्हणतात, उपासनेची हि जी उपासना आहे, ती आपणांस आधीं घडली पाहिजे. अशी ही आणखी उपासनेची उपासना कोणती ?

एकांतांत स्थिर चित्तानें श्रीसद्गुरुचरणांचें स्मरण करून, प्रेमभरानें देह पुलकांकित होऊन अर्धोन्मीलित नेत्रांवाटे ज्या प्रेमाश्रुधारा स्रवतील त्यांनीं त्या चरणांना स्नान घालून, सात्त्विक भावाच्या वस्त्रानें ते चरण हळु च पुसून, स्वतःच्या देहाचें पुष्प त्या चरणांवर वाहणें, ही उपासनेची उपासना होय.

**गुरु दाविती जो जो मार्ग । त्या त्या मार्गें चाले अवघें जग ।**
**म्हणौनि गुरुविण उपासनामार्ग । व्यर्थ चि अवघे ॥** स्वा. दि. ६–१–४६

**तस्मात् उपासनेची उपासना । तो हा केवळ सद्गुरुराणा ।**
**श्रीगुरुउपासनेवांचूनि भावना । सर्व हि मिथ्यारूप ॥ ४७**

**तथापि श्रीगुरुची आज्ञा । जे जे सांगिजतील मार्गसंज्ञा ।**
**ते आचरूनि शिष्य सूज्ञा । सगुण दैवतीं भजावें ॥ ४८**

किती मौल्यवान् या तीन ओव्या आहेत ! त्यांचें मोल कोण करूं शकेल ?

(१९) स्वानुभवदिनकराच्या चौदाव्या कलापाच्या दुसऱ्या किरणांत विज्ञानस्थितीचें वर्णन आहे. ती विज्ञानास्थिति प्राप्त झाल्यावांचून शुद्ध उपासना घडणें दुर्घट आहे. तें सबंध किरण अति महत्त्वाचें. तें वाचकांनीं स्वतः च संपूर्ण अवलोकिलें पाहिजे.

सहजसमाधिस्थ निजदेहीं ।
अर्धोन्मीलित निजदृष्टि न देखे कांहीं ।
देही असोनि जैसा विदेही ।
निजस्वानंदें डुल्लत ॥ स्वा. दि. १४-२-२

अशा आनंदांत जो पुरुष अखंड डुल्लत राहणार, तो कोणाचा बरें द्वेष करील, कोणाचा तिरस्कार करील, हेवादावा करील ?

आपणाहूनि वेगळे कोण्ही देखावें । तरी त्याच्या तिरस्कारीं प्रवर्तावें ।
तरी हा पहिलें चि अद्विितीय कोठें पाहावें । तिरस्कारासी मग ॥
स्वा. दि. १४–२–१५

पराधिक्यें प्रगटे मत्सर । तवं पाहिलें चि निवासी सर्वांतर ।
तेथ यासी न दिसे कोण्ही आपपर । निर्मत्सरता सहजें ॥ १६
पदार्थ कांहीं शाश्वत देखावा । तरी त्याचा येणें लोभ धरावा ।
निर्लोभता नाशिवंताचा त्याग करावा । ऐसें चि गमतसे ॥ १७
ब्रह्मांड सामावलें निजउदरीं । सन्मान पाहावा कोणावरी ।
संसर्गाची सरली वारी । तेथ द्वेषावें कवणासी ॥ १८

इत्यादि. तात्पर्य,

आब्रह्मापासूनि अणुरेणांत । व्यापूनि आदिमध्यांतरहित ।
आपुलें आपण सस्वरूप देखत । स्वसंवेद्यपणें ॥ २७
स्वसंवेद्यत्वें अवघा आपण । तेथें द्वेषील कवणासी कवण ।
येकांशें भूतमात्रीं राहिला व्यापून । तेथ अरि मित्र कवणासी ॥ २८

अशी स्थिति व्हावी आणि मग विश्वांत भरलेल्या नारायणाच्या उपासनेला लागावें.

(१६) ती शुद्ध उपासना होय. अशी शुद्ध उपासना श्रीसमर्थांनीं केली. ती च अनंतमौनींनीं हि केली आणि मेरुस्वामींस शिकविली. ती आज आपण मेरुस्वामींच्या तोंडून ऐकण्यास उत्सुक होऊन बसलों आहोंत.

**सकळांतरीं द्रष्टा राम । त्यासी सख्य करी परम ।**
**उपासना प्रत्यक्षें विश्राम । शुद्ध सात्त्विक होसी ॥** रा. सो. ४-२-८

प्राणिमात्राच्या हृदयांतरीं वास करणारा जो परमेश्वर त्याशीं एकरूप होणें—त्या नारायणाशीं सख्य करणें—ही च खरी शुद्ध उपासना व ती ज्याला घडते त्याच्या ठिकाणीं शुद्ध सात्त्विक भावांचा उदय होतो. त्या उदयाचें फळ अगाध आहे.

**विशुद्ध सत्त्वें शांति प्रबळ । विशुद्ध सत्त्वें ज्ञान प्रांजळ ।**
**विशुद्ध सत्त्वें केवळ । समाधान पावसी ॥ ९**

**विशुद्ध सत्त्वें सहजस्थिति । विशुद्ध सत्त्वें अगाध कीर्ति ।**
**विशुद्ध सत्त्वें रघुराजमूर्ति । धांऊनि ये हृदयासी ॥ १०**

**विशुद्ध सत्त्वें प्रत्यक्ष राम । विशुद्ध सत्त्वें चि परम धाम ।**
**विशुद्ध सत्त्वें अंतर्याम । जाणोनि निजजीवीं ॥ ११**

**सर्व भूतीं आत्माराम स्वयें । विश्वात्मा चि होऊनि निश्चयें ।**
**स्वरूपप्रचीतीनें हृदय । दाशरथी करूनि भजिजे ॥ १२**

सर्वत्र राम आहे, असा प्रत्यय आला म्हणजे मग कोणी कोणाचा द्वेष, मत्सर, तिरस्कार करावा ? कोणी कोणाचें भय बाळगावें ?

जगांत सर्वत्र सुख, शांति, समाधान नांदण्याला या उपासनेशिवाय दुसरा कांहीं उपाय आहे काय ?

**राम सर्व साक्षी सनातन । राम सर्वातीत पुरातन ।**
**राम विद्यमानी विद्यमान । प्रत्यक्ष पाहा ॥ १३**

**शरीररक्षणीं जेवि प्राण । तैसा भूतमानीं (त्रीं) सुखैकघन ।**
**स्वरूपसाक्षात्कारनिर्वाण । निवळे अंतःकरणीं ॥ १४**

**हें विश्व चि जयाचें शरीर । किंबहुना विश्वरूप रघुवीर ।**
**निजप्रचीतीनें अभ्यंतर । रामरूप करी ॥ १५**

**असें केलेंस म्हणजे**

या प्रत्ययाच्या निश्चयें। द्वेष मत्सर सहसा न ये।
इच्छा तिरस्कार भयाभय। राम होय संपूर्ण ॥ १६

याहून हि पुढील ओव्यांत या विश्वव्यापक उपासनेचें स्वरूप जास्त स्पष्ट केलेलें आढळेल. तें प्रत्ययास येणें गुरुकृपेवांचून कठीण आहे. जे अंतर्निष्ठ ज्ञानवान् असतील त्यांना च ही उपासना साधेल. सांप्रदायिकांच्या ती घरची आहे, ती त्यांनीं साध्य करून घेतली पाहिजे. सांप्रदायिक म्हणविणें सोपें असेल, होणें कठीण आहे. अशी उपासना ज्याला घडते तोच खरा सांप्रदायिक.

उपासनासंकेत ज्ञान। भूतमात्रीं रघुनंदन।
भक्तें रिघोनि अनन्य शरण। सद्भावेसीं भजिजे ॥ सो. ६-८-३३

सर्वसाक्षी अभ्यंतरीं। देहधारक चराचरीं।
रामावांचूनि अणुभरी। दुसरें नसे ॥ ३४

अंतर्निष्ठा सज्ञाना। जाण ऐसी उपासना। ३५

आणि जे भोळे, भाविक, साबडे भक्त असतील त्यांनीं जप, ध्यान, पूजा, आर्जव, रामसेवा, भीमसेवा, सज्जनसेवा, इत्यादि प्राथमिक उपायांची कांस केव्हां हि सोडूं नये. केव्हां हि अखेरीस शुद्ध उपासनेचें स्वरूप प्रत्ययास आल्यावांचून मात्र कृतार्थता नाहीं, हा सिद्धान्त समजावा.

सर्वहृदयस्थ दाशरथी। आपुला कीजे ॥ १-११-२६

जपोनि तारकब्रह्म जीवें। स्वरूपीं च राहे स्वानुभवें।
सगुण उपासना सद्भावें। आर्जविली च आर्जवी ॥ २७

नित्य नेमें सन्मार्ग भजन। प्रेमातिशय रघोद्भवपूजन।
सर्वदां आर्जवीं सज्जन। पूर्ण स्वसुखें ॥ २८

मनोहर मूर्ति सांवळी। आर्जवी प्रतीतीनें आगळी।
न विसंबे ध्यान सर्व काळीं। हें चि रहस्य ॥ २९

परमार्थसाभिमानी भीम। स्तवनें तोषवित जाय परम।
त्याच्या चि निजध्यासें अंतर्याम। प्रगट करी ॥ ३०

असें कृपाळुपणें पूर्ण। समर्थ बोलिले सुप्रसन्न।
सत्य उपासना चि कारण। ब्रह्मप्राप्तीसी ॥ ३१

(१७) ही शुद्ध उपासना समजली तरी एकदम साधणें कठीण आहे, हें जाणून तिचा आरंभ त्रयोदशाक्षरी मंत्र जपून रामाला आपुला कैवारी करून घेण्यापासून करावा, असें सुचविण्याचा दुसऱ्या रुद्राच्या दहाव्या उल्लासांत मेरुस्वामींचा भावार्थ दिसतो. उल्लास महत्त्वाचा असून १२३ ओव्यांचा मोठा आहे. त्यांतील निदान ३०।४० तरी ओव्या सादर करण्याचें माझ्या मनांत येतें. तो उल्लास अजिबात डावलणें शक्य नव्हे. त्यांत त्रयोदशाक्षरी श्रीराममंत्राचें रहस्य प्रकट करण्यांत आलें आहे. त्यांत ओतप्रोत प्रेम भरलेलें आहे. राम कैवारी करून घेण्याचा निग्रहाचा मार्ग त्यांत दाखविला आहे. त्यांत मेरुस्वामी आपलें स्वतःचें हृद्गत सांगून आपणांस प्रोत्साहन देत आहेत. रामाच्या सगुण आणि निर्गुण स्वरूपाची त्यांत एकात्मता पहावयास सांपडते. त्यांत रामाची प्रार्थना आहे, त्याच्या ब्रीदाचें त्यास स्मरण करून दिलें आहे, त्यांत मेरूस्वामींचें हृदय जणूं दुभंगून त्यांचा कळवळा बाहेर पडला आहे. त्यांत काय नाहीं हेंच मला कळत नाहीं. मी एक च खाजगी गोष्ट सांगतों कीं, सबंध रामसोहळा ग्रन्थांत माझ्या हृदयाला चटका लावणारे इतर अनेक उल्लास असले, तरी या उल्लासांत माझें चित्त विशेष रमतें. सबंध उल्लास उतरून न घेतां ज्या थोड्या ओव्या उद्धृत करीत आहें, त्या वाचून मजप्रमाणें च वाचकांचा हि अभिप्राय पडेल अशी मला खात्री वाटते.

**राममंत्र उपासना । रामरूप आणिजे ध्याना ।**
**राम प्रत्यक्ष ब्रह्मज्ञाना । संरक्षिता होय ॥** सो. २–१०–२६

**सर्वापरी परि शुद्ध उपासना । दुजी ब्रह्मांडांत असेना ।**
**आर्जवी कैलासराणा । महाभक्तिसुखें ॥ २७**

ह्या आर्जवी शब्द मेरुस्वामींचा फार आवडता दिसतो. आर्जवणें म्हणजे प्रेमानें सेवा करणें.

**नित्य नामामृतपान । करितां शिव स्वानंदघन ।**
**त्या चि तृप्तीनें आनंदवन । महास्मशान वसवी ॥ २८**

आनंदवन म्हणजे वाराणसी.

त्या सदाशिवाची प्रसन्नता । रामउपासकासी तत्त्वता ।
नित्य बंधुत्वें सांभाळिता । होय निजयोगें ॥ २९

सकळार्थें उपदेशमूळ । तारकब्रह्म हें केवळ ।
भावें जपतां सर्वकाळ । यहपर सांभाळी ॥ ३०

या उपासनेचा अंतरभाव । सांभाळितो भाविकांचा राव ।
नित्य प्रसन्न करुणार्णव । मंत्र श्रवणीं सांगे ॥ ३१

श्री शब्द बीज पुरस्कर । सकळ सिद्धीचें जिव्हार ।
त्यावरी जय बीज निर्धार । भवजयाचा ॥ ३२

त्याहिवरी जय जय बीज । स्वरूपविजयाचें तेज ।
त्रिकरणशुद्धीनें मंत्रराज । उच्चार तिनी वेळां ॥ ३३

चालतां बोलतां आवडी । श्रीराम जयराम परवडी ।
जय जय रामानें गुढी । उभविली ऊर्ध्व ॥ ४०

म्हणा जय जयराम तुम्हांसी आण । जयजय राम निर्वाणखूण ।
आला रे आला धांव घालून । जय जय राम पाहा ॥ ४४

उठा रे उठा अवघे जण । जय जय रामासी लोटांगण ।
धांवा रे धांवा रघुनंदन । दुऱ्हावला दिसतो ॥ ४६

कास घाला रे आतां बळकट । अवघे होऊनियां येकवाट ।
जाऊं नेदितां वाट । अवरोधूं रामासी ॥ ४७

उघडा रे हृदयसंपुटी । काय पाहातां रे आतां दृष्टी ।
सांठवा राम उठाउठी । दुर्लभ लाभ हा ॥ ४८

मग कैंचा रे श्रीराम । भवांधकूपीं सकाम ।
बुडोनि जाल, निष्काम । जय जय राम म्हणा ॥ ४९

अलभ्य जय जय रामाची जोडी । अकळ भवबंधन तोडी ।
संकल्पमृत्यूची डोई फोडी । जय जय राम म्हणा ॥ ५०

हाका मारा रे येक वेळ । करा जय जय रामाचा सुकाळ ।
जय जय राम तुंबळ । रंग माजवा ॥ ५१

त्रिभुवनीं राम उभारला । अनंत ब्रह्मांडीं राम कोंदला ।
त्याहिपरता असे उरला । राम तो अकळ ॥ ५४

द्वीपोद्वीपीं राम संपूण । राम नवखंडीं सुखघन ।
वनें वनांतरें सगुण । रामें घनवटलीं ॥ ५५

नद्या पर्वत विस्तारें । गर्जती अखंड रामस्वरें ।
त्या चि अनुस्यूत गजरें । संचार होय ॥ ५६

राम संचरला शरीरीं । नावरे चि तो परोपरी ।
आंगीं भरोनि उच्चारी । जय जय राम ॥ ५७

जय जय राम अक्षरमाळा । सर्व काळ जयाच्या गळां ।
जय जय राम तयावेगळा । परता न वचे ॥ ६०

जय जय जी रघुनंदना । विभवभवकंदना ।
स्वयंभ अभिवंदना । करितों, कृपा करीं ॥ ६३

अगा महावीरा रघुवीरा । पाठीसीं घालूनि होय पुढारा ।
दारुण होतसे मारा । निवारीं शत्रूचा ॥ ६४

अहो जी स्वानंदघन रघुराया । निरसीं माझी भवमाया ।
लागलों सद्भावें पायां । अद्यापि काय ॥ ६६

कृपाळुपणें निष्ठुर । रामा आश्चर्य वाटे थोर ।
रघोत्तमा सांभाळीं सत्वर । ब्रीदासी त्या ॥ ६७

रुसलासी न बोलसी कां रे । विश्वश्रवणीं ऐकतोसि कीं रे ।
नभा येवढा कान बा रे । झांकशील कैसा ॥ ७२

प्रगटोन अष्टभावभरें । आंगासी येईं रघुवीरे ।
शंका टाकूनि अवतरे । सप्रेमसुखें ॥ ७५

स्वभावस्थितीनें अभिराम । आंगीं भरला रघोत्तम ।
निद्रा टाकूनि जय राम । जागवा कीर्तनीं ॥ ७६

रामकीर्ति मी गाईन । रामरूप मी पाहीन ।
रामपदीं मी राहीन । निश्चळ आतां ॥ ७७

बुडालों रामार्णवीं आतां । कोण काढील मज तत्त्वता ।
ब्रह्मानुभवसमता । विराली रामीं ॥ ७८

कोण हें प्रेम ! मला कल्पना हि करवत नाहीं. येथें भक्तिप्रेमाची सीमा झाली आहे. असल्या प्रेमार्णवांत आपण हि कधीं काळीं, या जन्मांत नाहीं तर त्या, बुडून जाऊं का ? केवळ शब्दज्ञान्यांना हें प्रेम कळणार हि नाहीं ! मेरुस्वामी च तसें म्हणत आहेत :

**वित्पत्तिजाणिवेच्या बळें। सहसा प्रेम हें ना कळे।**
**केवळ सात्त्विकें प्रेमळें। निवतील येथें॥ ८८**

या ओव्या वाचतांना जे सात्त्विक प्रेमळ भक्त असतील त्यांना गुदगुल्या होणार आहेत. शब्दज्ञानी कोरडे राहतील, नुसते च पहात राहतील! शब्दज्ञानियांनो, शब्दज्ञानाची घमेंड सोडा, रामा ऐसा धूर जोडा. त्यावांचून तुमचे सारे प्रयत्न निष्फल होत. ते निष्फल होत आले आहेत आणि निष्फल च होत राहतील. कारण

**रामेंवीण निवळ नव्हे ज्ञान। रामेंवीण कायसें समाधान।**
**रामेंवीण सर्व साधन। बंधन चि होय॥ ९५**

निवळ ज्ञान तें च आपलें विमळ ज्ञान. तें व्हावें अशी इच्छा असेल तर

## श्रीराम कैवारी करा रे!

हे च ना, श्रीसमर्थांचे शब्द आहेत? त्यासाठीं च आपण प्रत्यंतराचा शोध घेत आहोंत ना?

**श्रीराम कैवारी करा रे। जय राम हृदईं धरा रे।**
**जय जय रामें तरा रे। भवसिंधूसी॥ ९६**

मेरुस्वामींची काय स्थिति झाली?

**सप्रेम डोळां वाहे जीवन। रामें अवधारिलें पूर्ण।**
**सर्व हि राम चि होऊन। विस्तारला॥ १०१**

**जंवरी हें प्रेम नाहीं। तंवरी उपदेश करितां हि।**
**कृतार्थता कांहीं हि। घडेचिना॥ ११४**

त्यांनीं आणखी किती सांगावें? ते म्हणतात, "माझें हें बोलणें ऐकावयाचें असेल तर ऐका, नाहीं तर सोडून द्या. मला कांहीं तरी वेड लागलें आहे, म्हणून मी उगीच बडबड करीत आहे, असें समजूं नका. हें बोलणें माझें नाहीं, मला रामानें स्वमुखें जें सांगितलें तें च मी तुम्हांस सांगत आहे, माना वा नका मानूं, श्रीरामनामाची मला लागलेली गोडी, माझी माझ्याजवळ च राहूं द्या."

श्रवणीं घ्याल तरी घ्याल सुखें ।
न घेतां कोण शिणेल दुःखें ।
श्रीरामें निजमुखें । सांगितलें मज ॥ ११६

नुसती वित्पत्ति शब्द जाड ।
उगी च न करी मी बडबड ।
श्रीरामाचें प्रेम गोड । लागलें जीवीं ॥ ११७

हा उतारा वाचतांना प्रेमळ वाचकांच्या हृदयाची काय अवस्था होईल, तिची मी कल्पना करूं शकतों. असो. असा हा

## (१८) उघडा मंत्र श्रीराम

आहे. तो वरील उल्लासांत मेरुस्वामींनीं उघडा करून सांगितला आहे. श्रीसमर्थांनीं स्वतः च तो उघडा करून दाखविलेला आणि त्याचा प्रभाव सांगितलेला मागील एका प्रकरणांत आपण पाहिला च आहे. दिनकर हि तें च सांगत आहेत :

श्री राम जय राम जय जय राम ।
नित्य स्मरणाचा हा चि असावा नेम ।
यावांचूनि सकळ मिथ्या श्रम ।
वायांविण करूं नये ॥ स्वा. दि. १५-५-५०

श्रीरामें विषबाधेसी हरिलें । श्रीरामें उदकीं पाषाण तारिले ।
श्रीरामें जड जीव उद्धरिले । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६४

श्रीरामें वेद पावन केले । श्रीरामें देव सोडविले ।
श्रीरामें स्वधर्मासी रक्षिलें । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६५

श्रीरामें अहिल्या उद्धरिली । श्रीरामें सीता वरिली ।
श्रीरामें गणिका तारिली । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६६

श्रीरामें ध्रुवासी अढळ स्थापिलें ।
श्रीरामें गजेंद्रनक्रासी सोडविलें ।
श्रीरामें अजामिळासी उद्धरिलें ।
उघडा मंत्र श्रीराम ॥ ६७

श्रीरामें ऱ्हीस वानर तारिले ।
श्रीरामें महापापी पावन केले ।

श्रीरामें अनेक भक्त उद्धरिले ।
उघडा मंत्र श्रीराम ॥ ६८

(१९) धर्मकारणाचें शेवटचें लक्षण विमळ ज्ञान. त्या विमळ ज्ञानानें हे दोन्ही ग्रंथ व्यापलेले आहेत. त्या दोहोंतून प्रत्यंतरासाठीं एक एक उतारा घेऊन आपण पुढें चालूं लागूं.

तें तूं ब्रह्म शुद्ध बुद्ध नित्य निरंजन । जें मायाअविद्यादिमळविहीन ।
पूर्ण चैतन्य जें स्वसंवेद्य सनातन । निर्गुण निर्विकार ॥ स्वा. दि. ८-३-३९

तेथ अहंब्रह्मरूप जें मुळीं स्फुरण । विवर्तरूपें मूळमायेचें अधिष्ठान ।
तीमाजीं बिंबलें तें शबळब्रह्म परिछिन्न । ईश्वरस्वरूप ॥ ४०

तो ईश्वर निजमायेतें अधिष्ठूनि । प्रसवला पंचभूतीं आणि त्रिगुणीं ।
पुढें अष्टधा प्रकृति कार्यकारणीं । निजांशें तेथें प्रतिबिंबला ॥ ४१

त्यासी शुद्ध त्वंपदार्थ बोलिजे । तो प्रकृतिसंगें शबळत्व आपजे ।
जेवीं घटमठसंगें आकाशीं नाम आरोपिजे । घटाकाशमठाकाशत्वें ॥ ४२

तेवीं ईश्वरांश केवळ प्रकृतिसंगें । शबळत्वें जीवपण अवगे ।
मग अविद्येसी रातोनि निजांगें । मीमाझेंपणें भुलोनि ॥ ४३

मग आपुलें मुळीचें जें ईश्वरपण । तें विसरोनि देखे प्रपंचस्वप्न ।
संकल्पविकल्पीं भरोनि मन । मीमाझेंपणें वरळतसे ॥ ४४

मी येक सर्वगुणसंपन्न । माझें देह गेह दारा धन ।
ऐसा वोसणाव तवं थापटून । सावध केला श्रीगुरूनें ॥ ४५

अरे रे प्राणिया सावध होईं ।
तूं कोण आहेसी बरळसी काईं ।
अहं ब्रह्म निजस्मरणाचिया सोईं ।
सावध होईं कां सत्वर ॥ ४६

तवं शिष्य चमत्कारोनि म्हणे स्वामीप्रति ।
जी मी कोण असे मुळींचा निश्चितीं ।
आणि मध्यें चि काय देखतसे हे व्यक्ति । भांबावलेंपणें ॥ ५०

ऐसें शिष्य अज्ञानपणें बोलतां ।
श्रीगुरूनें मस्तकीं हस्त ठेऊनि तत्त्वता ।

संप्रदायशुद्ध ज्ञान शोधूनि वेदांता ।
महावाक्येंसीं निरोपिलें ॥ ५१

तें महावाक्य म्हणजे ' अहं ब्रह्मास्मि ' हें आपण पाहिलें च आहे. हा च श्रीसमर्थांचा स्वरूपसंप्रदाय. स्वरूपसंप्रदायाचा अर्थ, देव आणि आपण एक च. श्रीसमर्थांपासून स्वतःस झालेला हा च बोध, मेरुस्वामींचें निर्मल हृदय पाहून, अनंतमौनी मेरुस्वामीस करीत आहेत :

अरे प्रबोधासि कारण । जाण येक अंतःकरण ।
स्वरूपसाक्षात्कार ज्ञान । तें चि तें होये ॥ सो. ४-२-४१

स्वरूपाचें दृढ अभ्यंतर । स्वरूपवस्ती निरंतर ।
निर्गुण स्वयें निर्विकार । प्रतिष्ठा अंतःकरणीं ॥ ४२

निर्मळ निश्चळ निराकार । येकजिनसी अपरंपार ।
नाहीं जयासी पारावार । आधीं तें चि पाहावें ॥ ४३

अंतरात्मा ज्ञानघन । तयाचें रहिवासस्थान ।
दशदिशा संपूर्ण । व्यापकपणें ॥ ४४

हे स्वरूपधारणा जीवीं । ज्ञानखेचरी प्रतिष्ठावी ।
ब्रह्मारण्यीं वसवावी । अनुभवगुंफा ॥ ४५

चिद्गगन सरोवरजीवन । निजदृष्टीं वदनें कीजे पान ।
अभिनव सत्रावीचें दोहन । घोटिजेत सुखें ॥ ४६

स्वरूपार्णवीं मनमीन । स्वानंदाचा तळ घेऊन ।
राहावें स्वसुखीं निमग्न । सर्वदा ऐसें ॥ ४७

हे चि स्वानुभवाची निज खूण । माझा अंतर्भाव चि जाण ।
तुज प्रबोधासी कारण । येणें चि जाहलें ॥ ४८

अमळ तुझें हृदय । जाणोनि द्रवला बोध स्वयें ।
मज नाटोपतां माझें प्रमेय । तुज आधीन जालें ॥ ४९

याप्रमाणें श्रीसमर्थांचें विमळ ज्ञान आहे. त्याची थोरवी काय सांगावी ? त्या ज्ञानांत मळाचा लवलेश नाहीं. तें निर्मल, शुद्ध आहे, ही गोष्ट मेरुस्वामी पुढील ओव्यांत किती अभिमानानें सांगत आहेत, पहा.

**ज्ञानामाजी माया खळमळ। ते अकळ चि बुडवी तात्काळ।**
**माझ्या समर्थांचें ज्ञान प्रांजळ। लेश न साहे वृत्तीचा॥** रा. सो.११-११-३८

**सकळ अवेवीं वदन। होय वोळखीचें अधिष्ठान।**
**लावण्यशोभेचें संपूर्ण। निधान होय॥ ३९**

**जेणें वोळखी सकळ शरीरीं। मुखश्री शोभा साजिरी।**
**तैसें समस्त सृष्टिमाझारी। समर्थज्ञान निर्मळ॥ ४०**

**सकळ इंद्रियांत नयन। इंद्रियें बापुडीं तेणेंवीण।**
**तैसें अतींद्रिय ज्ञान। निर्मळ सहजें॥ ४१**

(२०) प्रत्यंतराचा शोध घेत असतां मला कल्याणांचें स्मरण नव्हतें, असें नाहीं. त्यांचें मला सतत स्मरण होत असतें, पण त्यांचा स्वतंत्र असा एकादा ग्रंथ नाहीं. त्यांची स्फुट कविता विपुल आहे. ती मीं पाहिली आहे. ‘ संपूर्ण कल्याण ’ या नांवाखालीं ती लवकर च प्रकाशांत येण्याच्या मार्गावर आहे. तींतून मी येथें आपल्या कार्यापुरतें एक च पद उद्धृत करून घेतों. त्यांत कल्याणस्वामी श्रीसमर्थांचें स्तवन करीत आहेत. पण त्या स्तवनांत हि पूर्व तयारीचा आणि धर्मकारणाच्या पंचविध लक्षणांचा उल्लेख झालेला आहे, हें वाचकांच्या सहज च लक्षांत येईल. ही च आपल्या कल्पनेला कल्याणांची संमति होय.

## पद २२ वें

**तो चि तो साधव रे। सखया, बोधक माधव रे॥ ध्रु०**
**प्रपंच लटिका निर्फळ दावी। सर्व भूतांतर अंतर भावी॥ १**
**स्वधर्मकर्मीं शुद्ध क्रिया करी। भूतकृपाघन दीनास तारी॥ २**
**ब्रह्मचर्यव्रत निस्पृहधारी। ब्रह्मस्थितिवर भिक्षाहारी॥ ३**
**शांति छत्रपतिनिशाण फडके। उत्तम कीर्ति दुंदुभि धडके॥ ४**
**मर्दुनि षड्रिपु भजनविलासी। सुखरूप भवभय कल्याणरासी॥ ५**

दुसऱ्या एका पदांतील एका कडव्यांत ते श्रीसमर्थांचें वर्णन करितात—

**ज्ञान वैराग्य भजन। स्वधर्मरक्षण।**
**म्हणोनी अवतारी जाण। योगमूर्ति॥**

यांत पांचापैकीं चार लक्षणांचा उल्लेख स्पष्ट च आहे. स्वधर्मरक्षणांत ब्राह्मण्य-रक्षण आलें आणि

**भेटो कोणी येक नर धेड माहार चांभार ।**
**त्याचें राखावें अंतर याचें नांव भजन ॥** क. २१५–९

या भजनाच्या व्याख्येप्रमाणें भजन आणि उपासना हीं एक च. सद्गुरुवर्णनांत गुरुपरंपरेचें लक्षण अध्याहृत धरण्यास हरकत नाहीं. तात्पर्य, या एका कडव्यांत हि पांच हि लक्षणांचा उल्लेख झालेला आहे, असें म्हणतां येईल.

उद्धव, बालकराम, आण्णाप्पा, भीमस्वामी, रोकडाराम, हरिहर इत्यादिकांच्या अप्रकाशित काव्यांतून संमतिवचनें देण्याचा हेतु होता, पण तो आतां भावी काळावर सोंपवितों. आपली खात्री आहे कीं, श्रीसमर्थांच्या शाळेंत परंपरेनें शिक्षण घेतलेल्या या व इतर सर्व शिष्यप्रशिष्यांचे विचार एकसारखे च असणार. जेवढीं संमतिवचनें येथवर दिलीं गेलीं तेवढीं, आपली विचारसरणी बरोबर आहे, हें ठरविण्यास पुरेशीं आहेत.

(२१) येथवर आपण ज्याप्रमाणें संप्रदायाच्या पंचलक्षणात्मक धर्म–कारण अंगाला शिष्यप्रशिष्यांचीं प्रत्यंतरवचनें पाहिलीं, त्याप्रमाणें संप्रदायाचें जें दुसरें राजकारणाचें अंग त्याला कांहीं प्रत्यंतर आढळतें काय? श्रीसमर्थांच्या वाङ्मयांत राजकारणाची जशी शिकवण आढळते, तशी ती नंतरच्या सांप्रदायिक ग्रन्थांत आढळत नाहीं व माझ्या समजुतीप्रमाणें आढळण्याचें कारण हि नाहीं. या तुमच्या आमच्या व्यवहाराच्या मानानें परमार्थाची महती किती तरी पटीनें विशेष आहे, हा विचार मनांत आला, म्हणजे श्रीसमर्थांच्या शिष्यप्रशिष्यांच्या ग्रन्थांत राजकारणपर भाग आढळूं नये, याचें नवल वाटत नाहीं. ग्रन्थराज दासबोधानंतर श्रीसमर्थसंप्रदायांत जे जे ग्रन्थ निर्माण झाले त्या सर्वांचें उगमस्थान श्रीमत् दासबोध होय. तो ग्रन्थराज अखंड हृदयाशीं बाळगणाऱ्या शिष्यप्रशिष्यांना त्यांतील राजकारणपर शिकवण दिसली नसेल काय? पण आज आपण त्या राजकारणपर भागावर जसे लुब्ध झालों आहोंत, तसें कल्याणदिनकरादि शिष्यांना व मेरुगिरिधरादि प्रशिष्यांना लुब्ध होण्याचें कारण च उरलें नव्हतें. श्रीसमर्थशिष्यांपैकीं प्रत्यक्ष राजकारण करणारे राजकारण करीत च होते. इतरांनीं त्यांत प्रसंगानुसार पडावयाचें असतें.

श्रीसमर्थांच्या पश्चात् तसा प्रसंग उरला नव्हता. श्रीसमर्थांच्या हयातींत च त्यांचें राजकारण फलद्रूप होऊन धर्मरक्षणार्थ देवाब्राह्मणांच्या राज्याची स्थापना झाली होती. तथापि, केव्हां हि प्रसंग पडला म्हणजे सांप्रदायिकांनीं राजकारण करणें वावगें नव्हे. प्रसंगानुसार राजकारण करणें—विशेषतः धर्मरक्षणार्थ राजकारण करणें—हें या संप्रदायाचें एक प्रमुख अंग आहे, हें सांप्रदायिकांनीं विसरतां कामा नये. सांप्रदायिकांनीं अखंड सावधानता ठेवावयाची असते.

**देश काल वर्तमान । सर्व हि अवेवधान ।**
**कोणतें विधी विधान । सावधान सावधान ॥**

---

[ ३ ]

# काल—आज—उद्यां

म्हणजे

# तेव्हां—आतां—पुढें

( १ ) संप्रदायाचें तेव्हांचें स्वरूप

( २ ) संप्रदायाचें आतांचें स्वरूप

( ३ ) संप्रदायाचें पुढचें स्वरूप

ग्रन्थाचा शेवट

## ( १ ) संप्रदायाचें तेव्हांचें स्वरूप

( १ ) इतिहासाचा गुण—( २ ) श्रीसमर्थांच्या गुणांवर जनता लुब्ध झाली होती—( ३ ) श्रीसमर्थांचा सर्वत्र संचार—( ४ ) त्यांचा अगणित शिष्यसमुदाय—( ५ ) समर्थांनीं आपल्या पुढच्या अकरा पिढ्या पाहिल्या होत्या—( ६ ) गुरुभक्तमहंतरत्नमाळा—( ७ ) महंती सुखाची नसे—( ८ ) समर्थांची शिस्त कडक असे, पण ते प्रसंगीं जितके कठोर तितके च एरव्हीं कोमळ मनाचे होते—( ९ ) शरीरानें नव्हे तर मनानें त्या काळांत जाऊन पडावें—( १० ) गुरुशिष्यांची एकात्मता—( ११ ) श्रीसमर्थांनीं आपल्या शिष्यांची काळजी करावी, तेव्हां केली आणि अद्यापि हि करतात—( १२ ) संचारार्थ गेलेल्या शिष्यांच्या कामाची तपासणी करून वृत्तान्त निवेदन करण्याच्या कामावर कल्याणांची नेमणूक—( १३ ) मठांतून लेखनक्रिया अखंड चाले—( १४ ) संप्रदायाचें स्पृहणीय स्वरूप.

**अभिनव समर्थांची लीला । जिहीं प्रत्यक्ष पाहिली डोळां ।**
**कृतार्थ ते जन, सोहळा । देखिला समर्थांचा ॥** रा. सो. १-९-५९

( १ ) स्वदेशाच्या इतिहासाचा हा गुण च आहे. राजकारणांत असो कीं धर्मकारणांत असो, गाजलेल्या थोर पूर्वजांचें पडल्या काळांत स्मरण झालें म्हणजे जीव कासावीस व्हावा व आपण त्यांच्या वेळीं नव्हतों म्हणून मन उतावीळ होऊन कष्टी व्हावें, हें अगदीं स्वाभाविक आहे. अशा स्थितींत, ज्याची आपणांस प्रत्यक्ष माहिती नसते, त्याचें चित्र, तत्कालीन ग्रन्थाधारें मनानें च रंगवून त्यांत आनंद मानावा लागतो. मजवर आज तसा प्रसंग आला आहे. श्रीसमर्थांच्या वेळीं प्रवर्तित झालेल्या या संप्रदायाची कशी स्थिति होती, तिचें चित्र मला रेखाटावयाचें आहे. माझ्या मनांत जें चित्र उभें राहत आहे, तें सर्वच्या सर्व मला शब्दांत व्यक्त करतां येईल, असें मला वाटत नाहीं. माझ्या मनाबरोबर धांव घेईल, इतकें सामर्थ्य माझ्या लेखणींत नाहीं. त्यामुळें मी येथें शब्दांनीं जें चित्र काढून दाखविणार आहें, त्याहून मूळ चित्र शतपट मनोरम होतें, असें आपण कृपा करून समजून चाला व मग आपण च

आपल्या मनानें, मी रंगवीत असलेल्या चित्रांतील उणीव भरून काढा. नाहीं तरी त्या काळची पूर्ण कल्पना आज कोण करूं शकणार आहे ? ज्या काळीं संप्रदायप्रवर्तक श्रीसमर्थ च प्रत्यक्ष लोकांपुढें आदर्श म्हणून उभे होते, त्या वेळचें संप्रदायाचें यथार्थ स्वरूप वर्णन करून सांगण्याचें सामर्थ्य आज कोणांत आहे ? तुम्ही आम्ही सर्वांनीं मिळून प्रयत्न करावयाचा आहे.

(२) अगदीं पहिला विचार मनांत येतो तो हा कीं, या महापुरुषाचें बाळपणापासूनचें सारें चरित्र ऐकून च लोकांचीं मनें त्यांच्याकडे कौतुकानें आदरानें आणि आशेनें वळलीं असलीं पाहिजेत. फार काय, आज हि मनांत आणून पहा, वयाच्या बाराव्या वर्षी च जिवलगांचा संग सोडून दूर झालेला मुलगा, पुढें बारा वर्षें पुरश्चरण आणि बारा वर्षें तीर्थाटण करून परमेश्वराची कृपा संपादन केलेला पुरुष

राघवाचा वर पावलों सत्वर ।
जनाचा उद्धार करावया ॥
येणें काळें मोक्ष जरी मी देईना ।
दास म्हणवीना राघवाचा ॥

अशी प्रतिज्ञा करीत पुढें आला, तर स्वातंत्र्यासाठीं तळमळणारी महाराष्ट्रांतील सारी जनता त्याच्या भोंवतीं गोळा झाल्यावांचून राहील का ? तसें त्यावेळीं घडलें असलें पाहिजे, असें मानण्याला कांहींच प्रत्यवाय नाहीं. याला प्रत्यंतर कशास पाहिजे ? मेरुस्वामी आपल्या प्रभावी भाषेंत सांगतात—

निरवधिसुखें चिदंबर । वर्षों लागला धाराधर ।
अमृतघन निरंतर । समर्थहृदय ॥ रा. सो. १–८–३
पिसाटदशा अनिवार । आंगीं महद्भूतसंचार ।
प्रवृत्तिजनाचे संभार । पाठीं लागती ॥ ४
संपूर्ण वेड तें लागलें । जगद्दृष्टीस आश्चर्य वाटलें ।
एकासि अवचट वेधें केलें । तैसें चि पिसाट ॥ ५
भवधुळीचा धुळारा । पोरें टाकिती ते सैरा ।
पळती पाठोपाठीं त्वरा । धांवती मोकाट ॥ ६
परमानंदघनकाया । कांहीं उपचार नसोनियां ।
जैंवि अमृतपान करूनियां । तेज आंगासि ये ॥ ७

तैसे परीं आंगीं वर्चस। ब्रह्मानंदेंसी दीक्षा उदास।
मुखीं हर हर हर घोष। सर्वदां उठे ॥ ८ ॥

जय जय जय रघुवीर। भवविजयरणधीर।
अहंरिपुदशकंधर। निर्जीत महावीरा ॥ ९

यादवा रामा माधवा रामा। संसारसागरीं तारि गा आह्मा।
या चि निजध्यासें प्रेमा। अखंडीत कीर्तनीं ॥ १०

महाउन्माद विरक्तिभरें। असतां कीर्तनीं रामनिर्धारें।
परंपरेसी अत्यादरें। राघव प्रत्यक्ष ॥ ११

कीर्तन करितां नदीतीरीं। संपूर्णजनसंभारीं।
पाहातां दुरुनि दृष्टीभरी। रामरूप दिसती ॥ १२

शाहापुरनगरामाझारीं। योग अनुष्ठानें अधिकारी।
नगरीचा प्रभू निर्धारीं। आला समर्थांसमीप ॥ १३

पाहे तव प्रत्यक्ष श्रीराम। आकृतीनें चि वेधिला परम।
विशेष दीक्षा निरूपम। आश्चर्य पावला ॥ १४

अखंडदंडायमान सृष्टी। पायीं जाऊनि घातली मिठी।
म्हणे त्राहें त्राहें कृपादृष्टी। पाहें मज समर्था ॥ १५

सद्भाववज्रमिठी सत्व। दयेनें द्रवले हृदयसाक्षत्व।
परमानंदें तें परतत्व। बोळलें सुख ॥ १६

समर्थ कृपेनें उदार। माथां ठेऊनि पद्मकर।
म्हणती उठ आतां अभ्यंतर। प्राकट करीं ॥ १७

पुन्हा अभय घेऊनि पुरतें। प्रार्थिता होय भावार्थें।
म्हणे गृहासि येऊनि समर्थें। कीजे मज सनाथ ॥ १८

विनयसप्रेमभक्तीनें। करीं धरूनियां प्रीतीनें।
गृहासि आणिलें आवडीनें। मांडिलें अर्चन ॥ १९

जनप्रवृत्तीचा न पडे वारा। ऐसा अरण्यवास संचारा।
नावडे चि प्रवृत्ती अंतरा। उठोन पळती ॥ २०

जैसीं कस्तुरीमृगें सुसीळ। वसती अरण्यप्रदेशीं निर्मळ।
तयासि जनसहवासमळ। प्राणांत होय ॥ २१

अरण्यवासी विहंगम। करूनि उपचार परम।
ठेवतां सदनीं सप्रेमें। जन्मभूमिका इछिती ॥ २२

तेविं त्या जनसहवासें । अतिसंकोचित मानसें ।
मायामयदृश्यातीत वसे । लक्ष्य ब्रह्मारण्यीं ॥ २३

प्रथम कमळाकर भावें । शक्तीसह कृतार्था जिवें ।
होऊनियां अंतर्भावें । समर्थ आर्जविला ॥ २४

प्रपंचाची तडाफोडी । फोडिती संग्रह उतरडी ।
चित्तासि विक्षेपाची रूढी । निघूनि जावया ॥ २५

तितुकी घसणी साहोनि । नित्य नवा आनंद मनीं ।
पंचप्राण कुर्वाळुनि । टाकिलें जिहीं ॥ २६

तेथें काय असेल प्रपंचआस । तरी च जोडले समर्थ त्यास ।
लाधले जो सहवास । ब्रह्मादिकांसी दुर्लभ तो ॥ २७

त्या चि द्वारें परंपरा । घराणीं जाली येकसरा ।
बोध चालिला ग्रामांतरा । विख्यातीनें ॥ २८

ग्रामाचीं ग्रामें संपूर्ण । उपदेश मालिका महाजन ।
बोधमंडळवृद्वीनें घन । मंडळें चि मंडळें होती ॥ २९

( ३ ) जगदुद्धारार्थ श्रीसमर्थांचें परिभ्रमण देशाबाहेर हि झालें होतें कीं काय, निश्चित सांगतां येत नाहीं, पण देशांतल्या देशांत मात्र सर्वभर झालें होतें. ब्राह्मणु हिंडतां बरा । असें त्यांचें सांगणें असे. श्रीसमर्थवाग्देवता-मंदिरांतील बाडांक ६१८ त

काशी कांती कोल्हापुर । काश्मीर कुशावर्त काउर ।
कानड कर्नाटक कंदार । कनकी लंका ॥

अशा आरंभाचें ६० ओव्यांचें एक प्रकरण व

अयोध्या काशी कोल्हापुर । मथुरा दिल्ली मातापुर ।
द्वारावती बुऱ्हाणपुर । बंकापुर ॥

अशा आरंभाचें ७९ ओव्यांचें दुसरें प्रकरण, अशीं दोन महत्त्वाचीं प्रकरणें आहेत. तीं अजून अप्रकाशित आहेत. त्यांत गांवांचीं नुसतीं नांवें आहेत, दुसरें कांहीं नाहीं. या प्रकरणांचा हेतु काय, तो मला अजून निश्चित करतां आला नाहीं. इतक्या गांवीं त्यांचें स्वतःचें जाणें झालें होतें, का या सर्व गांवीं त्यांनीं मठ स्थापिले होते, यांचा मला अद्यापि निर्णय होत नाहीं. मी असें मानतों कीं, या सर्व गांवीं त्यांचें जाणें झालें असावें व मेरुस्वामी म्हणतात

त्याप्रमाणें हीं 'ग्रामाचीं ग्रामें संपूर्ण' त्यांचीं अंकित झालीं असावींत. शेवटचीं पांच सहा वर्षें ते गडावर काय सारखे राहिले असतील तेवढें च, बाकी त्यांचा सर्व काळ जगाच्या कल्याणाची चिंता करीत सर्वत्र हिंडण्यांत गेला असावा.

या दोन्ही प्रकरणांतील गांवें वर्णानुक्रमानें येथें देण्याचा माझा विचार आहे. हेतु हा कीं, श्रीसमर्थांचा संचार कसा सर्वत्र होता तो लक्षांत येऊन या सर्व ठिकाणीं कोणी तरी संशोधन करावें व श्रीसमर्थांची कांहीं साक्ष आढळते कीं काय याचा शोध घ्यावा. मला या सर्व गांवांचीं नांवें ठाऊक नसल्यामुळें माझ्या वाचण्यांत चुक्या झाल्या असतील. त्या त्या गांवच्या वाचकांनीं त्या सुधारून मला कळविण्याची कृपा करावी :

अ – अजरें, अडकी, अथणी, अनंतसेन, अबिठें, अमणापुर, अरग, अमनबावि, अम्हदानगर, अम्हदाबाद, अरग, अरळे, अरटगी, अरुणाचळ, अर्धापुर, अलम, अवड, अवठें, अष्टमी, अष्टी, अष्टीतें, अष्टें, असलें, अळजापुर, अळसद, अंदुरे, अंबर, अंबरचिंते, अंबवडे, अंबे, अंब्रापुर – आ – आदवानी, आधार, आमापेठ, आयोध्या, आरणी, आलें, आलंपुर, आसनगांउ, आसेगांव – ई – ईंग, ईंगळी, ईंगार, ईंट, ईंडी, ईंदापुर, ईंदी, ईंदुर, ईंदेवाडी, ईंदोली, ईमामपुर – उ – उजनी, उठकुर, उंठमेट, उडपी, उदगांव, उदगिरी, उंदीर, उबरें, उरुलवाहे – ऐ – ऐनापुर – औ – औंढे, औंद, औसें – क – कटकालवे, कटापुर, कडप, कडवाळ, कडवे, कडळुर, कडुर, कडुस, कडे, कडेगांव, कडेचुर, कडेपुर, कर्डें, कणदर, कणेकल, कण्हेरी, कण्हेरें, कनकगिरी, कनकाळे, कनकीलंका, कनकेश्वर, कनड, कनदखोरें, कन्याकुमारी, कपिल, कपिली, कपिलेश्वर, करमक, कर्कें, कर्नुळ, करमाळे, करंजें, करंदी, कर्नाटक, कऱ्हाड, कलघाटगी, कलबुरगें, कलाढोण, कलिकारंजे, कलें, कल्याण, कवलापुर, कविठें, कवि, कळघंटकी, कळंबी, काउर, काकेकल्हें, कागल, कामवाड, कानड, कापसी, कानकुर्ति, कानवडें, कामठी, कारटगी, कारवें, कारीनारी, कोरेळें, कालवडे, कालाली, कालें, काश्मीर, काशी, कासीबाचा, कासेगांव, काळगांव, काळभींति, काळुखुर, काळेगांव, काळेनदी, काळेश्वर, किणगांव, किण्ही, किरोली, कीर, कितुर, किवळ, कुकनुर, कुकवाडे, कुकुडवाडे, कुडगांव, कुडल, कुडाल, कुणकी, कुणकेश्वर, कुंदगोळ, कुर्दवडे, कुमठें, कुरलें, कुरुंडवाडें, कुरोली, कुष्टगी, कुशतर्पण,

कुशावर्त, कुसुर, केकारी, केम, केर, केरूर, केशापुर, केळ, केळवडगांव, केळोली, कोकिसरें, कोकुमठाणे, कोठाळें, कोडोली, कोढये, कोणुर, कोतिज, कोथळी, कोथुळ, कोरटी, कोरेगांव, कोल्हापुर, कोल्हार, कोळें, कौलापुर, कंकराळें, कंदार, कांटी, कांती, कांसीळ, किंवळ, कुंभकोन, कुंभारगांव, कुंभारली, कुंभारी, कुंदर्पी, केंदर, केसापुर, केसे, कोपर्डे–ख–खटाउ, खडकवाडी, खडकी, खडकें, खडसी, खंडाळे, खंदार, खमाम, खंबाईत, खरपुडी, खरसी, खरसोंडी, खराडी, खराडें, खवासपुर, खळें, खाडेपार, खांडोवन, खानगांव, खानापुर, खांबगांव, खांबाळें, खारेपटण, खिरसी, खुंटे, खुदावंतपुर, खुंबी, खुरसी, खेड, खेडलें, खेरावर, खोडद, खोंकर, खोडसी, खोलापुर–ग–गंगासागर, गजनी, गंजीकोठ, गदग, गलगलें, गळनिंब, गव्हाण, गाजरपेठ, गांडापुर, गारवडे, गीडगांव, गीरें, गुंज, गुंजोटी, गुळवरी, गोकर्ण, गोकाक, गोकुळ, गोजेगांव, गोडाळ, गोंदवलें, गोंदी, गोंदें, गोंधळ, गोपुरगोपुंज, गोबुर, गोरटगांव, गोरेगांव, गोलकुंडे, गोलडगांव, गोलरहटी, गोवर्धन, गोवें, गोळेगांव, गौरगाउ –घ– घामरगांव, घागरी, घाणेगांव, घाणेसांगवी, घाणोली, घारगांव, घारें, घावणोली, घुणकी, घुंगोरी, घुंघुरवाडें, घुष्मेश्वर, घुसेगांव घेवडगांव, घोगांव, घोंगटवाडी, घोट, घोंटी, घोडें, घोणसी, घोरपडे, घोराडे, घोसापुरी, घोसाळें, घोसे, घोसोळी –च– चंचेगांव, चंडिकपटण, चंदारी, चंदी, चंदाउर, चंदगडे, चंद्रगुति, चंद्रागिरी, चरेगांव, चरोंज, चवणेश्वर, चाकण, चांगटपुरी, चांगसुरी, चांगमामा, चाटोरी, चादगडे, चांदवड, चांदारी, चांदे, चाफळ, चारवें, चिखलठाणें, चिखलवाड, चिखली, चिंचवाड, चिंचोली, चिचोर, चिटकनहळी, चिटगोपें, चितळी, चिंतापुर, चिंतांबर, चिंचगांव, चिंचणी, चिंचणेरे, चिंचपोरे, चिंचारे, चिपोळण, चिमणगांव, चिमणचारें, चिमणापुर, चिमणें, चेंचडें, चेंडल, चेनपट्टण, चेनुर, चोढोळें, चोरें, चौक –ज– जखीणवाडी, जयनाबाज, जलालपुर, जवळगांव, जवळे, जळगांव, जाउली, जाखणगांव, जाखलें, जाफराबाज, जाफळे, जांब, जांबी, जांबखेड, जांबगांव, जांबुळपुरी, जांभेरी, जार्यगांव, जालेहाळ, जाल्हनापुर, जावळी, जीवनपुर, जुनर, जेउरी, जेउव, जेजुरी, जेहें, जैतापुर, जैनापुर, जोहरापुर, ज्वाळामुखी –झ– झाठ्यापुर, झाडें, झाडोली, झाडोसी, झांजेवाडी, झांटोळी, झिरले, झींजोळी, झुरळगांव, झुरळें –ट– टकेगांव, टमके, टाकळी, टांकणवाडी, टांके, टालगांव, टाळी, टिकळी, टिमणगांव–ठ–ठाकें, ठाणें,

ठाणेगांव, ठिकरी, ठुणें, ठोके, ठोकेवाडी, ठोंबरगांव, ठोंबरवाडें, ठोंबसवाडी –ड–डफळापुर, डांकिणवाडी, डांग, डांगवी, डांगार, डामरगांव, डासाळे, डोबार, डोंबगांव–ढ–ढाणी, ढीमणगांव, ढोकळें, ढोंकी, ढोंकें, ढोंगी, ढोणी, ढोणें, ढोबळगांव, ढोमणगांव, ढोंसी–त–तढेगांव, तडकोड, तडबीड, तडवळें, तडवाळें, तडसर, तपा, तमापुर, तरसें, ताकारी, तांतांजन, ताथवडे, तांदुळवाडी, तानकवाडी, तांबवे, तांबसोळे, तांबाळे, तांबगांव, तांबी, तांबुळवाडी, तामसवाडी, तारगाउ, तारलें, तारापुर, तावर, तासगांव, तासवडे, ताळपत्री, ताळभनु, तिकोंडी, तिकोटें, तिमाळे, तिरसिंगी, तिसगांव, तुपारी, तुमकुर, तुळजापुर, तेरदळ, तेलवरी, तेरगल्ल, तोरणगांव, त्रिनामल, त्रिपति, त्रिमल, त्र्यंबक–थ–थानापुर, थानेगांव, थानेवाडी, थांबगांव, थारगांव, थेरगांव, थेरवाड–द–दंडा, दाढेगांव, दाणवली, दादेगांव, दादोली, दाभोळ, दिगसाळ, दिगी, दिघोळ, दिडोरली, दिंडोरी, दिल्ली, दिवें, दुदगी, दुधारी, दुसेरें, देगांव, देवगड, देवरकुंडे, देवळगांव, देवळोलि, देहगांव, दौलतपुर, द्वारावती–ध–धर्मराज, धर्मापुर, धांदरफळ, धामणगांउ, धामणवाडी, धाये, धारणगांव, धारवाड, धारागिरी, धाराशीव, धारासिंह, धारूर, धावडवाडी, धावडसी, धुकटवाडी, धोवेडें,–न–नगरसुलप, नडसी, नरगुंद, नरसापुर, नरसीपुर, नरिंपुर, नवरसपुर, नवलगुंद, नळदुर्ग, नागझरी, नागांव, नागेवाडी, नागोडे, नागोली, नागोठणे, नाडोली, नाणेमावळ, नातेपुते, नानकपुर, नानोली, नांदगिरी, नांदुर, नांदेड, नांदोसी, नायगांव, नारवाडें, नारवें, नारायणगांव, नारायणपेठ, नाशिक, निकुंत्रळा, निगडी, निजामपुर, निठुर, निडगुंद, निपाणी, निंबगांव, निंबसोड, निंबगोवें, निंबी, निरवाडें, निळंगें, निवासे, नुनें, नुली, नेबापुर, नेर, नेरल, नेवरगांव, नेवरी, नेसरी –प– पटण, पडतुर, पंढरपुर, पणवेली, पनकवाडी, पन्नाळे, परबणी, परखंदी, परडगांव, परडें, परंडें, परशरामक्षेत्र, परळगांव, परळी, पळसदेव, पळसिं, पळसे, पक्षतीर्थ, पांचवाड, पांचेगांव, पाटेफळ, पाठगांउ, पाठण, पाठेश्वर, पांगरे, पांगेरी, पांगोरी, पाथर, पाथरी, पाथरवालें, पानगांव, पांपडें, पाबळ, पारडी, पारगांउ, पारनेर, पारपिपरी, पालि, पावनगड, पाळी, पिंगोरी, पिंपरी, पिंपवडे, पिंपळगांउ, पिपळनेर, पिसा, पिसाउर, पुगांव, पुणें, पुणतांबे, पेंठ, पेण, पेंबर, पेरूर, पैठण, पोखरणी, पोखरी, पोखलें, पोतलें, पोह्ळ, पोळेगांव, प्रयाग–फ–फणसें, फणसापुर, फरडगांव, फरडें, फलटण, फळणी, फळणें, फारोळे, फासुरलें,

फांसोळें, फिरंगापुर, फुल्लंबरी, फोंडे–ब–बंकापुर, बदनुर, बदिलोज, बदें, बनवडी, बनवाड, बनशंकरी, बनोडी, बलख, बह्मापटण, बाणलिंग, बाणाउर, बाद, बादामी, बाबरगांव, बाबरवाडी, बाबुळगांव, बाबुलवाडी, बारसी, बाळापुर, बिचुत, बीजनहळि, बीड, बीदनुर, बीबवी, बीळसी, बुध, बुऱ्हाणपुर, बुऱ्हाणनगर, बेगमपुर, बेदर, बेरग, बेलवडें, बेलापुर, बेलुर, बेलें, बेलेश्वर, बोदन, बोरड, बोरखेड, बोरगांउ, बोरी, ब्रह्मगिरी–भ–भडगांव, भडोच, भद्रेश्वर, भरडें, भरथगांव, भागानगर, भागेवाडी, भाडळें, भातोडी, भारगांव, भालकी, भालगांव, भालणी, भिकापुर, भिकेवाडी, भिंगार, भिंगोरी, भीडें, भीमशंकर, भीरंडगांव, भीलवडी, भीवंडी, भीसी, भुम, भुलेश्वर, भेडसगांव, भेंडाळे, भेजापुर, भोवलेश्वर, भोगांव, भोंदगिरी, भोर, भोरफ, भोसी, भोंसे –म– मंगळवेढें, मछलिपट्टण, मठुर, मढी, मणुर, मथुरा, मनपाडळे, मनसोळी, मरड, मरढें, मरळी, मलकापुर, मलवडी, मल्लिकार्जुन, मसुर, महीगांव, मळकळ, मांगले, माजलगांउ, मांडेहाळ, मांडोगण, मांजरी, मातापुर, मानेहाळ, माभळेश्वर, मायगांव, मायणी, मायेनहळि, मारडी, मावगळुर, माशाळ, मासेगांव, माहागांव, माहाड, माहासु, माहुर, माहुली, माहेगांव, माळवाडी, मीरज, मुंगी, मुगांव, मुठेखोरें, मुदगल, मुधोळ, मुसेखोरें, मुळगुंद, मुळवाद, मुरबि, मुरें, मुर्ति, मुळपीट, मुंगसवाडी, मेकेमिरे, मेडोसी, मेढें, मेणगांव, मेदक, मेरुलिंग, मेहकर, मेहुरगांव, मोकें, मोयेनहळि, मोरगांउ, मोरगिरी, मोरेश्वर, मोषकी, मोहोगांव, मोहळवाडी, मौळतपा, म्हसें, म्हैसवड –य– यदलवाडी, यमुनगांव, याखुतपुर, यादवाड, यिंदनुर, येकोडी, येदलाबाज, येलेश्वर, येवलेश्वर, येवतेश्वर, येशवाडी, येसगांव, येसुर, योगवाडी –र–रटेहळि, रत्नागिरी, रहिमतपुर, रांगठाणें, राजपुरी, राजमहाल, राजापुर, रांझणगांव, रांझणी, रातांजन, रामडोहो, रामणगांव, रामलिंग, रामापुर, रामेश्वर, रायचुर, रायबाग, रायेर, रासाडी, रासापुर, राहातें, राहेरी, राळेभण, रीसवड, रुद्रेश्वर, रुवी, रूपनगडी, रूमशाम, रेमापुर, रेवणगांव, रेवदंडे, रेवापुर, रोसी, रोहीडखोरें–ल–लखमापुर, लवंगपुर, लाखेफळ, लाटें, लाबणगांव, लासुर, लासुरणें, लाहुर, लिंगापुर, लेंडीचौली, लेणें, लोणदपुर, लोणी, लोणें, लोणंद, लोण्हार, लोपामुद्रा, लोहोगांव, लौळगांव, लंका, लांगी, लांपसी, लांपी–व– वंजराबाज, वडगाउ, वडमान, वणी, वरखेड, वरणगांव, वळगानुर, वांई, वांकडी, वांकदरी, वांकी, वांकसी, वांगी, वागीनगीरें, वाघोली, वाघापुर, वाजेगांव, वाटगांव

वार्डे, वानवळे, वामोरी, वाराणसी, वारुण, वालगोडें, वालें, वावसी, वावळी, वावी, वांसार, वार्सिब, वांसी, वासोटा, वाळ्वे, विज्यापुर, विझणवाडे, विझोळे, विडप, विद्यानगर,विराटपुर, विसापुर, विसोरे , वीर, वृधाचळ, वृंदावन, वेंकडपाळें, वेर्डे, वेदगिरी, वेशपाळा, वेळापुर, वेळावी, वैजापुर, वोंडसे, वोतुर, वोहोर, वोहोळवारे —श—शकरापटण, शंखोधार, शाहागड, शाहापुर, शिरेपुर, शिवकांची, शिवगांव, शिवणे, शिवापुर, शुरपाल, श्रीगिरी, श्वेतबंधरामेश्वर—स—सगर, संगमनेर, सडुर, संपगांउ, सलबतपुर, संवछर, सळगांव, साकळगांव, सांकेवाडी, साख, सांगली, सागर, सांगोसी, साबणवाडी, सांबगांव, सांबरगांव, सायगांव, सारोळी, सात्ररखेड, सांवरगांव, सांवळी, सासवड, सांसवी, सिगणापुर, सिदनुर, सिंदखेड, सिध्येश्वर, सिनर, सिरगांउ, सिरटे, सिरवळ, सिरसफळ, सिरसगांव, सिराळे, सिरोळ, सिंवर्धन, सीतानगर, सीरवडें, सुगांव, सुदामपुर, सुपने, सुपें, सुब्रह्मणी, सुरज, सुरत, सुलप, सुवेळा, सुसुळ, सुळेगांव, सेडी, सेंडबळ, सेंडुरवाधे, सेणगांउ, सेंदुरजने, सेंबगांव, सेरें, सेवगांव, सेवतें, सेवरी, सोनपेठ, सोंदें, सोनारी, सोलापुर, सोळसी—ह—हंचोळी, हजनाबाज, हणमगांव, हणवंतवाडी, हतनुर, हनगल, हंसबावी, हर्चेरी, हरसुल, हराळी, हरिद्वार, हरीहर, हरेश्वर, हर्पनहळि, हसनाबाज, हस्तनापुर, हळदी, हळवे, हातगांव, हिंगणगांव, हिंगणी, हिडसखोरें, हिमकेदार, हिरडी, हिरापुर, हुकेरी, हुंबगांव, हुंबली, हुमणे, हेगांव, होर्डे, होनगुंद, होनापुर, होनेहळी, होलि, होसपेठ,

हीं गांवें एकंदर १०२९ भरतात. दुबार असतील तीं वगळून व चुकीचीं सोडून तीं हजारावर निर्विवाद आहेत. श्रीसमर्थांचा हा केवढा व्यापक संचार म्हणावा. आपण हि हल्लीं दौरे काढीत असतों, पण ते धांवत आणि उडत. काय त्यांचा उपयोग? श्रीसमर्थांच्या दौऱ्यांत मार्गांतील प्रत्येक गांव टिपलें जाई. या सर्व गांवीं त्यांचे मठ होते काय? गिरिधरांनीं मठांची रुद्रशतसंख्या दिली आहे.

**रुद्रशतसंख्या गणित मूर्ति। विख्यात ज्याच्या पुण्यकीर्ति।**
**समर्थस्वामी अवतारमूर्ति। नाना महंतरूपें विस्तारले॥** प्र. ७—३४

रुद्रशत म्हणजे ११००. असतील हि त्या काळीं या सर्व ठिकाणीं त्यांचे मठ, पण आतां त्यापैकीं फार थोडे अस्तित्वांत आहेत. आमच्या धुळ्याला

श्रीसमर्थांचे पाय लागलेले दिसत नाहींत. म्हणून तर आतां त्यांची वाङ्मयमूर्ति धुळ्यास येऊन श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत कायमची राहिली आहे.

(४) त्यांच्या संचारांत गांवेंचीं गांवें त्यांच्या कडे ओढलीं जावींत व सर्व जण त्यांच्या आज्ञा पाळण्यास तयार व्हावेत, यांत मला आश्चर्य वाटत नाहीं. त्यांची एकंदर वृत्ति पाहून लोक आचंबा च करीत राहिले असले पाहिजेत. त्यांची विरक्ति, त्यांचा वनविहार, त्यांची निस्पृहता, त्यांना लागलेला रामाचा वेध, त्यांचा बोध, त्यांची वाणी, त्यांचें बसणें, उठणें, भिक्षा मागून खाणें, पिणें, सर्व कांहीं पाहून तरुणांना तर भुरळ पडली असली पाहिजे !

प्रत्यय बोलोन उठोन गेला। चटक लागली लोकांला।
नाना मार्ग सांडून त्याला। शरण येती॥ १५-२-१९

परी तो कोठें आडळेना। कोणे स्थळीं सांपडेना।
वेष पाहातां हीन दीना। सारिखा दिसे॥ २०

उदंड करी गुप्तरूपें। भिकाऱ्यासारिखा स्वरूपें।
तेथें येशकीर्तिप्रतापें। सीमा सांडिली॥ २१

ठाईं ठाईं भजन लावी। आपण तेथून चुकावी।
मत्सरमतांची गोवी। लागों च नेदी॥ २२

खनाळामध्यें जाऊन राहे। तेथें कोणी च न पाहे।
सर्वत्रांची चिंता वाहे। सर्वकाळ॥ २३

अवघड स्थळीं कठीण लोक। तेथें राहाणें नेमक।
सृष्टीमध्यें सकळ लोक। धुंडीत येती॥ २४

तेथें कोणाचें चालेना। अनुमात्र अनुमानेना।
कट्ट घालून राजकारणा। लोक लावी॥ २५

लोकीं लोक वाढविले। तेणें अमर्याद जाले।
भूमंडळीं सत्ता चाले। गुप्तरूपें २६

किती गुप्तरूपें म्हणून सांगू ? त्यांच्या सहवासांत असलेल्या गिरिधरांना सुद्धां पत्ता नव्हता. ते सांगून गेले—

समर्थें कित्तेक गुप्त शिष्य केले।
ते ते समर्थांसी विदित भले॥ प्र १०-१०

आम्हांस ठाऊक नाहींत ! कल्याण हे त्यांचे पट्ट शिष्य ना ? त्यांनीं सुद्धां एका पदांत म्हटलें आहे कीं, श्रीसमर्थांच्या भक्तमंडळींची मोजदाद कोणी करूं शकणार नाहीं. त्यांच्या सान्निध्यांत असणारांची जर ही दशा, तर चंद्र आणि सूर्य यांच्या शिवाय त्यांच्या एकंदर शिष्यांची आणि महंतांची संख्या मोजून सांगण्यास कोण समर्थ आहे ? असें वाटतें, त्याकाळीं सारा महाराष्ट्र त्यांच्या कक्षेखालीं आला होता.

> कित्तेक शिष्य सदाचारी । कित्तेक शिष्य राज्याधिकारी ।
> कित्तेक शिष्य राज्यधारी । देशाधिकारी कित्तेक ॥ प्र. १२-२
>
> नाना पर्वतदुर्गीं शिष्य केले । नाना भूमिदुर्गीं शिष्य केले ।
> नाना सिंधुदुर्गीं शिष्य केले । सद्गुरुनाथसमर्थें ॥ ३

म्हणजे च त्या वेळचा सारा कर्ता वर्ग त्यांनीं अनुकूल करून घेतला होता.

> गुप्त प्रगट भरतखंडीं । माहांपुरुष असती उदंडी ।
> यावच्छायाविस्तार ब्रह्मांडीं । तावत्परंपरा सामर्थ्यें ॥ ४
>
> आक्रा पिढ्या समर्थें देखिल्या । पूर्णावतारें किती जाल्या ।
> चंद्रसूर्यें असतील मोजिल्या । वज्रदेहपरंपरा ॥ ७

(९) याप्रमाणें, गिरिधर सांगत आहेत, श्रीसमर्थांनीं आपल्या पुढच्या अकरा पिढ्यांचे पुरुष पाहिले होते. आपण आज फार तर नातु, पणतु, फार फार तर खापरपणतु पाहूं, पण अकराव्या पिढीचा पुढचा वंशज कोणाच्या नजरेस पडावयाचा आहे ! तो श्रीसमर्थांनीं पाहिला होता. त्यांच्या हयातींत च त्यांच्यापासून अनुग्रह घेऊन एकानें दुसऱ्याला, दुसऱ्यानें तिसऱ्याला, त्यानें चवथ्याला, याप्रमाणें दहाव्या अनुगृहीतानें अकराव्याला अनुग्रह दिल्याचीं उदाहरणें घडलीं होतीं. समर्थांच्या देखत संप्रदायवृक्षाचा विस्तार किती झाला होता, पहा. एक वेळ आकाशांतील तारे मोजतां येतील, समर्थांचे शिष्य मोजणें अशक्य होतें.

पुढच्या अकराव्या पिढीचा प्रशिष्य समर्थांनीं पाहिल्याचें प्रतापाच्या नवव्या समासांत गिरिधरांनीं स्वतःच्या देखत घडलेलें एक उदाहरण दिलें आहे. एके प्रसंगीं गडावर कांहीं ब्राह्मण एकीकडे बसून चर्चा करीत होते कीं, पुत्र नाहीं त्या स्वर्ग नाहीं म्हणतात, पुत्रसंतति असलेले पुष्कळ सत्पुरुष

आपण पहातो, पण येथें समर्थांना वंशसंतान दिसत नाहीं, तेव्हां कसें? अशी त्यांच्यांत चर्चा चालली आहे, तों च वार्ता आली कीं, कोणी एक महंत साताऱ्याच्या किल्ल्यापासून लोटांगणें घालीत श्रीसमर्थदर्शनास येत आहे.

कोण्हीयेक देवद्विज चर्चा करिती।
पुत्र नाहीं त्या स्वर्ग नाहीं म्हणती।
कितीयेक संतासी वंशसंतति।
समर्थवंशसंतान दिसेना॥ प्र. ९–४१

ऐसीं प्रवृत्तिमार्गें होतीं चर्चावचनें।
तव समर्थासी निवेदिती वर्तमानें।
स्वामि सप्तऋषिदुर्गापासूनि कोण्हीयेक महंत लोटांगणें।
घेत येतसे श्रीचरणाजवळी॥ ४२

अरे ब्राह्मण श्रमत असेल म्हणोनि।
सिबिका सत्वर आणा रे सिद्ध करूनि।
स्वामि सिद्ध सिबिका समर्थ तत्क्षणीं।
सिबिकारूढ पर्वत उतरले॥ ४३

महंत लोटांगणें घेत येत चि आहे।
दोनि क्रोश भूमि अंतर राहे।
समर्थें इच्छामात्रें श्रीपदीं आणिला पाहे।
श्रीचरणीं मिठी घातली उदासनाम्नें॥ ४४

देवद्विज संतसज्जन मंडळी।
पर्वतातळीं उतरले भूमंडळीं।
समर्थें आलिंगन देऊनि महंतासी पिढी पुसिली।
म्हणे अक्रावी पिढी माझी समर्थदेवा॥ ४५

ऐसें श्रीगुरुदेवसंतान वाढलें।
देवद्विजाचें समाधान जालें।
नापुत्रस्य लोकोस्ति स्वर्गमार्गें बोलिलें।
अनंत स्वर्ग लागती श्रीगुरुचरणीं॥ ४६

अकरावी पिढीचा भव्य पुरुष।
निस्पृह उदास जेविं चंडांशु।
सहस्र यात्रा समागमें पर्वतास।
समर्थ वेघले स्वानंदें॥ ४७

या गोष्टीचें तात्पर्य इतकें च कीं, वटवृक्षाप्रमाणें श्रीसमर्थसंप्रदायाचा हि वृक्ष फार फोफावला होता. महंतानें महंत करावे, त्यांना युक्तिबुद्धि शिकवाव्या आणि शहाणे करून प्रांतोप्रांतीं आणि देशोदेशीं संचारार्थ पाठवावे, अशी श्रीसमर्थांची आपल्या महंतशिष्यांना आज्ञा होती, त्याप्रमाणें हें सारें घडलें आणि सर्वत्र जनतेच्या मनावर श्रीसमर्थांची सत्ता चालू झाली होती.

लोकीं लोक वाढविलें । तेणें अमर्याद जालें ।
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥

ती ही अशी. तिची वार्ता हि दिल्लीपतीला नव्हती.

(६) मी हें आपलें परम भाग्य समजतों कीं, गिरिधरांनीं स्वतःस ठाऊक झालेल्या श्रीसमर्थांच्या विख्यात महंतांचीं, शिष्यांचीं आणि शिष्यिणींचीं नांवें, गांवें व वैशिष्ट्यें श्रीसमर्थप्रतापग्रन्थांत दिलीं आहेत. ही सारी मंडळी आपले पूर्वज होत. त्यांच्या चरणीं आपण अखंड लोटांगण घातलेलें असावें. त्यांचें नित्य स्मरण करणें पुण्यप्रद आहे. त्यांचीं नांवें घेण्यांत आपलें स्वहित आहे. हें मी कांहीं तरी लिहीत नाहीं. त्या पुण्याला आणि स्वहिताला तुम्ही आम्ही कां आंचवावें? त्यांची नाममाला सर्वांनीं च सतत कंठीं धारण करावी :

## (श्री) महंत

**वासुदेव** नामां अनुष्ठानी । समर्थप्रतिमा म्हणती जनीं ।
उत्कट परमार्थ विस्तारूनि । समर्थचरणीं लीन राहे ॥ प्र. १०-१४

उद्धव नामा पट्टाभिमानी । पूर्व पश्चिम गोदातीर अवनी ।
उत्कट यात्रा चालवी जनीं । श्रीगुरुचरणीं मर्यादें ॥ १५

**कल्याण** नामां ग्रंथ विस्तारी । उत्कट कीर्ति विश्वाभीतरी ।
देहांतसाधनें गुरुआज्ञें करी । कल्याण चराचरीं पावला नाम ॥ १६

कल्याणनामा वाढला शिष्यसंतानें । **दत्तात्रेय** बंधु पुत्रसंतानें ।
उभय पक्षीं लोकांसी भजनें । केली वृंदावनें सत्कीर्ति ॥ १७

---

१ यांचा मठ कण्हेरीस आहे. २ पूर्वेस इंदुरबोधन व पश्चिमेस टांकळी. ३ यांचा मठ डोमगांवीं. ४. यांचा मठ चाफळाजवळ शिरगांवीं.

**गिरिधर उद्धवपिता** उदास । केवळ प्रेमळ गुरुचरणीं वास ।
दोनि दोनि मुहूर्त सावकाश । ग्रंथविवरणीं अभिवंदनीं ॥ १८

रंगबोध **रंगमूर्ति** संकीर्तनें । परम विलासी जनपद मानें ।
पुढें पुढें विरक्त अतिमानें । उभय संतानें गुणकीर्ति ॥ १९

**दिवाकर**[3] नामा शिवगणद्वारीं । नाना जीव संकल्प विकल्प तम वारी ।
**भैरव रामचंद्र** पुत्र देवद्वारीं । पुराणीक निर्धारीं समर्थाचे ॥ २०

**गणेश** नामीं अग्रवादी । शास्त्रमतें सर्वांसी बोधी ।
नाना आत्मचर्चा प्रत्यय साधी । वैदिक वेदांतप्रतिपाद्य ॥ २१

**विठ्ठल** नामीं रघुनाथसदनीं । येकनिष्ठ श्रीगुरुवचनीं ।
केवळ प्रेमळ स्वामिभजनीं । प्रसाद चरणीचा सांभाळी ॥ २२

**नृसिंह** नामा मारुतिदास । पंचक्रोशी कृष्णातीरीं वास ।
परमार्थ विस्तारी बहुतांस । समर्थ सेवेसी तत्पर हो ॥ २३

**निरंजन** नामा येक मास तरुतळीं वनीं । गुरु आज्ञामहिमा दावित जनीं ।
बैस न म्हणतां न बैसे अवनीं । नाम निरंजनी लाधला ॥ २४

**कपिल** नामा येकनिष्ठ । ग्रंथपारायणीं वरिष्ठ ।
समुदाय केले उत्कट । शुद्ध परमार्थ वाढविला ॥ २५

करनाटकीं **अनंतमौनी**[6] । अरुणाचळप्रांत अवनी ।
मन्यारगुढीसी **मेरु** शिष्यतरणि । अनंत बोधकीर्णी फांकला ॥ २६

**जयवंत** नामा दक्षिणेकडे । परमार्थ विस्तारी चहुंकडे ।
श्रीरामगोपुरीहूनि कपिवत् पडे । रामदुतत्व दाऊनियां ॥ २७ ॥

**राघव** नामा दक्षिणप्रांतीं । परमार्थ विस्तार करी बहुतीं ।
शिष्यपरंपरा अमिति । समर्थसेवेकारणें ॥ २८

**विश्वनाथ** नामा पंडित । खंडित ज्ञानी अखंडित ।
आशंका खंडोनियां नवांकित । प्रेरिला अंकित उत्तरपंथें ॥ २९

---

१ उद्धव नांवाचे दोघे होते. पुढची ४५ वी ओंवी पहा. २ यांचा मठ शिरगांवजवळ पालीस. ३ महाबळेश्वरचे. भैरव आणि रामचंद्र असे त्यांचे दोघे पुत्र. ४ गणेशभट चाफळकर. ५ कागदपत्रांचा पहिला खंड—मालेंतील नववा भाग पाहणें. ६ या उभयता गुरुशिष्यांचा आतांपर्यंत आपणांस बरा च परिचय झाला आहे.

आणपा नामें महंत । नाना उत्तम गुणें आळंकृत ।
शिष्यसमुदायें कित्तेक प्रांत । उद्धरिला कीर्ति ॥ ३०

समर्थसदनीं **राम** नामा । चांफळग्रामीं **भास्कर** नामा ।
समर्थअधिष्ठानीं भक्तिमहिमा । कित्तेक काळें वाढविला ॥ ३१

**हरि** बंधु **महादेव** शक्तिआलयभुवनीं । मारुतिअर्चनीं वैभवभजनीं ।
उत्कट यात्रा आणिती अधिष्ठानीं । समर्थ नयनीं संतोषविती ॥ ३२

**गोपजी** गोसांवी वेणाबाईजनक । ज्यांसी सादृश्य श्रीरघुनायक ।
बाळपणीं उपदेशिले श्लोक । अध्यात्मरामायणाचे ॥ ३३

**काशिराज** कन्यासंतति वेणाबाई । येकनिष्ठ उपासक भक्तराज पाहीं ।
दुसरें दैवत कुळीं जाणत नाहीं । समर्थें कडिये खेळविला ॥ ३४

**देवदास**[१] नामा येकासनी । नगरप्रांतें श्रीरामउपासनी ।
मूर्तिस्थापना करूनि जनीं । वैभवभजनी परमार्थें ॥ ३५

**दिनकर**[२] नामा स्वधर्ममार्गें । माहा वित्पन्न शास्त्रमार्गें ।
तीक्षण बुद्धि देखूनि स्वामिभर्गें । दिनकर नाम ठेविलें ॥ ३६

**विश्वनाथ** नामा महंत । श्रीगुरुसेवे संत श्रीमंत ।
कित्तेक उद्धरिले जीव असंत । **राम** पुत्र संतानी ॥ ३७

**नारायण** नामा फिरस्ती । कदाचित शक्तिभुवनीं करी वस्ती ।
जेणें पुत्रासी केली शास्ति । दैवी अमर्यादे ॥ ३८

**तुकोबा** नामें हेळवांकी । परम उदास निस्पृह लोकीं ।
कित्तेक लोक उद्धरिले शेकीं । समर्थस्वरूपीं लीन राहे ॥ ३९

**मुरारि** नामा नारायणपिता । बाहोक्षत्रीं प्रांतीची यात्रा आणिता ।
केवळ भक्त साबडा सर्वथा । कथाकीर्तनीं प्रेमळ हो ॥ ४०

समर्थमुखें **अंबादास** । मुखतांबुल लाभलें त्यास ।
च्यारी पुत्र संजीवनी दिधले उदास । वेणीसंप्रदाईं लाविले ॥ ४१

---

१ नीलंगेमठपति. २ दादेगांवमठपति. ३ यांचा हि परिचय मागील प्रकरणांत झाला आहे.

बाह्मोक्षत्रासमीप नाम गावडा । निपुत्रिक सुपुत्रिक केला रोकडा ।
अष्टपुत्रेंसीं पावे ढोल धडधडां । वाजवीत यात्रा आणितसे ॥

**नामसेटी**ची यात्रा तुंबळ । बादली तगटी निशाणें सकळ ।
नाना उंच शासनें धातुबंदी केवळ । दाखवी दीक्षा प्रांतासी ॥ ४३

**उदास** नामा प्रेमळ दास । देशांतरीं ज्याचा वास ।
लोटांगणीं येत दर्शनास । सप्तऋषिदुर्गींहूनि अधिष्ठानीं ॥ ४४

**उद्धव** बाळकासी समर्थें उर्ध्वपादें धरिलें ।
प्रपंची होसी परमार्थी होसी पुसिलें ।
वैराग्यदीक्षेंत बाळपणीं कर्णीं उपदेशिलें ।
सत्पात्र केलें भूमंडळीं ॥ ४५

**जीवन** नामा महंत भला । जेणें समाधिस्थळासी प्रारंभ केला ।
श्रीगुरुदेवकार्यें विलया गेला । अधिष्ठानीं सुखरूप ॥ ४६

**महादेव** नामा चेतनाग्नि । युगधर्मशोधक चित्तभाग्नि ।
आपुल्या जीवें तरला जनीं । शिष्यसंप्रदाय न केले ॥ ४७

**तुकोबा**[1] बिडवी कीर्तनकारी । शक्तिस्थानीं मारुतिद्वारीं ।
प्रथम चाफळीं हरिकथा करी । शक्तिआलय यात्रेमध्यें ॥ ४८

**त्रिंबक**[2] वासुदेव मौज फकिरी । उदंड बागबागायत करी ।
समाधि घेतसे पर्वतावरी । गोदावरीच्या उत्तरे ॥ ४९

**कृष्ण** नामा तापीपुरीं । उत्कट परमार्थ लोकीं विस्तारी ।
सद्गुरुकृपें जग उद्धरी । यात्रा भरी देवाची ॥ ५०

मुसळ करीं **मुसळ** नामा । मुसळीं हनुमानाचा दावी महिमा ।
गंगातीरीं धोंडरींत सामर्थ्यसीमा । महापुरीं मुसळ रोविलें ॥ ५१

**भोळाराम** श्रीरामभक्त । श्रीगुरुसेवेमध्यें युक्त ।
सद्गुरुकृपें नित्यमुक्त । उदंड परमार्थ वाढविला ॥ ५२

**जयराम** नामा कुंडलधारी । अनुष्ठाता परमार्थ विस्तारी ।
करनाटकप्रांतें जग उद्धरी । श्रीगुरुस्वामीप्रतापें ॥ ५३

---

१ मालेंतील नववा भाग पाहणें, लेखांक त्रेपन्न. २ भालगांवमठपति.

**जीवन्मुक्त** नामा भक्त करारी । समर्थे बर्छीनें फोकिला वनांतरीं ।
माह्या प्रसादे दिधला गिरिकंदरीं । कर्णावरूनि बर्छी गेलिया ॥ ५४

**प्रेमळशेटि** नामा भक्त भोळा । अकरा वर्षें नैवेद्य तेणें केला ।
शेवटीं सज्जनपर्वतीं गुप्त जाला । कोणसा न कळला कोणासी ॥ ५५

**अनंत** नामा पंचक्रोशी पंढरीं । श्रीगुरुचरणीं निष्ठा बरी ।
उदंड समर्थपरमार्थ विस्तारी । उभय संतानें सृष्टीमध्यें ॥ ५६

**बाळकृष्णं** नामा वऱ्हाडदेशीं । चित्त समर्थचरणापासीं ।
सज्जनपर्वतीं श्रीगुरुभजनासी । **राम** नामा सेवक हरिकीर्तनासी ठेविला ॥५७

**महारुद्र** नामा महंत । वऱ्हाडदेशीं संत श्रीमंत ।
समर्थकृपें जीव अंतवंत । मोक्षश्रिया आळंकृत तेणें केले ॥ ५८

**यादव माधव** नामा प्रयागवेणीच्या कावडी ।
समर्थस्नानासी आणिताती आवडीं ।
श्रीचरणामृताची ज्यांसी अत्यंत गोडी ।
आत्मलिंगस्नपनार्थें ॥ ५९

**त्रिंबक** नामा उपनाम गगनि । ज्ञानवैराग्य केवळ वन्हि ।
दंडाराजपुरीप्रांतीं तळकोंकणीं । जगदोद्धार करितसे ॥ ६०

**हरिदास** नामा गुरुदर्शनी । सहनशीळ गुरुतर्जनीं ।
उदंबरग्रामीं मारुतिअर्चनी । श्रीगुरुभजनीं विख्यात ॥ ६१

**बाळकराम** नामा छंद सवाई । श्रीगुरुप्रताप वर्णी कांहीं ।
उभय संतानें भक्तियुक्त पाहीं । श्रीरामसमर्थसंकीर्तनीं ॥ ६२

**जनार्दन** नामा सुरतप्रांतीं । समर्थकृपेची करी महंती ।
जगदोद्धरण देखूनि संतीं । प्रेमें माथे डोलविले ॥ ६३

**दामोदर** नामा श्रीगुरुभजनीं । समर्थसंप्रदाय चालवी जनीं ।
भक्तिज्ञानवैराग्यें विजनीं । देवगडप्रांतीं विराजे ॥ ६४

**श्रीधर** नामा श्रीरामभजनी । श्रीगुरुसेवे संकीर्तनी ।
कितेक जगोद्धार करीत जनीं । रामटेंकप्रांतें विराजे ॥ ६५

---

१ बाळकराम आणि रोकडाराम असे कारंजे मठपति.

**गोविंद** नामा येकनिष्ठ । श्रीगुरुसेवेमध्यें वरिष्ठ ।
समर्थपरमार्थ विस्तारी उत्कट । गोमंतप्रांतीं विराजे ॥ ६६

**वामन** नामा ऱ्हस्व येथें । वामन नाम ठेविलें समर्थें ।
श्रीगुरुचरणीं वाऊनि मन तें । विक्रम दाखवी परमार्थीं ॥ ६७

**भैरव** नामा श्रीगुरुभक्त । भक्तिज्ञानवैराग्य युक्त ।
जगदोद्धारक नित्य मुक्त । गोकर्णप्रांतीं विराजे ॥ ६८

**शिवराम** नामा समर्थसंगें । कितेक दिवस अंतरंगें ।
पुढें पुढें जगदोद्धारणप्रसंगें । तेलंगणप्रांतें आज्ञापिला ॥ ६९

**सदाशिव** नामा महंत । किते उद्धरी जीवजंत ।
सगरप्रांत रायचुरप्रांत । समर्थकृपें उद्धरिला ॥ ७०

**शंकर** नामा उदास मूर्ति । रुद्राक्ष धरितसे पुण्यकीर्ति ।
श्रीरामभजनीं सत्कीर्ति । श्रीरंगप्रांतीं विराजे ॥ ७१

**राम** नामा सामर्थ्यमूर्ति । श्रीरामनौमि उत्कट कीर्ति ।
ज्याचेनि कैवारें म्लेंछ संव्हारी मारुति । बेदरीं पाडी मदळसा ॥ ७२

**वेनिमाधव** त्रिवेणीतीरीं । **हरिश्चंद्र** नामा अंतर्वेदिभीतरी ।
**हरिवंस** नामा गंगासागरीं । समर्थपरमार्थ वाढवितो ॥ ७३

**रामकृष्ण** नामा अयोध्यापुरीं । **हरिकृष्ण** नामा मथुरापुरीं ।
**जयकृष्ण** नामा मायापुरीं । समर्थपरमार्थ विस्तारितो ॥ ७४

**रामचंद्र** नामा कासीमध्यें । **भगवंत** नामा कांतीमध्यें ।
**गंगाधर** नामा अवंतिकीमध्यें । द्वारकेमध्यें **हरि** नामा ॥ ७५

**दयाळ** नामा बद्रिकेदारीं । **विश्वंभर** नामा सोरटीभीतरी ।
**रघुनाथ** नामा उज्जनीपुरीं । गुरुभक्तमहिमा विस्तारितो ॥ ७६

**ब्रह्मदास** नामा ॐकारीं । **बल्लाळ** नामा आउंढागिरीं ।
**कोदंडराम** नामा शेषाद्रिवरी । श्रीशैल्यशिखरीं विराजे ॥ ७७

**गोपाळ** नामा भीमाशंकरीं । **मल्लारी** नामा पर्यळीनगरीं ।
**आनंद** नामा घुष्मेश्वरीं । देवगिरीप्रांतीं राहातसे ॥ ७८

हनुमान नामा रामेश्वरीं । मारुतिदास मल्याळामीतरीं ।
बलभीम नामा अनंतशयनांतरीं । गुरुभक्ति अत्यंत वाढवितो ॥ ७९
अनंतें कवी सैह्याद्रिशिखरीं । समर्थप्रताप वाणी वैखरी ।
चक्रपाणी नामा विश्वाभीतरीं । निस्पृह उदास फिरताहे ॥ ८०

गिरिधरांना ठाऊक झालीं तेवढीं नांवें त्यांनीं सांगितलीं. याशिवाय आणखी किती तरी श्रीसमर्थांचे गुप्त महंत होते, ते त्यांचे त्यांना च ठाऊक, असें गिरिधरांनीं म्हटलें आहे. पण वर जीं कांहीं महंतांचीं नांवें, गांवें व वैशिष्ट्यें सांगण्यांत आलीं आहेत, तीं पाहिलीं म्हणजे आपल्या मनांत पुढील गोष्टी भरतात—

(१) यांपैकीं फार च थोड्यांची माहिती आतांपर्यंत आपणांस झालेली आहे. आतांपर्यंत झालेलें संशोधन किती अल्प म्हणावें ! संशोधनाला केवढें प्रचंड क्षेत्र आहे. मजकडून आतां यापुढें कांहीं होणें नाहीं. पुढिलांनीं पुढचें संशोधन करावें.

(२) भरतखंडाच्या चारी दिशांना श्रीसमर्थांनीं आपले महंत विखरिले होते. असें क्वचित् च क्षेत्राचें ठिकाण किंवा मोठें शहर उरलें असेल कीं जेथें त्यांचा महंत जाऊन पोंचला नव्हता.

(३) हे सारे महंत धूर्त, तार्किक, विचक्षण होते. ते कार्यकर्ते होते.

(४) कांहीं महंत मूळचे त्या त्या प्रांतांतील च असतील, पण कांहीं इकडून तिकडे जगदुद्धारार्थ पाठविलेले दिसतात. जगदुद्धार म्हणजे धर्मरक्षण.

(५) आपण ज्याला समर्थसंप्रदाय म्हणतो, त्याला गिरिधर समर्थपरमार्थ म्हणत आहेत.

(६) श्रीसमर्थांनीं केवढा प्रचंड व्याप केला होता व कशी सुयंत्रित संघटना केली होती ! याची कल्पना होऊन प्रत्येक जण भक्तिप्रेमानें आणि आदरानें आपलें मस्तक श्रीचरणावर ठेवील.

## (रा) शिष्य

गणेशपंतीं रायगडीं पूजा केली । समर्थाआंगीं चांफळीं लोकीं देखिली ।
ज्याचे भक्तीसी संतमंडळी मानवली । आश्चिर्य गुरुभक्तांचें ॥ प्र. ११–२

१ श्रीसमर्थांवरील यांचें अष्टक सर्वश्रुत आहे.

**प्रल्हादपंत** केवळ रामउपासक। ज्याचे घरीं सादृश्य श्रीरघुनायक।
देव्हाराहूनि उठोनि लेंकुरासी देख। दधि दुग्ध तूप लोणी वाढिलें ॥ ४

**रामचंद्र नीळकंठ** शिवराज अमात्य। अतिशय उत्सह करी नित्यनैमित्य।
ज्याचीं वृंदावनें लोक नित्य। पराशरपर्वतीं पूजिताती ॥ ५

**नानाजीपंतीं** समर्थासी विनति केली। स्वामि परब्रह्मीं माया जाली।
ऐसी कोण रे बोले बोली। इतुक्या चि वाक्यीं अनुग्रहो तया ॥ ६

**रामकृष्ण** साऊ देवगिरिस्थानीं। समर्थासी प्रार्थिती आत्मभुवनीं।
ज्याच्या भक्तीसी कथाकीर्तनीं। समर्थ गेले दोहिकडे। ७

**विश्वंभरपंत** समर्थध्यानी। देशांतरीं आठवी मूर्ति मनीं।
ज्याच्या प्रीतीसी समर्थ उपवनीं। प्रगटूनि पूजा घेतली ॥ ८

**विश्वासराय** समर्थचिंतनी। वाराणसीयात्रा धरूनि मनीं।
अशिरिवाचें प्रकाश देखतां आंगणीं। माहायात्रे निघाला ॥ ९

**नारायणपंत** विजयपुरीं बंदीं। असतां समर्थस्मरण करी।
शृंखळा तोडोनि क्षणाभीतरी। श्रीरामनौमीसी मुहूर्तें आणिला ॥ १०

**नृसिंहराय** नामा अधिकारी। चांफळीं देवाल्या प्रारंभ करी।
राजचौकी बैसली असतां द्वारीं। समर्थकार्यें चालवितसे ॥ ११

**रायाजीपंत** सज्जनगडसबनीस। समर्थसेवेसी रात्रिदिवस।
समर्थ रागें निघतां घेती समजाविस। ज्याच्या बोलीं सुबोलीं ॥ १२

**रंगनाथपंतें** रात्रिभागीं। ब्रह्मारण्यीं अर्चिले समर्थ योगी।
कल्याणमहंतासी प्रसाद वेगीं। समर्थें जेव्हां दिधले ॥ १३

**कोनेरीपंत मल्लारीपंत** भक्त भोळे।
ज्यांहीं मूळसाडे टाळ मृदांग वाजवित आणिले।

समर्थ ऐकोनि भविष्य पुढील बोलिले।
येथें हरिभक्त जन्मतील निर्धारें ॥ १४

**अंबाजी कोनेरीची** हरिभक्तसंतति।
स्वामि कार्तिक पर्वीं कांताप्रसूति।

स्वप्नीं अखंड जिला तेजोन्मय मूर्ति दिसती ।
टाळ मृदांग वाजती हरिकीर्तनीं ॥ १५

समर्थाचा जामात बाईचा कांत । श्रीगुरुभजनीं केवळ शांत ।
सर्वस्व अर्पी दानशीळ दांत । बाळकृष्णपंत शाहापुरीं ॥ १६

महंत म्हणजे मठपति. त्यांना स्वतंत्रपणें इतर शिष्य करण्याचा अधिकार असतो. शिष्यांना मठ स्थापण्याचा किंवा दुसऱ्यांना मंत्रोपदेश करण्याचा अधिकार नसतो. असे श्रीसमर्थांचे शिष्य हजारों हजार असले पाहिजेत. गिरिधरांनीं फार च थोड्यांचीं–त्यांच्या मतें, प्रमुखांचीं–नांवें दिलेलीं दिसतात.

## ( म ) शिष्यिणी

समर्थउदरीं परत्र कन्या । बाई नामें प्रथम मान्या ।
वैराग्यदीक्षेंत तडवली धन्या । लेकुरें समर्थें पुरिलीं उकर्डा ॥ १७
आक्का नामें चिमणाबाई परम प्रेमळ ।
तीन रात्री सीतोदकीं ठेविली निश्चळ ।
अधिष्ठानीं राहिली केवळ । समाधि चरणीं घेतली ॥ १९
अंबिका नामें कोरान्नि विजयपुरीं ।
वातावर्ती पातली कृष्णातीरीं ।
करवीरप्रांतीं हरिभक्ति बरी । शिष्यसंप्रदाये केली हो ॥ २०
द्वारकाबाई परम उदास । समर्थचरणीं दृढ विश्वास ।
नाना ग्रंथ फुट ग्रंथ पाठ समास । अंतर्निष्ठ सर्वदां ॥ २१
नबाबाई राहे तापीतीरीं । अंतर्निष्ठ अध्यात्मज्ञान विवरी ।
उत्कट परमार्थ लोकीं विस्तारी । समर्थस्वामिप्रतापें ॥ २२
मनाबाई अध्यात्मश्रवणी । येकनिष्ठ श्रीगुरुचरणीं ।
वैराग्यशीळ अंतःकरणीं । जनसंग नावडे ॥ २३
आपाबाई संगीतकीर्तनी । कीर्तन करूं म्हणे राजांगणीं ।
समर्थें वर्जूनि लौकिक जनीं । आपण कीर्तन ऐकिलें ॥ २४
अन्नपूर्णाबाई उद्धवमाता । गिरिधरमहंताची कांता ।
केवळ अंतर्निष्ठ समर्था । ध्यानीं मनीं आठवी ॥ २५

**सखाबाईसी** चांफळीं राहणें । वैराग्यशील अंतःकरणें ।
नाना वस्तु संग्रह करणें । श्रीरघुनाथयात्रेसाठीं ॥ २६

**गंगाबाईसी** हनुमानदर्शन । समर्थें येकांत भोजनीं दिल्हें जाण ।
काय स्वामी व्हावें पुसतां आपण । जेवितां हनुमान देखिले ॥ २७

**गोदाबाईचा** सद्भाव केवळ । क्षीरीवरी शुभाखंडीचा जाला गुळ ।
समर्थें प्रचित दाविली केवळ । शुभा सर्व हि गुळभेंटा ॥ २८

**अंताबाई** समर्थें उकर्डा जे पुरिली । धोत्रपिळ्या ऐसी कृष्णेंत टाकिली ।
बाईची कन्या परम मान्य जाहाली । समर्थचरणीं पावली संस्थान ॥ २९

**कृष्णाबाई** अंध कन्या देवासी वाइली ।
समर्थें चांफळीं वाढविली देवळीं ।
डोळे उघडितां पुण्यपुरुषा लाभली । लग्न केलें स्वानंदें ॥ ३०

**वेणाबाई** मुख्य भक्ति संस्थान ।
सदा सर्वदा समर्थध्यान ।
बाहोक्षत्रीं समर्थासी जालें हनुमंतदर्शन ।
श्रीरामलिंगीं देवालयीं ते वेळीं ॥ ३९

**आक्काबाई सुधाबाई । बाकुबाई भिमाबाई ।**
समर्थचरणासी लेंकुरें लाविलीं पाहीं । बाईसंतानें साक्षात्कारें ॥ ३८

मरीचिक्षेत्रीं वेणाबाई संस्थान **बाईयाबाई** ।
तीन वर्षें तन्मयता समाधि देहीं ।
देहीं देहभान आहे कीं नाहीं । तीर्थपयपान केलें षण्मासें ॥ ४७

शिष्यिणींची संख्या शिष्यांच्या मानानें थोडी च असणार. वरील सर्व आपल्या माता होत. आमचें केवढें पाप म्हणावयाचें कीं, यांच्याविषयीं आपणांस किती अल्प माहिती आहे! कोठें यांना पहावें, कोठें यांचा शोध घ्यावा ? हें हि काम आतां पुढीलांचें च आहे, आमचें संपत आलें आहे.

(७) ही सर्व महंतशिष्यमंडळी श्रीसमर्थांच्या तालमींत तयार होऊन देशाच्या चार हि दिशांना संचारार्थ जात, तेव्हां त्यांच्या हातून देशाची आणि धर्माची केवढी सेवा झाली असेल, याची कल्पना करावी. समर्थांच्या

तालिमेंत शिस्त अति कडक असे. वाटेल त्यास महंत होतां येत नसे. दासविश्रामधामकर्ते आत्माराम महाराज सांगतात—

दासरायाची ऐसी पद्धती । क्षणु हि रिकामा जाऊं न देती ।
सांप्रदायी ते सावध असती । परमार्थी साधनी सेवनी ॥ ९६–८१
मुषारदाराचें नव्हे कीं काम । संपादूनि अश्रद्धें वोहदेचें कर्म ।
अपूर्तिपणाला मानूनि संभ्रमें । हिणवोन वदूं दुजयासी ॥ ८२
अवघे हि जाणती लिहिणें वाचणें । प्रबोधूं रिझऊं कथा कवन ।
शरीर झिजऊं पाकसिद्धि करणें । चालणें बोलणें गाऊं नटूं ॥ ८३
गायनकळा जाणती सुस्वरें । असे जयाला बहु पाठांतर ।
राजकारणाचीं जाणती द्वारें । देऊळ रचाया सर्व वोहदे ॥ ८४
पाइकाहूनि चालती अधिक । भय नसे अणु ज्या भूतप्रेतादिक ।
सद्गुरुमर्जी राखिती मुख्य । दोषादि कळंक न लगे जया ॥ ८५
जिकडे तिकडे पावती मान । उत्तम गुणानें भूषिले बळानें ।
निंदिती व्यसना शोभायमान । दिसती होती पूज्यस्थ ॥ ८६

महंत म्हटला म्हणजे तो सर्वगुणसंपन्न च असावयाचा. तो धूर्त, तार्किक विचक्षण, समयज्ञ असावा लागे. किंबहुना ५×३ त शिष्य कसा असावा आणि कसा नसावा, याचीं जीं लक्षणें दिलीं आहेत, त्या लक्षणांनीं युक्त अशांची च निवड महंत म्हणून होत असली पाहिजे. शिष्य एकाकी असतो, पण महंताचा संबंध अनेक लोकांशीं येतो आणि लोक कसे विचित्र नाना तऱ्हेचे असतात, हें आपण जाणतो च. अशांशीं संबंध ठेवणारा, त्यांना आपलेसे करून घेणारा, त्यांच्या कडून कामें करवून घेणारा महंत किती धोरणी आणि धिमा असला पाहिजे, याची कल्पना करावी. समर्थांचे महंत होणें फुकटचें नव्हतें. महंतीचें सुख काय असतें, तें श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ५०० वें यांत एका प्रकरणांत आढळतें:

## महंतीचें सुख

महंती सुखाची नाहीं । येथें दुःख उदंड हि ।
उदंड दुःख लोकांचें । ऐकतां ऊर फुटतो ॥ १
लोक हे विकारी नाना । फार अन्याय वर्तती ।
पाहावें तें किती डोळा । ऐकावें श्रवणें किती ॥ २

क्षमितां ऊर तो दाटे । बोलतां वाणी खुंटते ।
तऱ्हीं ते मस्त मस्तीनें । वळितां वळतीचना ॥ ३

वळितां दुःख मानिती । अन्यायें घात नेणती ।
सांगतां हित वाटेना । ऐकतां त्रास मानिती ॥ ४

झंझणिती चंचणिती । फंफणिती हटें हटें ।
हटे ते उद्धटे होती । आपशुद्धि असेचिना ॥ ५

उद्धटें वर्तती क्रिया । उद्धटें शब्द बोलती ।
उद्धटें नास्ति मर्यादा । उद्धटें नास्ति नम्रता ॥ ६

उद्धटें गर्व वर्तावा । उद्धटें प्रीति नासती ।
उद्धटें आर्त तोडिती । उद्धटें प्रीति खंडती ॥ ७

अखंड सर्व सोसावें । भलेपणाचिकारणें ।
परंतु सुख तों नाहीं । कांहीं कांहीं क्वचित् हि ॥ ८

सीण उदंड होताहे । नेणत्या संगती गुणें ।
जाणता संग भेटेना । दुःकाळ पडिला गमे ॥ ९

सज्जनें काय करावें । लोक मोठा अनावरु ।
कीं त्यासी काय सांगावें । मनांतून कळेचिना ॥ १०

सज्जनीं फारसी निष्ठा । देव त्यासी च वोळतो ।
अन्याय वर्ततो तो तो । भ्रष्ट होतो अनावरू ॥ ११

लोकांच्या तऱ्हांचें किती मार्मिक आणि यथार्थ वर्णन या अकरा ओंव्यांत आलें आहे. कोणत्या हि काळीं लोकांचा स्वभाव हा असा च असणार. त्यामुळें त्यांचें पुढारीपण म्हणजे च महंतपण करणें मोठें जोखमीचें काम असतें. लोकांवर विचारापेक्षां विकाराचा च पगडा जास्त बसलेला असतो, तुम्ही त्यांना किती हि बोला, ते आपला मार्ग म्हणून सोडावयाचे नाहींत. त्यांना स्वतःचें कल्याण कशांत आहे, हें कळत च नसतें व दुसऱ्यानें सांगितलेलें खपत नसतें. हितकर पण अप्रिय असा केलेला उपदेश न पटून ते उलट उद्धटपणें बोलूं लागतात. श्रीसमर्थांच्या महंतांना जनस्वभावाची पूर्ण परीक्षा असल्यामुळें ते अत्यंत क्षमाशील असत. लोककल्याण हें च एक त्यांचें ध्येय असल्यामुळें लोकांचीं अनन्वित बोलणीं ऐकून हि त्यांची शांत वृत्ति भंग पावत नसे. ते देवाला, धर्माला, जनाला व मनाला भिऊन वागणारे असत. ते

अत्यंत धीराचे असत. अमुक गोष्ट धर्माला संमत आहे, न्यायनीतीला धरून आहे, अशी एकवार खात्री झाली म्हणजे संकटांचा डोंगर कोसळला तरी ते लवमात्र डगमगत नसत. ते आपल्या ठिकाणीं अखंड सावध आणि सुचित्त असत. पुढें व्हावयाचें तें त्यांना आधीं च दिसत असे. कसा हि कठीण प्रसंग आला तरी त्यांतून मार्ग काढण्याला त्यांचें मन खंबीर असे. मानापमानाचा त्यांच्या मनाला स्पर्श हि होत नसे. त्यांच्या बोलण्यांत आणि चालण्यांत नेहमीं मेळ असे.

> **जैसें बोलणें बोलावें। तैसें चि चालणें चालावें।**
> **मग महंतलीळा स्वभावें। आंगीं बाणे॥ १२-९-१३**

हें तत्त्व त्यांनीं ओळखून आचरणांत आणलें होतें. आपण करावें आणि मग दुसऱ्यांकडून करवावें, असा त्यांचा बाणा असे. ही सर्व शिकवण त्यांना श्रीसमर्थांपासून मिळत असे.

(८) श्रीसमर्थांची शिस्त अति कडक असे. महंतांची हि श्रीसमर्थांच्या ठिकाणीं इतकी प्रखर निष्ठा असे कीं, ते ती शिस्त धर्म समजून पाळीत. ही शिस्त काय होती, हें जाणावयाचें असल्यास, उदाहरणासाठीं चवदाव्या दशकाचा पाहिला समास व बाराव्याचा दहावा समास अवश्य वाचावा. ज्याला ही शिस्त पाळतां यावयाची नाहीं, त्यानें महंत होऊं नये, त्यानें आपल्यापुरतें च पहावें, असा श्रीसमर्थांचा कायदा असे. कोणी शिस्तीचा भंग केला, तर श्रीसमर्थांना तो मुळीं च खपत नसे. कोणी घोर अपराध केला तर त्याला शिक्षा होत असे. श्रीसमर्थांनीं एकदां एका महंताला, त्याच्या अपराधाबद्दल वेताच्या छडीनें झोडपल्याचें उदाहरण नमूद आहे. समर्थभक्त म्हणवून घेणें आतांसारखें तेव्हां सोपें नव्हतें. आतां कोणाला च कोणती हि शिस्त पाळावी लागत नाहीं किंवा कोणाचा धाक उरला नाहीं. आतां कोणाच्या हातांत छडी नसल्यामुळें आपण सर्व जण च समर्थभक्त आहोंत. कोणी छडी घेऊन उभा असता तर आपण सारे जण दूर पळालों असतों. मनाशीं विचार करावा, श्रीसमर्थांच्या कसोटीला कोण उतरूं शकेल. मी इतरांचें काय सांगूं, पण स्वतःपुरती कबुली देण्याला कांहीं हरकत नसावी. मी दिलगीर आहे, कष्टी आहे, पण प्रांजलपणें कबूल करतों कीं, श्रीसमर्थभक्त

म्हणवून घेण्याला जे गुण लागतात, लागावेत किंवा त्या काळीं लागत, त्यांपैकीं पाव आणा हि मजमध्यें उतरलेला नाहीं. पण यावरून असें हि समजूं नका कीं, मज सारख्या निरर्थक माणसाला श्रीसमर्थचरणापाशीं मुळीं च थारा मिळत नसे. श्रीसमर्थांच्या संग्रहीं सर्व प्रकारचे लोक असत, गुणी असत, अगुणी असत, पण सारे निष्कपट असत. प्रसंगीं श्रीसमर्थ कठोर वृत्ति धारण करीत असले, तरी त्यांच्या हृदयांत अति मृदुता असे. निष्कपटपणा एवढ्या एका च गुणाची ते सर्वांत अपेक्षा करीत. निष्कपटपणें त्यांच्या जवळ कोणी हि जावें. अपराधाची गय केली जात नसे, पण एरव्हीं सर्वदा ते शिष्यांशीं आणि शिष्य त्यांच्यांशीं अति लडिवाळपणानें आणि मोकळेपणानें वागत. कांहीं हि शंका उद्भवली, तरी ती विचारण्याला शिष्यांना संकोच वाटत नसे. एकवीससमासीच्या बाराव्या समासांतील आरंभींच्या कांहीं ओव्यांवरून श्रीसमर्थ आणि त्यांचे शिष्य परस्परांशीं कसे वागत, याचा बोध होतो :

स्वामी बोलिले तें बरवें। परी मज येक आठविलें स्वभावें।
तें मज वाटतें बोलावें। परी आज्ञा स्वामीची पाहिजे ॥ १

अरे शिष्या आशंका उद्भवली। ते अगत्य पाहिजे पुसिली।
हे आम्ही आज्ञा दिधली। पहिलें चि तुज ॥ २

जरी माझी मर्यादा धरिसी। तरी तूं स्वहितासी अंतरलासी।
याकारणें मानसीं। शंका धरूं नको ॥ ३

आधीं च काईसी मर्यादा। संदिसें बैसलों संवादा।
निरसलें नाहीं तुझिया भेदा। तों चि मी स्वामी कैसा रे ॥ ४

तुझें समाधान नव्हेल। तुज बरें न वाटेल।
कीं जेथें समाधान होईल। तो चि स्वामी तुझा ॥ ५

परमार्थीं विचारितां कांहीं। सर्वथा बळात्कार नाहीं।
पडिलों बळात्कारप्रवाहीं। तरी तो परमार्थ नव्हे ॥ ६

हें बोलणें इदंनिमित्य घडलें। जें तुज शिष्यपण नाहीं आलें।
जेधवां तुझें समाधान जालें। तेव्हां चि तूं शिष्य आपुला ॥ ७

ऐक आमुची आज्ञा ऐसी। मर्यादा टाकावी आम्हासी।
काये आठवलें तुझा मानसीं। ते आशंका घेई आतां ॥ ८

**स्वामीची आज्ञा प्रमाण। परी माझा ठाईं मूर्खपण।**
**आज्ञे प्रमाणें विज्ञापन। करीन चरणांपुढें ॥ ९**

असा मनमोकळेपणा गुरुशिष्यांत होता.

(९) असे सद्गुरु आणि असे सच्छिष्य आपणांस कोठें पहावयास मिळावेत! जें कधीं पाहण्यांत आलें च नाहीं, त्याची यथार्थ कल्पना तरी कशी व्हावी? श्रीसमर्थ आणि त्यांचा अमर्याद शिष्यपरिवार, त्यांचें परिभ्रमण आणि त्यांचा उपदेश, त्यांची दिनचर्या आणि धर्मकृत्यें, त्यांचें बोलणें आणि चालणें, त्यांचें बसणें आणि उठणें, कशाची च बरोबर कल्पना होत नाहीं. जीव मात्र कासावीस होतो. उगीच वेड्यासारखें वाटत असतें कीं, शरीरानें नव्हे तरी मनानें, एकांतांत बसून त्या काळांत जाऊन पडावें, त्यांच्या शिष्यांत प्रवेश करून घ्यावा, अगदीं शेवटच्या रांगेंत उभे राहण्यापुरती जागा मिळून त्यांच्यांत चाललेली चर्चा ऐकावयास मिळाली, तरी स्वतःस आपण भाग्यवान् समजूं. राजकारणाची चर्चा, अर्थात् च, एकांत चालत असली पाहिजे. अद्वैत परमार्थाची चर्चा सुद्धां अगदीं चव्हाट्यावर होत असेल, असें नाहीं. करुणाष्टकांत म्हटल्याप्रमाणें ती हि कोठें तरी गुहेंत, घळींत, एकांतांत च होत असली पाहिजे.

**येकांत गुहा निर्वात जेथें।**
**चर्चा करावी अद्वैत तेथें।**
**संसर्ग खोटा इतरां जनांचा।**
**जयांस नाहीं वर सज्जनाचा** ॥ क. १३१–१

**सत्संगती ज्या नरांसि नाहीं।**
**ते पापरूपी पडती प्रवाहीं।**
**संदेह चित्तीं सहसा टळेना।**
**सिद्धान्त साधूविण आकळेना ॥ २**

(१०) असे सद्गुरु आणि असे सच्छिष्य दोघे एकरूप झालेले असतात. श्रीसमर्थांचें आपल्या शिष्यांना आश्वासन असे—

**असो गुरूचे ठाईं अनन्यता। तरी तुज कायेसी रे चिंता।**
**वेगळेपणें अभक्ता। उरों चि नको ॥ ५–६–५२**

तूं गुरूपासून वेगळा होऊं च नको! कसें साधेल हें? तें श्रीसमर्थांच्या

शिष्यांना आणि महंतांना साधलें होतें. तें एकात्मतेचें सुख त्यांनीं अनुभविलें होतें. तें आपणांस कोठून अनुभवावयास मिळणार? त्या सुखाची आपणांस कल्पना हि करवत नाहीं. तें कसें असतें, याचें नुसतें वर्णन ऐकावयाचें असेल तर ऐका. गुरु आणि शिष्य यांची चर्चा चालली होती. शिष्य अगदीं तन्मयतेनें श्रवण करीत होता आणि गुरु हि देहभान विसरून बोलत होते. बोलतां बोलतां शब्द खुंटून व विचारांत मग्न होऊन गुरु

बोलोनि राहिले निवांत। विचार घेतां शब्दासी अंत।
जाला संवाद भेदरहित। उभयेता येक चि जाले॥ ए. १४–७५

नेत्रीं टकमकां पाहाती। परंतु कांहीं च न बोलती।
देहेबुद्धीची भ्रांती। पडोनि गेली॥ ७६

पातीयासी पातें न लगे। तेणें जळ वाहों लागे।
मंद वायुचेनि संगें। गळती अश्रुपात॥ ७७

देहाचें स्मरण नाहीं। निचेष्टित जाले विदेही।
स्वरूपावभास तो हि। मोडोनि गेला। ७८

ते आनंदजळीं बुडाले। गुरु शिष्यपणावेगळे जाले।
प्रपंच सांडुनी मुकले। परमार्थासी येकसरें॥ ७९

ऐसे ते तटस्थ घटिका चारी। उपरी आले देहावरी।
परी स्वसुखाची अंतरीं। कळा बाणोनि गेली॥ ८०

दोघे येकरूपें चालती। ब्रह्मानंदेंकरूनि डुलती।
ते खूण स्वानुभवी जाणती। येरां अतर्क्य॥ ८१

ऐसें सुख सत्संगती। शरण गेलियां प्राणी पावती।
यातायाती वेगळे होती। संतसंग जोडलियां॥ ८२

हें असलें सुख ज्या आम्ही कधीं जन्मांत अनुभविलें नाहीं, तें श्रीसमर्थ आणि त्यांचे शिष्य यांच्या नित्याच्या अनुभवांतलें होतें. असा गुरुशिष्यांचा संबंध त्या काळीं होता. वरील वर्णनांतील स्थितीचा अनुभव दूर च राहिला, पण तशी स्थिती आज कोठें पहावयास मिळत नाहीं किंवा ऐकूं येत नाहीं. नाहीं हें खरें, मग वारंवार असें बोलून तरी काय उपयोग होणार!

(११) श्रीसमर्थ महंतांना दूरवर प्रांतांत कामगिरीवर पाठवीत व शिष्य हि निर्भयपणें जात, कारण त्यांना विश्वास वाटे कीं, श्रीसमर्थांचें लक्ष

सतत आपणांकडे असणार व ते आपली काळजी करणार. कामगिरीवर पाठवितांना श्रीसमर्थ त्यांना दासबोध, झोळी व कांठी देत व

नमूं चंचळा मग निश्चळा पावावें विचारें ।
आधीं शोधावें मग बांधावें लोका खबर्दारें ।
मना नेमावें मग दमावें घेवों नेदावें वारें ।
वेधीं लावावें मग पावावें भूमंडळ सारें ॥ ध्रु०

आधीं भोगावें मग त्यागावें जावें दिगांतरा ।
आधीं राखावें मग चाखावें लोकांच्या अंतरा ।
तेथें वसवावें मग वसवावें हृदईं परमेश्वरा
जन्म सार्थक निरार्थक कैसा हा विचारा ॥ १

जन्म दुल्लभ हा सुल्लभ करूनि दावावा ।
ज्ञानअंजनें निरंजनें विवेकें पावावा ।
वेधु मनाला मग जनाला अत्यंत लावावा ।
देव तो अर्थ परमार्थ मनांत भावावा ॥ २

आधीं आगमीं मग निगमीं शोधूनि पाहावें ।
अनुसंधानें मनीं माने तैसें चि राहावें ।
नाना सुखें हि तें दुःखें हि विवेकें साहावें ।
आवघें आहे तें सर्व हि देवाला वाहावें ॥ ३

धन्य होइजे मग जाइजे मुक्तीच्या पदासी ।
मनीं भाविजे मग पाविजे कीर्तिरूप कासी ।
चित्त राखावें मग चाखावें परत्र सुखासी ।
नाम अंतर निरंतर येऊं द्या मुखासी ॥ ४

जड चंचळ तें निश्चळ शोधूनि पाहावें ।
गाणें नाचणें निरूपणें विवेकें राहावें ।
देव करील तें होईल होणार साहावें ।
बोलिला दास रे विश्वासें रे देवाला भावावें ॥ ५

इत्यादि उपदेश करून वागावयाचे अनेक नियम घालून देत. आपली चिंता वाहणारे असे सद्गुरु आपल्या मस्तकीं आहेत या विश्वासानें महंतांना कामगिरीवर जातांना किती हुरूप येत असेल, याची कल्पना करावी.

देशोदेश फिराया जाती शिष्य ।
करिती महंती फिरती उदास ।
सांभाळण करिती तयासी दास ।
चिंतालेश लागों नेदेती ॥ दा. वि. धा. ८९–१६

दासविश्रामधामकर्ते आत्माराम महाराज श्रीसमर्थांच्या पश्चात् शंभर वर्षांनीं होऊन गेले. ते म्हणतात, समर्थांनीं आपल्या शिष्यांची काळजी तेव्हां केली आणि आतां ते करीत नाहींत, असें समजूं नका.

धन्य दासांची कमाई ऐसी ।
तेव्हां आणि आतां हि भक्त लोकासी ।
संरक्षिले पावोन समयासी ।
संकटीं पडों न दिधलें ॥ दा. वि. धा. १०५–११८

करिती महंती महंत जेथें ।
सत्ता आपुली निरविती तेथें ।
प्रगटोन पुरविती मनोरथ ।
भक्तिभावातें वळखोनी ॥ ११९

(१२) प्रांतोप्रांतीं संचारार्थ गेलेल्या शिष्यांची श्रीसमर्थ जशी चिंता करीत, त्याप्रमाणें ते शिष्य योग्य रीतीनें वागत आहेत कां नाहींत, याची पाहाणी करण्याकरितां हि ते कोणाकोणाची नेमणूक करीत असें दिसतें. हें काम बहुधा श्रीकल्याणस्वामीवर सोंपविण्यांत येत असे. श्रीसमर्थांच्या शिष्य-मंडळींत एकटे कल्याणस्वामी च असे दिसतात कीं, ज्यांनीं सहसा कधीं आपल्याकडे श्रीसमर्थांचा बोल येऊं दिला नाहीं किंवा ज्यांना शिक्षा करावी लागली नाहीं. तेव्हां इतर शिष्यांवर देखरेख ठेवून श्रीसमर्थांना वृत्तान्त निवेदन करण्याचें काम बहुधा त्यांच्यावर सोंपविण्यांत यावें, हें स्वाभाविक होय.

कल्याणदाता तो चातुर्यनिधी ।
निष्ठा जयाची श्रीगुरुपदीं ।
बोलाऊन तया दासदयाब्धीं ।
प्रभुत्व विलोकूं आज्ञापिलें ॥ दा. वि. धा. ७४–९५

जे जे स्थळीं देव स्थापिलेती ।
पुण्यवंत जे स्थळीं करिती महंती ।

**तेथील पाहोन दंडक रीती।**
**बंदोबस्त कराया धाडिलें॥ ९६**

**सर्वज्ञ शिष्य तो विश्वासनिधी।**
**गुरुदर्शनाहून शेवटावधी।**
**तिळमात्र न चुकले सेवाविधी।**
**कोप कीं शिक्षांत न गवसले॥ ९७**

**वरकड शिष्य हि असती धन्य।**
**परि प्रौढ न जाले शिक्षिल्याविण।**
**अचुक न जाणती सेवाविधान।**
**पुसती कल्याणां गुरुआज्ञे॥ ९८**

(१३) संप्रदायाचें तत्कालीन आणखी एक लक्षण माझ्या लक्षांत येतें तें असें कीं, त्या काळीं छापखाने नसल्यामुळें सर्व मठांतून लेखनक्रिया परंपरेनें अखंड चालत असे. श्रीमत् दासबोधाशिवाय दुसऱ्या कोणत्या हि ग्रन्थांत लेखनक्रियेवर तुम्हांस विवेचन आढळणार नाहीं. या संप्रदायाचें हें एक वैशिष्ट्य होतें. श्रीसमर्थांनीं आपल्या सर्व शिष्यांना तो एक दंडक च घालून दिलेला होता. त्यामुळें प्रत्येक मठपति आणि मठांत वास्तव्य करून राहणारी इतर मंडळी यांचें लेखन सतत चाले. प्रत्येक मठांत श्रीसमर्थांचें वाङ्मय तर संपूर्ण असे च, पण पूर्व कालीं होऊन गेलेल्या सर्व सत्पुरुषांच्या वाङ्मयाच्या प्रती, मठपतींच्या आवडीप्रमाणें कांहीं ना कांहीं असत च. हा दंडक कल्याणस्वामी आणि त्यांची परंपरा यांच्या कडून विशेष च पद्धतशीर-पणें पाळला जात असे. कल्याणांच्या परंपरेंतील मंडळींचें अक्षर अगदीं एकसारखें, एका वळणाचें आणि सुंदर असे,

**जें देखतां चि चतुर। समाधान पावती॥**

त्यांच्या परंपरेंतील दासबोधाच्या प्रती माझ्या पाहण्यांत इतक्या आल्या आहेत कीं, मी आतां दुरून पाहून हि कल्याणांच्या परंपरेंतील प्रत ओळखूं शकतो. कल्याणस्वामींचे एक शिष्य, आपचंदमठाचे अधिपति शिवरामस्वामी यांनीं परोपकारार्थ स्वतः दासबोधाच्या अकरा प्रती केल्या होत्या. त्यांनीं स्वतःला आणि इतरांना असा नियम घालून दिला होता कीं, अक्षर एवढें असावें कीं, जें लहानपणीं, मध्यम वयाला आणि वृद्धपणीं वाचतां यावें. तें

फार बारीक नसावें व फार मोठें हि नसावें, मध्यम असावें. दासविश्रामधाम या प्रचंड चरित्रग्रन्थाचे कर्ते, एकेहाळी मठाचे अधिपति आत्माराम, हे शिवरामांचे नातशिष्य होतः शिवरामांचे रामचंद्र व रामचंद्रांचे आत्माराम. या आत्मारामांचें एक च उदाहरण मी अशासाठीं सांगूं इच्छितों कीं, त्यावरून त्या काळीं सर्व मठपति पोथ्यापुस्तकांचे बाबतींत किती आस्थेवाईक असत याची कल्पना व्हावी. आत्मारामहाराजांनीं जो दासविश्रामधाम ग्रन्थ लिहिला, त्याचें नुसतें स्वरूप च पहा. हें १२१ अध्यायांचें श्रीसमर्थचरित्र आहे. पण तें चरित्र लिहितांना त्यांत कोणा हि पूर्वकालीन सत्पुरुषाच्या नुसत्या नांवाचा उल्लेख आला तरी त्याची ओळख करून देण्यासाठीं त्याच्या काव्यांतील थोडा तरी निवडक भाग आत्मारामहाराज उद्धृत करीत. तसें च श्रीसमर्थांच्या कोणत्या हि लहान मोठ्या प्रकरणाचा प्रथम उल्लेख करितांना तें सबंध प्रकरण त्या त्या ठिकाणीं उतरून काढलेलें आढळतें. यावरून दासविश्रामधाम हा केवढा प्रचंड ग्रंथ आहे याची कल्पना होईल. त्यांत नुसत्या श्रीसमर्थचरित्रपर ओंव्या १६३०२ आहेत, म्हणजे श्रीएकनाथी भागवताहून हि जास्त आहेत. या एका उदाहरणावरून श्रीसमर्थांच्या सर्व शिष्यप्रशिष्यांचा काळ कसा व्यतीत होत असला पाहिजे, याची कल्पना होते.

दुर्दैव मात्र असें कीं, कारणें कांहीं हि असोत, पण अलिकडच्या साठ सत्तर वर्षांच्या काळांत मठामठांतील ह्या हस्तलिखित संग्रहाची फार उपेक्षा झाली. गेल्या चाळीस पंचेचाळीस वर्षांत, ज्ञात झालेल्या मठांतील जो संग्रह सत्कार्योत्तेजक सभेनें मिळवून संरक्षणार्थ श्रीसमर्थवाग्देवतामंदिराच्या हवालीं केला आहे, तो वस्तुतः पाहातां मठामठांतील उरलेला केर होता, पण तो केर आज लक्षावधी रुपये मोलाचा आहे! मग, पडत्या काळांत मठांतून उरलेला नुसता केर जर इतका मौल्यवान् आहे, तर ते मठ जेव्हां आपल्या ऐन वैभवांत होते, त्या वेळीं त्यांतील संग्रहाचें स्वरूप कसें असेल, याची कल्पना च केली पाहिजे! श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील संग्रह पहावा आणि मठांच्या पूर्व वैभवाची आणि त्याबरोबर च, कल्याण, उद्धव, दिनकर, बालकराम इत्यादि शिष्य व शिवराम, जगन्नाथ, रामाजी दादा, मेरुस्वामी, गिरिधर, आत्माराम इत्यादि प्रशिष्य आपला काळ कसा कारणीं लावीत असतील, याची कल्पना करावी.

(१४) असा तो काळ होता! त्या काळीं, ज्यांचा शब्द प्रभु रामचंद्रानें झेलून धरावा, जमिनीवर पडूं च देऊं नये, ज्यांनीं मनांत आणावें आणि प्रभूनें तें पुरवावें, जगाचा उद्धार करावा म्हणून ज्यांना राघवाचा वर मिळाला होता, जो कोणी आपणांस शरण येईल त्यास आपण तत्काळ मोक्ष देऊं, अशी ज्यांची प्रतिज्ञा होती, आणि ज्यांचा सर्वत्र संचार होत असे, असे श्रीसमर्थासारखे महापुरुष संप्रदायाच्या अग्रभागीं होते आणि स्वर्गांत जाण्याची आज्ञा करा कीं पाताळांत जाण्याची करा, वाटेल तशा अवघड आज्ञा करा, त्यांचें निष्ठेनें पालन करण्यास सदा सिद्ध, असा हजारों महंतांचा आणि लक्षावधी शिष्यांचा त्यांचा अनुयायी वर्ग होता. असें त्या काळीं संप्रदायाचें स्पृहणीय स्वरूप होतें. त्याचें नुसतें स्मरण झालें, तरी आज आपलीं मनें प्रफुल्लित होत आहेत. मग, या प्रकरणाच्या मथळयाच्या जागीं दिलेल्या ओवींत म्हटल्याप्रमाणें, जे प्रत्यक्ष त्या काळीं होते, ज्यांना श्रीसमर्थांचा सहवास घडला, ज्यांनीं त्यांच्या लीला पाहिल्या, त्यांचें केवढें भाग्य म्हणावयाचें! ते कृतार्थ होत! आणि आम्हीं—

आम्ही केवळ पापी जन।<br>
जन्मलों तयांचे मागून।<br>
तऱ्ही आतां एकवार कृपा करून।<br>
दर्शन द्यावें दयाळा॥

## ( २ ) संप्रदायाचें आतांचें स्वरूप

( १ ) अवनति कशानें झाली—( २ ) अवनतीचें स्वरूप—( ३ ) मुख्य कारण–कोणी नियंता उरला नाहीं—( ४ ) दुसरें कारण, मठपति घरबारी बनले आहेत—( ५ ) तिसरें कारण, परमार्थांत पुत्रपरंपरा शिरली हें होय—( ६ ) चवथें कारण–निर्भीडपणें कोणी च बोलत नाहीं—( ७ ) संप्रदायाच्या चार अवस्था—( ८ ) जागृतीचीं चिन्हें दिसूं लागली आहेत—( ९ ) हें हि प्रकरण श्रीसमर्थांना विचारून च लिहिण्यांत आलें आहे.

**आतांचे लोकीं काय केलें । अन्न मिळेना ऐसें जालें ।**
**तुम्हा बहुतांचे प्रचीतीस आलें । किंवा नाहीं ॥** रूपांतरित

( १ ) त्या स्पृहणीय काळांतून या शोचनीय काळांत येण्याला मन तयार नाहीं. त्या काळच्या संप्रदायस्वरूपाच्या चिंतनांत तें बरें रमलें होतें. तेथून निघून चालू परिस्थितीकडे पाहण्याला त्याला धैर्य होत नाहीं. एक वेळ, भावी काळाचा विचार करण्याला तें तयार होईल, कारण भावी काळाविषयीं आनंदकारक कल्पना करण्याला तें मुखत्यार आहे, पण हल्लीच्या दुःखकारक परिस्थितीचा नुसता विचार हि नको, असें त्यास वाटतें. संप्रदायाच्या तेव्हांच्या स्वरूपाचा मागमूस हि आतांच्या स्वरूपांत आढळत नाहीं. असें कां झालें ? पूर्वीं काय होतें आणि आज काय नाहीं ? पूर्वीं होतें तें च जग आज हि आहे. आज हि तेव्हांचे च चंद्र आणि सूर्य आहेत. ऋतुमान बदललें नाहीं. झाडें झुडपें तेव्हां जशीं वाढत होतीं, तशीं च आज हि वाढत आहेत. तेव्हांपासून आतांपर्यंत नद्या तशा च वाहात आहेत. सह्याद्रि, विंध्याद्रि, हिमाचल जागच्या जागीं जसेच्या तसे उभे आहेत. पंचभूतांत कांहीं फरक पडलेला दिसत नाहीं. धान्य पूर्वींसारखें च पिकत आहे, फळझाडें फळें देत आहेत, सर्व, सर्व कांहीं पूर्वींचें च असतां आमच्या स्थितींत मात्र फरक पडला, तो कशानें ? पूर्वीं मनांत आणावें तें होत असे, आतां त्या च मनांत कावळयाच्या शापा इतकें हि सामर्थ्य उरलें नाहीं. पूर्वीं

**कल्पिले पदार्थ प्राप्त व्हावे ।**
**सिद्धी वोळगती स्वभावें ।**
**आतां सामर्थ्याचेनि नांवें ।**
**तृण हि होईना ॥** सो. ११-४-७१

**पूर्वील मनुष्यें पाहातां वाड ।**
**सामर्थ्यें हि तैसीं च उघड ।**
**ते च परंपरेनें दुर्वाड ।**
**दुर्बल जाले ॥ ७२**

आपल्या अधोगतीचीं किती उदाहरणें देत बसावें ?

**ऐसें पाहातां हें सविस्तर ।**
**बहुत दिसोन आलें अंतर ।**
**करावयाचा निर्धार ।**
**निश्चयेंसीं ॥ ७४**

काय निर्धार करावा ? कशानें ही अवनति झाली म्हणून समजावें ? विचार केला पाहिजे, कारणें शोधलीं पाहिजेत, उपाय सुचविले पाहिजेत.

(२) संप्रदायाची काय स्थिति झाली आहे, ती आधीं नीट लक्षांत आणली पाहिजे. माझ्या पाहाण्यांत जे मठ आले, त्यावरून एकंदर मठाविषयीं माझ्या ज्या कांहीं कल्पना झाल्या, त्या मी चौदा वर्षांपूर्वी श्री रामदासी संशोधनाच्या पहिल्या खंडांत आरंभीं च सादर केल्या होत्या. कांहीं अपवादात्मक मठ सोडले तर बहुतेक मठांची स्थिति एकसारखी च आढळते :

(रा) हा संप्रदाय कां प्रवर्तित झाला, त्याचीं लक्षणें कोणतीं, त्याचें वैशिष्ट्य कशांत आहे, याविषयींची जाणीव सर्वत्र बुजलेली दिसते. नुसती जिज्ञासा हि कोणाच्या ठिकाणीं उरलेली दिसत नाहीं. आपण श्रीसमर्थांचे म्हणवितो, त्यांच्या नांवावर भिक्षा मागतो, त्यांच्या पुण्याईनें इनाम जमिनींचा उपभोग घेतो व चरितार्थ चालवितो, तर संप्रदायाच्या बाबतींत आपलें कांहीं कर्तव्य असलें पाहिजे, याची नुसती कल्पना हि कोणाच्या मनांत येत नाहीं. सर्वत्र सारखी अनास्था आढळते.

(म) आपण सांप्रदायिक आहोंत, याचा अर्थ भिक्षेवर चरितार्थ चालविण्याचा आपणांस हक्क आहे, एवढा च बहुधा केला जातो. इतर जसे

पोटाचे धंदे आहेत, त्यांतला च हा एक धंदा आहे, अशी समजूत झालेली आढळते. पोटासाठीं कोणी वकिली करतो, कोणी नोकरी करतो, कोणी दुकानदारी करतो आणि हा हक्कानें भिक्षा मागतो. चरितार्थापलिकडे या भिक्षेचा कांहीं अर्थ आहे, ही भिक्षा सामान्य नव्हे, तिच्या योगानें आपणांवर फार मोठी जबाबदारी येऊन पडते, याची कल्पना च नसते. अर्थात् मठपति होणें हा एक चरिर्थाचा च धंदा होऊन बसल्यामुळें इतर धंद्यांप्रमाणें या हि धंद्यांत भाऊबंदकीचीं भांडणें लागलेलीं असतात. ज्यांच्यांतील भांडणाचीं प्रकरणें सरकारांत गेलीं नाहींत, असे मठ बहुधा उरले नाहींत. मठांचें पारमार्थिक स्वरूप जाऊन त्यांना प्रापंचिक स्वरूप आल्याचें हें प्रत्यक्ष निदर्शक होय.

(दा) चरितार्थाव्यतिरिक्त कोठल्या हि मठांत देशस्थितीची चाळणा नाहीं, सार्वजनिक कार्याची विवंचना नाहीं, किंवा कोणता हि कार्यक्रम नाहीं. चरितार्थाशिवाय कोणापुढें च निराळें ध्येय उरलें नाहीं. संप्रदायाचें जें ध्येय होतें त्यावरून दृष्टि ढळलेली आहे. ध्येय नाहीं, बंधन नाहीं, कार्यक्रम नाहीं.

(स) नाहीं म्हणायाला बहुतेक मठांत उपासनेचीं बाह्य अंगें पाळण्यांत येतात. त्यावरून एकादा च दिवस जाऊन पाहणाऱ्या नवख्या मनुष्याचा निराळा ग्रह होण्याचा संभव असतो. जास्त दिवस राहून पाहिल्यास त्याच्या हि लक्षांत आल्यावांचून रहात नाहीं कीं, आपण जी पहात आहों ती निर्जीव यंत्राप्रमाणें नुसती क्रिया चाललेली असते, तींत प्राण नसतो. प्राण असता तर तळमळ असती, तळमळ असती तर हालचाल असती आणि हालचाल असती तर ती हालचाल करणारावर, पाहणारावर, शेजारच्यावर, समाजावर, राष्ट्रावर परिणाम घडलेला दिसला असता. पण सर्वत्र सामसूम झालेली च आढळत आहे.

(३) अशी स्थिति कां व्हावी. कालमाहात्म्य हें एक कारण ठरलेलें च आहे. पण त्याशिवाय इतर कांहीं कारणें मनांत येतात. मुख्य कारण म्हणजे संप्रदायांत भक्तिज्ञानवैराग्ययुक्त कोणी पारमार्थिक अधिकारी नियंता उरला नाहीं. ही कांहीं कोणाच्या हातची गोष्ट नव्हे. जो शरण येईल त्याचें पारमार्थिक कल्याण करण्याचें सामर्थ्य ज्याच्यांत असतें, तो च नियंत्रण

करूं शकणार नाहीं. त्या काळची गोष्ट निराळी. त्या काळीं प्रत्यक्ष श्रीसमर्थ होते. श्रीसमर्थ होते म्हणजे कोण होते ? श्रीसमर्थ काय नव्हते ? ते कवि होते, तत्त्वज्ञानी होते, राजकारणी पुरुष होते, तसे ते धर्मसंस्थापक, विश्वोद्धारक होते. देशाची, धर्माची, विश्वाची त्यांनीं चिंता केली. श्रीसमर्थ म्हणजे प्रत्यक्ष परमात्मा.

**तो परमात्मा केवळ । तयास नाहीं मायामळ ।**
**अखंड हेतूचा विटाळ । जाला च नाहीं ॥**
**दृश्य पदार्थ त्या निर्मळा । स्पर्शला च नाहीं ॥**

असा ईश्वरी पुरुष त्या काळीं संप्रदायाच्या अग्रभागीं होता. तेव्हां वैभवाला कांहीं उणें नव्हतें. सारी जनता त्यांची अंकित झाली होती. ती कर्तृत्वशक्ति आज कोणांत च नसल्यामुळें संप्रदायाला विस्खलितपणा आला आहे, संघटनेची विघटना झाली आहे.

**प्रत्ययज्ञानी वीतरागी । विवेकबळें सकळ त्यागी ।**
**तो जाणिजे महायोगी । ईश्वरी पुरुष ॥**

असा च पुरुष इतरांवर सत्ता चालवूं शकेल, संघ, समाज किंवा संप्रदाय याचें नियंत्रण करूं शकेल. आज संप्रदाय निर्नायक बनला आहे. याचा च अर्थ असा होतो कीं, असा कोणी शास्ता महापुरुष संप्रदायांत उरला नाहीं. त्यायोगें, राजकारणांत जसें अराजक माजतें, तशी संप्रदायांत आज निर्नायकता धुडगुस घालीत असून संप्रदायाला अकारण दूषण लागत आहे. त्याचीं, आमच्या अवलोकनांतील, दोन उदाहरणें सांगतां येतील. एका शहरीं आम्ही एक रामदासी पाहिले ! सकाळीं रामदासी वेष चढवून, झोळी व कुबडी घेऊन भिक्षा मागावयाची व तिसरा प्रहरीं साध्या वेषांत किटलेल्या भांड्यांत चहा घेऊन तो कोर्टकचेऱ्यांतून विकावयाचा, असा त्यांचा रोजचा क्रम असे ! दुसरें उदाहरण जास्त च गर्हणीय आहे. कल्याणच्या स्टेशनवरील गोष्ट. एकदा पुण्याकडे जाणाऱ्या गाडीची वाट पहात बाकावर बसलों असतां एक रामदासीबुवा–रामदासीबुवा म्हणजे रामदासी वेष धारण केलेले बुवा— जवळ आले आणि मला म्हणाले, नाशकास जावयाचें आहे, अमुक भाडें पडतें, पण आपल्या जवळ दोन च आणे कमी आहेत, तेवढे द्याल काय ? किती

सोपी मागणी होती आणि त्यांचा वेष पाहून ती कोणी नाकारावी ? पण मला काय वाटलें कोण जाणे, मी बुवास म्हणालों, बुवा, मला तुमच्या झोळींत हात घालूं द्याल, तर नाशकापर्यंतचें च काय, पण नागपुरापर्यंतचें भाडें मी तुम्हांस झोळींतून काढून देतों. हें ऐकतां च, बुवा समोर उभे होते ते जवळ बसले आणि गुजगोष्टी सांगूं लागले. काय करावें, तीन पोरं आणि त्यांची आई, एवढा प्रपंच मागें लागला आहे, सकाळपासून संध्याकाळपर्यंत, एकदां या प्लॅटफॉर्मवर तर एकदां त्या, याप्रमाणें प्रत्येक गाडीच्या वेळीं येऊन दोन दोन आणे मागावे, पुण्याकडे जाणारी गाडी असल्यास नाशकास जावयाचें आहे म्हणावें व नाशकाकडे जाणारी गाडी असल्यास पुण्यास जावयाचें आहे म्हणावें, तेव्हां कोठें सायंकाळपर्यंत दहा बारा आणे मिळतात. मी बुवास म्हणालों, बुवा, पापाचरण करून च पोट भरावयाचें असल्यास खुशाल भरा, पण हा वेष टाका; हा वेष धारण करून जें पाप करीत आहां, तें फार घोर आहे. तुम्ही स्वतःपुरती तर पुढची तयारी करीत च आहां, पण संप्रदायाचा भयंकर अपराध करून संप्रदायाला दूषण लावीत आहां ! त्यानंतर कल्याणवरून माझें अनेकदां जाणें झालें, पण नंतर केव्हां हि ते बुवा आढळले नाहींत.

असले अनेक प्रकार माझ्या निदर्शनास आले आहेत. कोणापुढें जाऊन रडावें ? कोणाकडे जाऊन गाऱ्हाणें करूं ? श्रोत्यांप्रमाणें वाचक हि 'परमेश्वर चि केवळ' मानून मी हें दुःख निवेदन करीत आहें. कोणी शास्ता उरला नाहीं, म्हणून हे असले प्रकार सररास घडत आहेत. कोणी नियंता असता, तर असल्या लाजिरवाण्या प्रकारांना आळा बसला असता. जेथें एका व्यक्तीच्या हातीं सत्ता नसते, तेथें सर्वांनीं मिळून व्यवस्था करावी लागते. तशी कधीं तरी केली जाईल काय ?

(४) संप्रदायाला कमीपणा येण्याचें दुसरें कारण असें कीं, कांहीं अपवाद सोडले, तर वरपासून खालपर्यंत बहुतेक मठपति, आपलें मूळ स्वरूप विसरून घरबारी बनले आहेत. मठपति म्हणवून घेण्यापेक्षां इनामदार किंवा जहागीरदार म्हणवून घेण्यांत त्यांना जास्त भूषण वाटतें. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, मठपतीच्या कर्तव्याची कल्पना हि त्यांच्यांतील नष्ट होऊन जहागीरदारीचे सर्व दोष त्यांच्या अंगीं, त्यांना न कळत, येऊन

चिकटले आहेत. एका मठांत एकदां संशोधनार्थ गेलों असतां, माझा पेशा वकिलीचा आहे हें मठपतींना कळतां च, कागदपत्रें किंवा बाडें दाखविण्यापूर्वीं, आदल्या च दिवशीं त्यांच्यावर बजावण्यांत आलेलें प्रतिवादीचें समन्स त्यांनीं मजपुढें टाकून माझा सल्ला विचारण्यास सुरुवात केली. तात्पर्य, श्रीसमर्थांच्या वेळचे महंत आज कोठें हि पहावयास मिळत नाहींत.

(५) परमार्थांत केवळ पुत्रपरंपरेनें अधिकार प्राप्त व्हावा, हें मला विचित्र वाटतें. संप्रदायाची अवनति होण्याला हें एक प्रबळ कारण झालें आहे व होत आहे, असें मी पाहतों. परमार्थ ही काय पार्थिव संपत्ति आहे, तर ती बापापासून मुलाला आणि मुलापासून नातवाला हटकून देतां येईल किंवा दिली जावी ? या पुत्रपरंपरेनें संप्रदायाचें किती नुकसान केलें आहे, याचीं दहा पांच उदाहरणें मी सहज देऊं शकेन. पण त्यांची काय जरूरी आहे ? बापाची पारमार्थिक योग्यता मुलांत उतरली च पाहिजे, असा कांहीं नियम आहे काय ?

(६) संप्रदायाला प्रस्तुतचें स्वरूप प्राप्त होण्याला आणखी एक कारण मला असें वाटतें कीं, खोटें जरी कोणी बोलत नसले, तरी खरें कोणी च बोलत नाहींत. गुरु खरें सांगत नाहींत, शिष्य खरें मानीत नाहींत, तिऱ्हाईत कोणी बजावीत नाहींत. आपलें भांडवल किती आहे, तें न सांगतां, आहे त्याहून जास्त भासविण्याचा प्रयत्न गुरूचा असतो व हें लक्षांत येऊन हि, स्वार्थावर नजर ठेवून मनांत आलेले विचार शिष्य दाबून ठेवीत असतो. निर्भीडपणें कोणी च बोलेना. ही स्थिति उभय पक्षीं अपायकारक होय. आडांत च पाणी नसेल तर पोहऱ्यांत कोठून येणार, अशी म्हण च आहे. आणि आडांत च खारट पाणी असेल तर पोहऱ्यांत तरी गोड कोठून येणार ?

**बरें सत्य बोला यथातथ्य चाला।**

हा उपदेश श्रीसमर्थांनीं मुलांना केला असला, तरी आपण सर्व जण त्यांचीं मुलें च आहोंत. तो आपणांस हि आहे, असें समजून मंत्रानुग्रह करणारे आणि करवून घेणारे या उभयतांनीं मानला पाहिजे. मठांतील पुरुष परंपरेच्या नांवावर उपदेश देत असतात आणि देणारा आणि घेणारा, दोघे हि ज्ञानाच्या नांवानें कोरडे असतात. कांहीं विशेष धूर्त असतात, ते ज्ञानाचा आव आणीत असतात, पण तो पोकळ असतो. सरळ मार्ग म्हणजे

गुरूनें स्पष्ट कबूल करावें, आपणाजवळ च कांहीं नाहीं, तर आपण देणार काय, दोघे हि आपण श्रीसमर्थांना च शरण जाऊं, त्यांच्या पाशीं हट्ट धरूं, त्यांच्या पाशीं च अनुग्रह मागूं, हा च माझा तुला उपदेश आहे व तेवढ्यापुरतें वाटल्यास तूं मला गुरु मान. हा च प्रामाणिकपणाचा मार्ग श्रेयस्कर होय व त्यांत च दोघांचें हि कल्याण आहे. गुरु ही पदवी फार मोठी आहे. पांचव्या दशकाचा दुसरा समास व आठव्या दशकाचा नववा समास हे दोन समास वाचून पहा. लोकांच्या भोळेपणाचा फायदा घेण्यानें आपला स्वार्थ साधत असेल, पण त्यांत आपलें कल्याण नसतें. चोवीस तास म्हणजे अखंड ज्याचें स्वरूपानुसंधान राहतें, तो च गुरु. किती कठीण काम आहे ! मग आपण अकारण गुरूचा धंदा करून त्या थोर पदवीची चेष्टा कां करावी आणि लोकांकडून आपल्या संप्रदायाची चेष्टा करवून कां घ्यावी ?

(७) याप्रमाणें अनेक दोषांनीं आपला संप्रदाय पछाडला गेला आहे. हें दोषांचें विवेचन करण्यांत माझा दुसरा कोणता हि हेतु नाहीं. श्रीसमर्थकालीं महाराष्ट्राची जी सुस्थिति होती, ती त्यास पुनरपि प्राप्त झाली पाहिजे, एवढें च मला समजतें व ती प्राप्त होण्याला श्रीसमर्थांच्या कृपेवांचून दुसरा मार्ग नाहीं, असें माझ्या मनानें घेतलें असल्यामुळें, आपल्यांतील गुणदोषांचें विवेचन करण्याला मला संकोच वाटत नाहीं. संप्रदायाचा उणेपणा तो आपल्या प्रत्येकाचा उणेपणा होय. ज्याला आत्महित साधावयाचें असतें त्यानें आपल्यांतील गुणदोषांची अखंड चाळणा केली पाहिजे. आपल्यांतील दोषांकडे डोळेझांक करणें आत्मघातकीपणाचें होईल. स्वतःतील दोषांची जाणीव करून घेणें हा उन्नतिपथावरील पहिला टप्पा मानतात. बद्ध, मुमुक्षु, साधक, सिद्ध या जशा जीवाला चार अवस्था असतात, तशा च त्या संप्रदायाला किंवा कोणत्या हि संस्थेला असतात, असें दिसतें. आपले दोष आपण च पाहणें, आपण च आपली निंदा करूं लागणें, हें बद्धदशा संपून मुमुक्षुदशा सुरू झाल्याचें लक्षण होय. त्याप्रमाणें या प्रकरणांत आपण संप्रदायांतील वैगुण्याचा विचार करीत आहोंत. तीं वैगुण्यें नाहींशीं होण्यासाठीं पुढील प्रकरणांत आपण उपाय सुचवूं व त्यांचा अवलंब करूं, तेव्हां संप्रदायाची मुमुक्षुदशा संपून साधकावस्था सुरू झाली, असें म्हणतां येईल. त्या पुढची सिद्धदशा क्रमप्राप्त होय. ती प्राप्त झाल्याशिवाय राहत नाहीं.

(८) संप्रदायाच्या साधकावस्थेला सुरुवात झाली च आहे, असें भासतें. मठपति जागे होऊं लागले आहेत. मठाबाहेर जी सामान्य जनता आहे, तिच्यांत श्रीसमर्थांविषयीं भक्तिप्रेम वाढत आहे. श्रीसमर्थकार्याविषयीं सर्वत्र जिज्ञासा आणि आस्था हीं प्रत्ययास येत आहेत. गेल्या पन्नास वर्षांत च सत्कार्योत्तेजक सभा स्थापन होऊन तिनें श्रीसमर्थकार्याकडे विशेष लक्ष पुरविलें. या च अवधींत श्रीसमर्थप्रताप, श्रीदासविश्रामधाम, श्रीस्वानुभवदिनकर, श्रीरामसोहळा इत्यादि कित्येक अप्रतिम ग्रंथ प्रथम च प्रकाशित झाले. सभेचें प्रकाशनकार्य अखंड चालू च आहे. या च अवधींत पालख्यांचा सोहळा सुरू झाल्यामुळें सर्वत्र जागृति होण्याला एक उत्कृष्ट साधन झालें आहे. बृहन्महाराष्ट्राच्या मदतीनें श्रीसमर्थांच्या जन्मभूमींत जन्मस्थानीं त्यांचें मंदिर उभारलें गेलें, ही अपूर्व गोष्ट या च अवधींत घडली. त्या मंदिराची व्यवस्था हि विश्वस्तपत्रानें फार नमुनेदार करण्यांत आली आहे. बृहन्महाराष्ट्रियांना एकत्र जमण्याचें तें एक केंद्रस्थान व्हावयाचें आहे. असें त्या मंदिराचें भवितव्य आहे. मठामठांतील व इतर हि कांहीं ऐतिहासिक घराण्यांतील हस्तलिखित पोथ्यापुस्तकांचें व कागदपत्रांचें संशोधन या च पन्नास वर्षांच्या काळांत होऊन त्यांच्या संरक्षणार्थ धुळें येथें श्रीसमर्थवाग्देवतामंदिर उभारण्यांत येऊन तें विश्वस्तांच्या हवालीं करण्यांत आलें आहे. श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धार मंडळ स्थापलें गेलें आहे. श्रीसमर्थसंघ निर्माण झाला असून त्याच्या शाखा सर्वत्र निघत आहेत. अशा रीतीनें जरी अनेक प्रकारांनीं जनतेचें लक्ष श्रीसमर्थचरणाकडे लावण्याचे प्रयत्न होत आहेत, तरी तेवढयावरून आजची संप्रदायाची स्थिति समाधानकारक आहे, असें म्हणतां येत नाहीं. पूर्ण यश अजून फार दूर आहे. प्रयत्नाची शतपट वाढ झाली पाहिजे. आमचें भक्तिप्रेम सहस्रपट उत्कट झालें पाहिजे.

(९) तें कसें व्हावें, याचा विचार पुढील प्रकरणांत करूं. या प्रकरणांत उतारे देण्याचें मी मुद्दाम टाळलें आहे, पण श्रीसमर्थवाङ्मयाशीं ज्यांचा दृढ परिचय आहे, त्यांच्या हें सहज लक्षांत येईल कीं, हें हि प्रकरण मी श्रीसमर्थग्रन्थांना विचारून च लिहिलें आहे.

## ( ३ ) संप्रदायाचें पुढचें स्वरूप

( १ ) संप्रदायाचें भविष्य उज्ज्वल असून तें ठरलेलें आहे, असें म्हणण्यास इतिहासाचा आधार आहे—( २ ) तो इतिहास गिरिधरांनीं लिहून ठेवलेला आहे—( ३ ) गिरिधरांप्रमाणें मेरुस्वामी, दिनकर आणि स्वतः समर्थ यांनीं त्या इतिहासाचा उल्लेख केला आहे—( ४ ) आपल्यावरील जबाबदारी फक्त श्रीसमर्थांची शेवटची आज्ञा पाळणें—( ५ ) ती आज्ञा १२×१० त आहे, त्या समासाचें स्वरूप—(६) असा उत्तम पुरुष आणि त्याचे अनुयायी—( ७ ) शुद्ध संकल्पाचें महत्त्व—( ८ ) श्रीसमर्थसंघ, त्याचें स्वरूप, त्याच्या हजारों हजार शाखा—( ९ ) समर्थमुखींचें वाक्य घडोनि येईल.

**येथुनी वांचती सर्वै । ते ते सर्वत्र देखती ।**
**सामर्थ्य काय बोलावें । आनंदवनभूवनीं ॥ १**

**बोलणें वाउगें होतें । चालणें पाहिजे बरें ।**
**पुढें घडेल तें खरें । आनंदवनभूवनीं ॥ २**

**स्मरलें लिहिलें आहे । बोलता चालता हरी ।**
**काय होईल पाहावें । आनंदवनभूवनीं ॥ ३**

( १ ) मागच्याच्या मागील प्रकरणांत श्रीसमर्थकालीन संप्रदायाच्या स्पृहणीय आणि आनंददायक स्वरूपाचा आपण विचार केला आणि मागील प्रकरणांत सद्यःकालीन संप्रदायाची शोचनीय आणि दुःखकारक पण आशादायक स्थिति पाहिली. या प्रकरणांत आतां आपणांस मनानें भविष्यकाळांत संचार करून संप्रदायाचें भवितव्य काय, याची कल्पना करावयाची आहे. संप्रदायाची कुंडली मांडून गणित करणें नलगे. भवितव्य ठरलेलें आहे. श्रीसमर्थांनीं च तें सांगून ठेवलेलें आहे. तेव्हां वाउगें बोलत न बसतां, श्रीसमर्थांच्या आज्ञेचें पालन करून त्यांची इच्छा सफल करणें, एवढें च श्रीसांप्रदायिकांचें काम आहे.

**समर्थ म्हणती स्वल्पारंभा क्षेमकरा ।**
**पुढें उत्कट करणें आहे सर्वेश्वरा ।**
**वज्रदेहपरंपरा । आकल्प श्रीरामसंस्थान ॥** प्र. १९-८२

" अल्प कां होईना, पण आज आरंभ होऊं द्या, त्यांत च कल्याण आहे, कालांतरानें विशेष उत्कर्ष होणार आहे, तसा ईश्वराचा मनोदय आहे, आपली परंपरा कोणाची आहे म्हणून समजता ? ती चिरंजीव वज्रदेही हनुमंताची आहे, ती कल्पांतापर्यंत टिकणारी आहे " असा श्रीसमर्थांच्या या म्हणण्याचा आशय आहे. श्रीसमर्थ तरी कोणाच्या विश्वासावर अवलंबून कल्पांतापर्यंतचें भविष्य सांगत आहेत ? त्यांना विश्वास प्रत्यक्ष श्रीरामचंद्राचा व त्यांनीं हनुमंतास केलेल्या आज्ञेचा आहे. हा इतिहास आहे, ती दंतकथा नव्हे. गिरिधर, मेरुस्वामी, दिनकर आणि स्वतः श्रीसमर्थ यांनीं हा इतिहास लिहून ठेवलेला आहे.

(२) श्रीसमर्थप्रतापाच्या दुसऱ्या समासांत गिरिधर लिहितात, श्रीसमर्थ लग्नसमारंभांतून निसटले आणि पंचवटीस जाऊन

**समर्थें मिठी घातली श्रीचरणकमळीं ।**
**येक मुहूर्त मानसपूजा संपूर्ण केली ।**
**उठोनि सप्रेमें डोळां जंव देखिली ।**
**तंव ब्रह्मगोळीं परिपूर्ण श्रीराम पूजिला ॥ ८२**

आणि कल्पांतापर्यंत अशी च पूजा घडावी, असा मनांत संकल्प केला—

**श्रीराम पूजूनि पूजा हेतु उरला ।**
**आकल्प पूजनाचा संकल्प केला ॥ ८३**

नंतर राम आणि समर्थ यांचीं भाषणें झालीं, वास्तविक दोघे एक च, परंतु दोघांनीं परस्परांची स्तुति केली. शेवटीं श्रीसमर्थांनीं रामाची प्रार्थना केली कीं,

**श्रीरामदास आम्ही सर्व हि त्वद्रूपें ।**
**देव दानव मानव तुझीं च स्वरूपें ।**
**आत्माराम तुम्ही निजात्मरूपें ।**
**धर्मस्थापना करावी ॥ ८९**

त्यावर श्रीराम प्रत्युत्तर करितात—

**श्रीरामदास तुम्ही सर्व हि मद्रूपें**
**देव दानव मानव माझीं च स्वरूपें ।**
**आत्माराम मी निजात्मरूपें ।**
**धर्मस्थापना करीन हे ॥ ९१**

**आतां धर्मस्थापना करावी तुम्ही ।**
**सेव्यसेवकभावें ऐक्य तुम्ही आम्ही ।**
**सकळ साधुसंतसंकल्प कर्मभूमीं ।**
**सिद्धीसी नेईन निर्धारें ॥ ९२**

याप्रमाणें परस्परांचीं उत्तरप्रत्युत्तरें होऊन श्रीरामचंद्रांनीं श्रीसमर्थांना हनुमंताच्या हातीं देऊन, समर्थांचा आकल्प संकल्प सिद्धीस न्यावा, अशी हनुमंतास आज्ञा केली.

असा या संप्रदायाच्या सुरुवातीचा इतिहास आहे. प्रत्यक्ष रामानें अंगिकार करून समर्थांचा आकल्प पूजनाचा संकल्प सिद्धीस न्यावा, अशी हनुमंताला आज्ञा केली असल्यामुळें या संप्रदायाच्या भवितव्याविषयीं शंका कोठें उरली ? या संप्रदायाचा अभिमान रामाला आणि मारुतीला आहे. आपण चिंता करणें नको. तथापि चिंता जरी नाहीं, तरी आपलीं कांहीं कर्तव्यें आहेत, त्यांचा आपण थोड्या वेळानें विचार करूं. आतां येथें आपण एवढें च समजून घ्यावयाचें आहे कीं,

**श्रीरामसमर्थउपासना ।**
**आकल्प संकल्प परंपरा जाणा ।**
**धर्मस्थापना जगज्जीवना ।**
**भरतखंडीं करणें असे ॥ ९७**

श्रीसमर्थांच्या अवताराचा हा च हेतु प्रतापाच्या शेवटीं शेवटीं हि गिरिधरांनीं सांगितला आहे :

**श्रीराम समर्थ सामर्थ्यरूपें सर्वत्र असती ।**
**भक्तितरूसी छेदितां चमत्कार दाविती ।**
**अवतारसंकल्प किं श्रीरघुनाथमूर्ति ।**
**आकल्प भजन वाढवावें ॥** प्र. २०–६९

(३) हा च प्रसंग दिनकरांनीं स्वानुभवदिनकराच्या १९ व्या कलापाच्या ९ व्या किरणांत व १६ व्याच्या ४ थ्यांत सविस्तर वर्णिला आहे आणि मेरुस्वामींनीं अकराव्या रुद्राच्या पहिल्या उल्लासांत त्याचा ओझरता उल्लेख केला आहे. श्रीसमर्थांनीं स्वतः 'फणिवर उठवीला' या १४४ व्या करुणाष्टकांत मारुतिरायाला या प्रसंगाचें च स्मरण करून दिलें आहे :

**तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे।**
**म्हणउनि मन माझें रे तुझी वास पाहे।**
**मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें।**
**सकळिक निजदासांलागि सांभाळवीले॥ ५**

यांत मारुतिरायाला श्रीसमर्थांनीं दोन गोष्टींची आठवण करून दिली आहे. (१) तुमच्या हवालीं मला रामरायानें केलें आहे आणि (२) जे जे रामाचे शरणागत असतील त्यांचा सांभाळ करावा अशी तुम्हांस रामाची आज्ञा आहे. आपल्या संप्रदायाला याचा केवढा आधार वाटला पाहिजे ! पण त्याचें स्मरण आम्हांस तरी कोठें आहे ! श्रीसमर्थपरंपरेचें असें सामर्थ्य असतां आज आपण अज्ञानामुळें दुबळे होऊन बसलों आहोंत !

**समर्थाचिया सेवका वक्र पाहे।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे॥**

याप्रमाणें श्रीसमर्थांनीं जगाला केलेल्या आव्हानावर आमचा विश्वास आहे, असें आमच्या वर्तनावरून कोणास तरी वाटेल काय ? विश्वास असणार च कसा ? रामाचे वा श्रीसमर्थांचे आम्ही एकनिष्ठ सेवक असूं, तर ना हा विश्वास आमच्या ठिकाणीं उत्पन्न होईल ? असो, असली आमची परंपरा आहे, पण तिचें ज्ञान आम्हांस नाहीं. तें ज्ञान आम्हांस होईल तर च आमच्या वाटेस कोणी जाणार नाहीं व आमचें पाऊल सारखें पुढें च पडत राहील.

(४) तात्पर्य, संप्रदायाचें भवितव्य श्रीसमर्थांनीं ठरवून टाकलेलें आहे. त्या संप्रदायाचें कसें होणार हा प्रश्न आपणांपुढें नसून श्रीसमर्थांच्या आज्ञा आपण पाळणार, कां नाहीं, हा आहे. परंपरेनें सांप्रदायिकांचा सांभाळ करण्याचा पतकर हनुमंतानें घेतला आहे. त्या परंपरेप्रमाणें आपण वागणार, कां नाहीं, असा प्रश्न आपणांपुढें आहे. आपण श्रीसमर्थांचें तत्त्वज्ञान

समजून घ्यावें, त्यांच्या आज्ञा निष्ठेनें पाळाव्या आणि संप्रदायाच्या भवितव्याची चिंता करण्याचें त्यांच्यावर आणि मारुतीरायावर सोंपवावें. शंभर वेळां बोलावें लागलें तरी मी बोलेन कीं, भक्तिभावाच्या वरपंग सोंगानें आणि ढोंगानें आपण इतर कोणाला हि फसवूं, पण समर्थांना फसवूं शकणार नाहीं. आपल्या अंतरंगाचे ते साक्षी आहेत. खऱ्या आणि खोट्या नाण्याचे ते परीक्षक आहेत. म्हणून म्हणतों, आपण आपल्या मनाशीं च निश्चय केला पाहिजे. एकांतांत बसलें पाहिजे, त्यांच्या चरणीं देहार्पण केलें पाहिजे, त्यांच्या आज्ञा पाळल्या पाहिजेत आणि मग

**वक्रदृष्टीं पाहातां भरील त्याचा घोंट ।**
**काळाचें हि पोट फाडूं शके ॥**

याचा अनुभव येतो किंवा नाहीं, हें पाहिलें पाहिजे. त्यांच्या आज्ञा आणि त्यांची एकंदर शिकवण आपण येथवर पहात च आलों. पण या समयीं मला, त्यांनीं निर्याणाच्या वेळीं केलेल्या शेवटच्या आज्ञेचें स्मरण होत आहे. आपण जगांत—घरीं आणि दारीं—पाहतों कीं, घरांतील वडील माणसें जन्मभर आपणांस आपल्या कल्याण्यासाठीं बोध करीत च असतात आणि हिताच्या गोष्टी सांगत च असतात, पण आपण त्यांतलें किती ध्यानांत ठेवीत असतो आणि आचरणांत आणीत असतो? पण घरांतील कर्ता पुरुष जाते समयीं अगदीं शेवटच्या क्षणीं जें कांहीं करावयास सांगतो, त्याचें मात्र स्मरण आपणांस सदैव रहात असतें. आपल्या संस्कृतींत वाढलेले असे क्वचित् कोणी निघत असतील, कीं जे वडिलांच्या निर्याणाच्या वेळच्या हि सांगण्याची अवज्ञा करीत असतील. हें माझें म्हणणें बरोबर असेल तर श्रीसमर्थ हि जाते वेळीं जी शेवटची आज्ञा करून गेले ती आपण पाळावयास नको काय? बाकीच्या त्यांच्या हजारों आज्ञा पाळा वा नका पाळूं, पण त्यांनीं शेवटच्या क्षणीं आपणांस जें करावयास सांगितलें तें आपण न करूं तर तो स्वामीद्रोह होईल. त्यांची तेवढी तरी आज्ञा आपण मनोभावें पाळूं, तर त्यांत स्वतःचें कल्याण तर साधूं च, पण संप्रदायाचें उज्ज्वल भवितव्य घडवून आणण्यास हि त्यायोगें मदत केल्यासारखें होईल. त्यांची शेवटची आज्ञा—

**आमची प्रतिज्ञा ऐसी ।**
**कांहीं न मगावें शिष्यासी ।**

**आपणामागें जगदीशासी ।**
**भजत जावें ॥ १२–१०–३४**

माघांत श्रीसमर्थ गेले आणि ग्रन्थराजांत ही ओवी त्यांनीं मार्गशीर्षांत म्हणजे दोन च महिने आधीं घातली, असें श्रीसमर्थशिष्य तंजावरमठपति भीमस्वामी सांगतात. तसें असलें किंवा नसलें तरी ओवींत च श्रीसमर्थ आपल्या पश्चातच्या काळाचा उल्लेख करीत आहेत, तेव्हां ही त्यांची शेवटची आज्ञा होय, असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं. या वेळीं मला मेरुस्वामींची एक ओवी आठवते. ती कोणत्या हि अन्य प्रसंगाबद्दल असली, तरी मला ती अनुरूप वाटते. तींत थोडा फरक करून मी म्हणतों

**अंत समयीचें निरवणें ।**
**जैसें जिवलगीं जीवीं धरणें ।**
**तैसीं निर्वाणीचीं हीं श्रीसमर्थवचनें ।**
**हृदयीं धरा ॥**

आणि संप्रदायाच्या भवितव्याविषयीं निशंक रहा, कांहीं काळजी करूं नका.

(९) आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥ ही आज्ञा बाराव्या दशकांतील उत्तमपुरुषनिरूपणांत ग्रथित केलेली आहे. उत्तमपुरुषनिरूपणाचे दासबोधांत दोन समास आहेत: एक, बाराव्याचा दहावा व दुसरा अठराव्याचा सहावा. हा अठराव्याचा सहावा समास केवळ श्री शिवाजी महाराजांना अनुलक्षून आहे. बाराव्याच्या दहाव्या समासांत, जो उत्तम पुरुष असेल त्यानें कसें वागावें, याचे पांच पन्नास नियम श्रीसमर्थांनीं सांगितले आहेत. ते मी अनेकदां वाचले आहेत, त्यावरून माझें मत असें झालें आहे कीं, ज्याला आज आपण पुढारी समजतो, त्याचे गुण या समासांत दिले आहेत. पुढारी किंवा नेता म्हटला म्हणजे त्याचा अनुयायीवर्ग असणार च. अशा पुढाऱ्यानें भजन करावयाचें म्हणजे तें अनुयायांच्या समवेत केलें पाहिजे. हा सबंध समास वाचला, किंवा निदान ही ओवी जेथें आली आहे त्याच्या मागच्या आणि पुढच्या चार चार, पांच पांच ओव्या पाहिल्या म्हणजे स्पष्ट दिसतें कीं, 'आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥' तें भजन सर्वांनीं मिळून करावयाचें आहे.

माझ्या मतें, हा समास, समुदाय करून संघटना करावयास शिकवीत

आहे. गांवोगांवीं एक तरी असा उत्तम पुरुष म्हणजे कार्यकर्ता नेता असावा, म्हणजे लोक आपोआप त्याच्या मागें येतील व तो हि लोकांना जवळ करील. हें च सांप्रदायिकांचें कर्तव्य व संप्रदायाचें उज्ज्वल भवितव्य घडवून आणण्याला तें च त्यांनीं केलें पाहिजे. १२×१० तील गुणांनीं आपण मंडित व्हावें व आपल्या अनुयायांच्या ठिकाणीं त्या गुणांचें बीजारोपण करावें. एवढें साहाय्य आपण संप्रदायाला केलें म्हणजे त्याच्या भवितव्याची निराळी चिंता वाहणें नको. मग ती चिंता भगवंतास लागेल. आपण पुढील सतरा गोष्टी कराव्या—

(१) उत्तम गुण स्वयें घ्यावे। ते बहुतास सांगावे।
वर्तल्याविण बोलावे। ते शब्द मिथ्या ॥ ३

(२) स्नान संध्या देवार्चन। येकाग्र करावें जपध्यान।
हरिकथा निरूपण। केलें पाहिजे ॥ ४

(३) शरीर परोपकारीं लावावें। बहुतांच्या कार्यास यावें।
उणें पडों नेदावें। कोणीयेकाचें ॥ ५

(४) आडलें जाकसलें जाणावें। यथानशक्ति कामास यावें।
मृदवचनें बोलत जावें। कोणीयेकासी ॥ ६

(५) दुसऱ्याच्या दुःखें दुःखवावें। परसंतोषें सुखी व्हावें।
प्राणीमात्रास मेळऊन घ्यावें। बऱ्या शब्दें ॥ ७

(६) बहुतांचे अन्याये क्षमावे। बहुतांचे कार्यभाग करावे।
आपल्यापरीस व्हावे। पारखे जन ॥ ८

(७) दुसऱ्याचें अंतर जाणावें। तदनुसार चि वर्तावें।
लोकांस परीक्षित जावें। नाना प्रकारें ॥ ९

(८) नेमक चि बोलावें। तत्काळ चि प्रतिवचन द्यावें।
कदापी रागास न यावें। क्षमारूपें ॥ १०

(९) आलस्य अवघा च दवडावा।
येत्न उदंड चि करावा।
शब्दमत्सर न करावा। कोणीयेकाचा ॥ ११

(१०) उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा।
शब्द निवडून बोलावा।

सावधपणें करीत जावा।
संसार आपला ॥ १२

(११) मरणाचें स्मरण असावें।
हरिभक्तीस सादर व्हावें।
मरोन कीर्तीस उरवावें। येणें प्रकारें ॥ १३

(१२) उद्दंड धिःकारून बोलती।
तरी चळों नेदावी शांति।
दुर्जनास मिळोन जाती।
धन्य ते साधु ॥ १६

(१३) स्वयें आपण कष्टावें।
बहुतांचें सोसित जावें।
झिजोन कीर्तीस उरवावें।
नाना प्रकारें १८

(१४) परांतरास न लावावा ढका।
कदापि पडों नेदावा चुका।
क्ष्मासीळ तयाच्या तुका।
हानी नाहीं ॥ २०

(१५) आपलें अथवा परावें।
कार्य अवघें च करावें।
प्रसंगीं कामास चुकवावें।
हें विहित नव्हे ॥ २१

(१६) बरें बोलतां सुख वाटतें।
हें तों प्रत्यक्ष कळतें।
आत्मवत परावे ते।
मानीत जावें ॥ २२

(१७) आपल्या पुरूषार्थवैभवें।
बहुतांस सुखी करावें।
परंतु कष्टी करावें।
हे राक्षसी क्रिया ॥ २७

या सतरा गोष्टींचा विचार केला तर असें दिसतें कीं, यांपैकीं प्रत्येक गोष्टीचें

अनुसंधान समुदाय करण्याकडे आहे. एका हि बाबतींत केवळ एकट्या च व्यक्तीपुरतें पाहणें नाहीं. प्रत्येक गोष्टींत इतरांशीं संबंध आला आहे. एकाद्याच्या ठिकाणचे हे गुण लोकांच्या प्रत्ययास आले म्हणजे लोक आपोआप त्याकडे ओढले जातात, आणि त्यास मग कोणत्या हि बाबतींत कांहीं कमी पडत नाहीं.

**नेमकपणें वर्तों लागला । तो बहुतांस कळों आला ।**
**सर्व आर्जवी तयाला । काये उणें ॥ १४**

इतकें च नव्हे, तर अशा च पुरुषाच्या भजनानें, श्रीसमर्थ सांगतात, जगदीश संतुष्ट होऊन त्याचे मनोरथ पूर्ण करतो—

**ऐसा उत्तम गुणी विशेष । तयास म्हणावें पुरुष ।**
**जयाच्या भजनें जगदीश । तृप्त होये ॥ १५**

(६) अशा पुरुषाचा लौकिक कानावर आला म्हणजे त्याच्या दर्शनस्पर्शनासाठीं भाविक लोक उतावीळ होऊन या गांवाहून त्या गांवीं व त्या गांवाहून या गांवीं त्याला धुंडीत फिरतात.

**जो उत्तम गुणें शोभला ।**
**तो चि पुरुष माहा भला ।**
**कित्येक लोक तयाला । शोधीत फिरती ॥ २९**

**मनापासून भक्ति करणें ।**
**उत्तम गुण अगत्य धरणें ।**
**तया माहां पुरुषाकारणें । धुंडीत येती ॥ ३१**

अशी च स्थिति श्रीशिवाजीराजांची झाली होती. श्रीसमर्थांच्या दर्शनाची तळमळ लागून ते असें च गांवोगांवीं त्यांच्या शोधार्थ फिरल्याचें आपण बखरींत वाचतो व तो प्रसंग डोळ्यापुढें आणून च श्रीसमर्थांनीं या ओंव्या लिहिल्या असतील काय, असें माझ्या मनांत येऊन जातें.

लोकांना अशा पुरुषाच्या दर्शनाची उत्कंठा लागलेली असते आणि अशा पुरुषाला हि, लोकांनीं आपल्या जवळ यावें, आपण सांगतों तें ऐकावें व स्वतःचें आणि जगाचें कल्याण करून घ्यावें, अशी अपेक्षा असते. लोकांना असा मार्गदर्शक नेता पाहिजे असतो व नेत्याला आज्ञाधारक

अनुयायी पाहिजे असतात. दोन्ही बाजु सारख्या च उतावीळ झालेल्या असतात. लोकसंग्रह करणें हें अशा महापुरुषाचें कर्तव्य च असतें. तें च श्रीसमर्थांनीं स्वतः केलें व त्याला अनुसरून च त्यांची अंतसमयींची आज्ञा आहे कीं, आपणामागें जगदीशासी भजत जावें. कारण

**या राघवाचें भजन सौख्यकारी । दुखशोकापहारी ॥ ध्रु०**
**भक्ताभिमानी देव सोडवितो जीव । नाना चिंता निवारी ॥ १**
**नित्य निरंतर जाणतो अंतर । मनासारिखें करी ॥ २**
**दुर्जनां संव्हार सज्जनां आधार । तो हा कोदंडधारी ॥ ३**
**अंतरीं ह्व्यास पुरते भडस । सत्ता समस्तांवरी ॥ ४**
**अनन्य शरण चिंतितो चरण। रामदास भिकारी ॥ ५ ॥**

रामदास भिकारी ! कोणाच्या दारचे ?

**दाता येक रघुनंदन। वरकड लंडी देईल कोण।**
**तया सांडून आम्ही जन। कोणाप्रती मागावें ॥**

(७) उत्तम पुरुषाच्या सकल गुणांनीं जरी नाहीं, तरी कांहीं कांहीं गुणांनीं अलंकृत असा प्रत्येक गांवीं एक आणि त्याचे होतील तितके अनुयायी, यांचा संघ असावा. कठीण गोष्ट नव्हे. श्रीसमर्थांविषयीं भक्तिप्रेमादर बाळगणारी मंडळी गांवोगांवीं आहेत. त्यांनीं वरील उत्तम गुण सतत दृष्टीपुढें ठेवावे व शक्य तितके आचरणांत आणावे. हें कांहीं च न साधलें तर सद्यःस्थिती-कडे पाहून त्यांना दुःखाचा एक उष्ण श्वास टाकतां येईल, नेत्रावाटें उष्ण अश्रुबिंदु ढाळतां येईल. ती हि भावी सुस्थितीला मदत च होईल. असा श्वास किंवा अश्रुबिंदु कधीं वाया जात नसतो. परमेश्वराच्या भक्तानें हताश होऊन काढलेला एकांतांतील उद्गार देवाच्या कानावर जातो. त्यानें दुःखानें टाकलेल्या श्वासानें वा ढाळलेल्या अश्रुबिंदूनें देवाला चटका बसतो. भक्ताचें दुःख देवाला जाणवतें.

**अंतरींची वेथा श्रीरामा समर्था ।**
**जाणवल्या चिंता दुरी करी ॥** स्फु. ओ. ६१–५

या संप्रदायाचा पतकर श्रीराम, श्रीहनुमंत आणि श्रीसमर्थ यांनीं घेतलेला आहे. त्याच्या भवितव्याची चिंता त्यांना आहे, आपणांस नको. तें भवितव्य ठरलेलें आहे. तें त्या त्रिवर्गानें निश्चित केलेलें आहे. त्यांत आपणासारख्या

सामान्य माणसांचें कर्तव्य इतकें च कीं, त्यांच्या अवताराची वाट पहात, शुद्ध संकल्प करीत, संघटित होऊन जगदीशाचें भजन करावयाचें.

या शुद्ध संकल्पावर माझा फार विश्वास आहे. एकादा हि पुण्यवान् पुरुष जो संकल्प करतो, तो सिद्धीस जातांना जर आपण पाहतो, तर सर्व जनता, फांटे न फोडतां, जो एक च एक शुद्ध संकल्प करील तो सफल झाल्यावांचून कदापि राहणार नाहीं. म्हणून शरीरानें दुर्बल पण मनानें खंबीर अशा व्यक्तीनें किंवा संघटित समाजानें निराश होण्याचें कांहीं कारण नसतें. हताश होऊन, अवनतीमुळें हृदय पिळवटून निघालें असतां, मुखावाटें सहज प्रकट होणारी वाणी कोणाच्यां तरी कानीं पडते. परमेश्वर दयाळु तसा च न्यायी आहे. कोणी परमेश्वरास ओळखत नसाल तर शक्ति माना, नियति माना, पण तिचा हा न्याय आहे. म्हणून वैभवकाळीं मदांध न होण्याविषयीं जपावें लागतें व संकटकाळीं निराश होण्याचें कारण नसतें. शुद्ध संकल्पाची अशी महती आहे. शुद्ध संकल्पाला अपयश ठाऊक नसतें. म्हणून सांप्रदायिकांनीं शुद्ध संकल्प करावा आणि संप्रदायाच्या भवितव्या-विषयीं निःशंक व्हावें.

(८) संप्रदायाचें भवितव्य निश्चित असल्यामुळें आम्हां सामान्य पण निष्ठावंत माणसांपासून श्रीसमर्थ इतकी च अपेक्षा करितात कीं, आम्ही एक च एक शुद्ध संकल्प करून संघटित व्हावें. या च हेतूनें शके १८६१ च्या ज्येष्ठ शु. १४ स **श्रीसमर्थसंघ** स्थापण्यांत आला आहे, कांहीं थोड्या ठिकाणीं त्याच्या शाखा निघाल्या आहेत व आणखी शतपट निघाल्या पाहिजेत. श्रीसमर्थ-संघाचा सारखा विस्तार होत गेला पाहिजे. श्रीसमर्थांविषयीं निस्सीम प्रेमादर बाळगणाऱ्या हजारों व्यक्ति—स्त्रिया आणि पुरुष—महाराष्ट्रांत आहेत. किंबहुना असें म्हणतां येईल कीं, महाराष्ट्रांत अशी कोणती च जाणती व्यक्ति नसेल कीं जिच्या मनांत श्रीसमर्थांविषयीं प्रेमादर वसत नसेल. मी शेवटचें पुन्हां एकवार म्हणतों कीं, श्रीसमर्थसंप्रदायाचें भवितव्य ठरलेलें आहे आणि तें उज्ज्वल आहे. तें अन्यथा करणें कोणाच्या हातीं नाहीं. त्यांचे म्हणविणाऱ्या तुम्हाआम्हांकडे इतकें च उरलें कीं, प्रत्येक लहान मोठ्या गांवीं कोणी तरी एकानें मनावर घेऊन व इतरांचें सहकार्य मिळवून संघशाखा स्थापावी. अशा हजारों शाखा स्थापल्या जाव्या. श्रीसमर्थांनीं भरतखंडभर अकराशें मठ स्थापिले होते,

श्रीरामचंद्राला आळविण्यासाठीं. आपण त्याच्या दशपट श्रीसमर्थसंघशाखा स्थापिल्या पाहिजेत, श्रीसमर्थांना अवतार घेण्यास भाग पाडण्यासाठीं. श्रीसमर्थचरणीं महाराष्ट्राची निष्ठा असेल तर यांत अशक्य कांहीं नाहीं आणि अवघड हि नाहीं. कोणी कोणाची वाट पाहूं नये. कोणी कोणाकडे पाहूं नये. स्वत:कडे च पहावें, आपल्या सदिच्छेला विचारावें, श्रीसमर्थचरणांचें स्मरण करावें आणि कार्यास लागावें. संघाचें मुख्य स्वरूप ठरलेलें आहे, तें न बदलणारें आहे. बाकीचे कार्याकारण नियम, ज्या त्या गांवच्या परिस्थिती-प्रमाणें करण्यास प्रत्येक शाखेला स्वातंत्र्य आहे. संघाचें अबाधित स्वरूप पंचविध आहे, तें येणें प्रमाणें—

**( १ ) रामदासियांचा एक श्रीसमर्थसंघ असावा.**

**( २ ) श्रीसमर्थांच्या तत्त्वांचा विचार, आचार आणि प्रचार करणें हा या संघाचा उद्देश आहे.**

**( ३ ) श्रीसमर्थांना राष्ट्रगुरु मानणारी प्रत्येक व्यक्ति रामदासी होय.**

**( ४ ) प्रत्येक रामदासियाला संघाचे सभासद होतां येईल.**

**( ५ ) संघाच्या सभासदानें पाळावयाचे नियम**

**( रा ) श्रीसमर्थभक्तिप्रेम**
**( म ) श्रीसमर्थवाङ्मयाचें अवलोकन**
**( दा ) श्रीसमर्थचरित्रचिंतन**
**( स ) सदाचार**
**( क ) स्वधर्मरक्षण**
**(त्या) अखंड सावधानता**
**( ण ) संनिध असावा विचार**
**( भा ) साक्षेप**
**( म ) श्रीसमर्थांच्या आज्ञांचें यथाशक्ति पालन**

सबंध महाराष्ट्र राष्ट्रगुरु श्रीसमर्थ यांच्या शिक्षेखालीं यावा, असा या संघाचा हेतु आहे. सदाचार, स्वधर्मरक्षण, सद्विवेक, सावधानता, साक्षेप इत्यादि सद्गुणांनीं युक्त होऊन महाराष्ट्रजनता शीलसंपन्न व्हावी, असें या संघाच्या कार्याचें स्वरूप आहे. या गुणांची अपेक्षा सर्व च पक्ष करितात

त्यामुळें हा संघ पक्षातीत आहे, म्हणजे तो सर्व पक्षांचा आहे. सर्व पक्षांच्या लोकांना त्यांत हक्काचें स्थान आहे. श्रीसमर्थभक्तिप्रेम या एका सूत्रानें सर्व जण एकत्र बांधले जाणें शक्य आहे. ‘श्रीसमर्थांचा महाराष्ट्र’ म्हणून महाराष्ट्रास जगानें ओळखावें व त्याविषयीं आदर बाळगावा, अशी संघाला महत्त्वाकांक्षा असावी. महाराष्ट्राच्या मनावर कोणा तिऱ्हाइताचा अंमल चालूं शकत नाहीं, तो मनानें स्वतंत्र होता, स्वतंत्र आहे आणि यावच्चंद्रदिवाकरौ तसा च तो राहील, अशी त्याची प्रौढी आहे. तिचें अनुसंधान महाराष्ट्राकडून अखंड सांभाळिलें जावें, अशी या संघाच्या प्रचाराची दिशा असावी. धर्मरक्षण, दीनोद्धार, परोपकार, करारी बाणा, न्याय, नीति, हें महाराष्ट्राचें इतिहाससिद्ध लक्षण आहे; त्यापासून महाराष्ट्रानें केव्हां हि ढळूं नये, म्हणून हा संघ नेहमीं जागरूक राहील.

असें ज्या संघाचें स्वरूप आहे, त्यानें सारा महाराष्ट्र व्यापला जावा, अशी तीव्र इच्छा आहे. श्रीसमर्थचरणीं निष्ठा ठेवणारे लहान थोर लोक गांवोगांवीं आहेत, हें मला ठाऊक झालें आहे. त्यांपैकीं प्रत्येक गांवीं, कोणा तरी कार्यकर्त्यानें मनावर घेऊन आपल्या गांवीं संघाची शाखा स्थापून

**आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥**

या श्रीसमर्थांच्या आज्ञेचें पालन करावें, अशी माझी प्रार्थना आहे.

( ९ ) कोणी सांगावें, अशा प्रयत्नांतून च श्रीसमर्थकृपेला पात्र झालेले पुरुष उदयास येऊन श्रीसमर्थांनीं केलेला पूजनाचा आकल्प संकल्प सिद्धीस नेण्यास कारणीभूत होतील. भाग्योदयाची शंका नसली, तरी दुश्चित्तपणाचा धोका वाटतो. दुश्चित्तपणानें नाश होतो. म्हणून पडत्या काळीं धीर सोडूं नये, अन्यायाकडे वळूं नये, अधर्माला भुलूं नये, पूर्वजांची विस्मृति होऊं देऊं नये, अखंड सावधान असावें. श्रीसमर्थवचनावर पूर्ण विश्वास असूं द्यावा. ते जें सांगून गेले तें कालत्रयीं असत्य होणार नाहीं :

**समर्थमुखींचें वाक्य घडोनि येईल ।**
**कोण्ही येक ब्रह्मनिष्ठ धर्मिष्ठ राजा होईल ।**
**समस्त ग्रंथ पंथ शोधूनि पाहील ।**
**समर्थदेवें सांगितलें ॥** प्र. १८–५४

॥ श्रीरामसमर्थ ॥

# ग्रन्थाचा शेवट

(१) तीन मजली श्रीसमर्थचरित्रमंदिर, (२) आधीं कळस मग पाया रे, (३) सिंहावलोकन, (४) हा संप्रदाय जगाचा धर्म व्हावा, (५) तो सिद्ध झालेला उपाय आहे, (६) व्यक्तिगत कर्तव्य, (७) संप्रदायाचे आधारस्तंभ, (८) सांप्रदायिकांची जबाबदारी, (९) श्रीसमर्थांचें स्मरण हें च महाराष्ट्राचें जीवन, (१०) ग्रन्थाचा शेवट करण्यापूर्वी, (११) आम्ही लाचार आहोंत, (१२) आपणांस बिनशर्त शरण आहोंत, (१३) श्रीसमर्थ आशीर्वाद देतात.

**सरली शब्दाची खटपट। आला ग्रंथाचा शेवट।**
**येथें सांगितलें पष्ट। सद्गुरुभजन॥**

(१) श्रीसमर्थांच्या सेवेसाठीं तीन मंदिरें उभारलीं जावीं, अशी एके काळीं कल्पना केली: एक श्री क्षेत्र जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं **श्रीसमर्थमंदिर**, दुसरें धुळें येथें हजारों हस्तलिखित पोथ्यापुस्तकांच्या संरक्षणार्थ **श्रीसमर्थवाग्देवतामंदिर** आणि तिसरें, ज्याची इच्छा होईल त्याच्या घरीं ग्रन्थरूपानें **श्रीसमर्थचरित्रमंदिर.** हें तिसरें मंदिर तीनमजली व्हावें, असें मनांत आणलें: तळमजला **श्रीसमर्थावतार**, मधला मजला **श्रीसमर्थहृदय** आणि वरचा तिसरा मजला **श्रीसमर्थसंप्रदाय.** पहिला मजला अजून गुलदस्तांत च आहे, तों च आधीं दुसरा मजला उभारला गेला आणि आज या तिसऱ्या मजल्याचें हि काम पुरें करण्यांत येत आहे. यापुढें आतां पहिल्या मजल्याच्या कामांत सारखें गढून जावयाचें.

(२) हें सारें आधीं कळस मग पाया रे, अशासारखें होत आहे, पण तें हि एका अर्थी स्वाभाविक आहे. दुरून आधीं मंदिराचा कळस च दृष्टीस पडतो आणि अगदीं जवळ गेल्याशिवाय तळमजल्याचें दर्शन होत च नाहीं. दर्शनेच्छु भक्तांची फार गर्दी असली, तर अगदीं जवळ जाऊन दर्शन घेणें पुष्कळांना कठीण जातें, म्हणून ते कळसाच्या

दर्शनानें च आपलें समाधान मानून घेतात. मंदिराच्या कळसावरून हि विचारवंतांना सर्व मंदिराची कल्पना करतां येते. तात्पर्य, कळसाचें दर्शन कमी महत्त्वाचें नसतें. एकाद्या ग्रन्थापुरता विचार केला तर पुष्कळदां ग्रन्थाच्या कळसाध्यायांत सर्व ग्रंथाचें सार आलेलें असतें.

( ३ ) त्या पद्धतीला अनुसरून आपण येथें या खंडांतील विषयाचें किंचित् सिंहावलोकन करूं. पुष्कळ ग्रन्थकारांची अशी वहिवाट असते. ते शेवटच्या अध्यायांत सर्व ग्रन्थाचें अध्यायवार सार सांगत असतात. आपल्या समर्थांनीं एकवीससमासींत आणि रामायणांत ही पद्धति अनुसरली होती. आपण किंचित् अनुकरण करूं.

श्रीसमर्थांच्या ग्रन्थाधारें या ग्रन्थांत आपण संप्रदायाचें स्वरूप रेखाटलें आहे तें असें—

संप्रदायांत प्रवेश मिळण्यापूर्वीं ( १ ) मरणाचें स्मरण असावें, ( २ ) संसाराची असारता मनाला पटलेली असावी, ( ३ ) अनुताप उत्पन्न झाला पाहिजे आणि ( ४ ) स्नानसंध्यादि शुद्ध कर्माचरण घडावें.

मग श्रीसमर्थांना शरण जाऊन त्यांचा अनुग्रह मागावा. ते अनुग्रह करतात आणि संप्रदायांत आपला प्रवेश होतो.




असें या संप्रदायाचें स्वरूप आहे. त्याचें प्रतीक म्हणून ग्रन्थारंभीं त्रिमूर्तीचें एक चित्र दिलें आहे. त्यांत मध्यभागीं

**तो परमात्मा केवळ । तयास नाहीं मायामळ ।**
**अखंड हेतूचा विटाळ । जाला च नाहीं ॥**

**तो जनीं दिसतो परी वेगळा । वर्ततां भासे निराळा ।**
**दृश्य पदार्थ त्या निर्मळा । स्पर्शला च नाहीं ॥**

त्या निर्मल परमात्म्याची प्रतिमा असून तिच्या उजव्या बाजूला

**शिवराजाचें कैसें बोलणें । शिवराजाचें कैसें चालणें ।**
**शिवराजाची सलगी देणें । कैसी आहे ॥**

असें ज्यांचें श्रीसमर्थांनीं पुत्रवत् कौतुक करावें, ते श्री छत्रपति शिवाजी महाराज, संप्रदायाच्या राजकारण अंगाचे प्रतिनिधि म्हणून आहेत व डाव्या बाजूला

**श्रीरामदाससेवारत जो भरतावतार कल्याण ।**
**दुर्वार कामसिंहीं ज्या वीरें घातलें चि पल्याण ॥**

असा ज्यांचा महाराष्ट्रकविवर्यांनीं गौरव केला आहे, ते श्री कल्याण स्वामी, संप्रदायाच्या धर्मकारण अंगाचे प्रतिनिधि म्हणून आहेत. श्रीसमर्थांचा उजवा पाय पुढें पडलेला आहे. पुढें पडलेला उजवा पाय राजकारणाची प्रवृत्ति सुचवितो. या त्रिमूर्तींच्या मूळ प्रतिमा श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत पहावयास मिळतात. ही संप्रदायाच्या सचित्र दर्शनाची कल्पना चिरंजीवांनीं सुचविली व ती त्यांनीं च पार पाडली.

श्रीसमर्थग्रन्थाधारें हें जें आपण त्यांच्या संप्रदायाचें स्वरूप ठरविलें, त्याला श्रीसमर्थशिष्यप्रशिष्यांची संमति असल्याचें नंतर एका प्रकरणांत आपण दाखविलें आहे. नंतर तीन प्रकरणांत क्रमशः संप्रदायाच्या तत्कालीन स्वरूपाचें वर्णन केलें आहे, हल्लींची दुर्दशा सर्वांस दिसत च आहे, तिचीं कारणें शोधिलीं आहेत आणि शेवटच्या प्रकरणांत संप्रदायाच्या भवितव्याची कल्पना केली असून, काय केलें असतां ती कल्पना सफल होईल, तें सुचविलें आहे.

या एकंदर विवेचनांतील तीन मुद्दे माझ्या मनांत विशेष भरतात, मला विशेष चिंतनीय वाटतात, त्यांच्याकडे, सिंहावलोकनाचें निमित्त करून मी आपणा सर्वांचें लक्ष वेधून घेऊं इच्छितों :

( श्री ) काय वाटेल तो प्रयत्न करून, प्राण च देण्याचें तेवढें शिल्लक ठेवून, बाकी सर्व अट्टहास करून, **राम आपलासा करून घ्यावा.**

( रा ) तो राम सर्वत्र आहे, सर्व प्राणीमात्रांत आहे, साऱ्या विश्वांत

भरलेला आहे. तो आपलासा करून घेण्याला आरंभ '**तोषवावी कोणी तरी काया**' येथून करावा. सर्व सुखी असावे, अशी वासना असावी, परपीडेवरी अंतःकरण नसावें, राम कैवारी होण्याचें मूळ भूतदयेंत आहे.

( म ) एक च एक ध्येय डोळयांपुढें ठेवून, श्रीसमर्थांची कृपा संपादन करण्यासाठीं **सर्वांनीं संघटित प्रयत्न करावा.**

असें या ग्रन्थाचें थोडक्यांत स्वरूप आहे.

( ४ ) या खंडांत श्रीसमर्थांच्या कतृत्वाची सीमा झालेली आपल्या पाहण्यांत येत आहे. श्रीसमर्थचरित्रमंदिराच्या या कळसाचें दर्शन घ्यावें, त्यावर चित्त स्थिर करावें आणि त्या महापुरुषाच्या जीवनाची कल्पना करावी. सारें जग सारखें सुखी असावें, कोणाच्या हि सुखाच्या आड कोणी येऊं नये, ऐहिक आणि पारमार्थिक परमोच्च स्थान गांठण्याची संधी प्रत्येक व्यक्तीला, समाजाला आणि राष्ट्राला असावी, अशी त्या जीवाला तळमळ वाटे. नुसत्या जगाची च नव्हे, तर साऱ्या विश्वाची चिंता त्या जीवानें केली. त्या ध्येयाच्या सिद्धीसाठीं हा संप्रदाय प्रवृत्त झाला. त्याला ते शुद्ध मार्ग म्हणत. त्याचें विवेचन, त्यांच्या ग्रन्थाधारें येथवर करण्यांत आलें. त्यांच्या वाङ्मयाचा मी जो अर्थ लावीत आहे तो बरोबर आहे ना, मी चुकत असेन तर सांगा, असें मधून मधून त्यांच्या शिष्यप्रशिष्यांना विचारीत आणि त्यांची संमति मिळवीत गेलों. बरोबर आहे, अशी त्यांची अनुमति मिळाली, म्हणजे माझें समाधान व्हावें. माझ्या विधानांना आधारभूत असलेलीं श्रीसमर्थांचीं वचनें व शिष्यप्रशिष्यांचीं संमतिवचनें ठिकठिकाणीं सादर करण्यांत आलीं आहेत. चरित्राच्या या दोन खंडांचें तरी हें वैशिष्टय दिसतें कीं, त्यांत आधारावांचून कोणतें हि विधान सहसा करण्यांत आलें नाहीं व ते आधार बहुधा उधार ठेवलेले नाहींत. या वाङ्मयाचा मी जो अर्थ लावला आहे, तो बरोबर असेल तर, महाराष्ट्र मोठ्या अभिमानानें जगास सांगूं शकेल कीं, श्रीसमर्थांचा शुद्ध मार्ग हा च जगाच्या कल्याणाचा निश्चित मार्ग होय. तुम्ही जगाच्या कल्याणाचा मार्ग शोधीत आहां, पण हा येथें श्रीसमर्थांचा सिद्ध झालेला मार्ग आहे. जगाचा धर्म कोणता असावा, कोणता म्हणण्यापेक्षां कसा असावा, याचा विचार करण्यासाठीं चार हि खंडांतील थोर पुरुष जेव्हां केव्हां एकत्र जमतील, तेव्हां त्यांना

**नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।**
**याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥**

हें श्रीसमर्थांनीं प्रतिपादिलेलें उपासनेचें लक्षण जागतिक धर्माचा पाया होय, हें मान्य करावें लागेल. असा विचार करण्याची वेळ केव्हां तरी आली च पाहिजे. विचारी लोकांचें लक्ष त्याकडे जाण्यास आणखी फार तर एकाद दुसरें जागतिक युद्ध व्हावें लागेल. पण जग हें केव्हां तरी शुद्धीवर येणार च. तेव्हां श्रीसमर्थांच्या विश्वव्यापक उपासनेचा जग विचार करील. जागतिक धर्माचें हें मूलभूत तत्त्व स्वीकारलें म्हणजे धर्मकलह, अर्थकलह अशक्य होतील, इतकें च नव्हे, तर कोणत्या च कलहाला जागा राहणार नाहीं.

महाराष्ट्रधर्म राखावा आणि वाढवावा, तो असा. पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, या चार हि दिशांच्या सर्व देशांना या धर्माच्या झेंड्याखालीं आणण्याची महत्त्वाकांक्षा सांप्रदायिकांनीं बाळगावी. त्यांत च जगाचें कल्याण आहे. तर च जगाला सुख, समाधान आणि शांति यांची खरीखुरी प्राप्ति होणार आहे.

जगाचें जग पाहील. महाराष्ट्रियांनीं भरतखंडापुरता आणि त्यांत हि महाराष्ट्रापुरता विचार करावा. या तत्त्वज्ञानाचा प्रसार महाराष्ट्राबाहेर होऊं लागला आहे, असें माझ्या निदर्शनास आलेलें आहे. श्रीसमर्थवाङ्मयाचा अभ्यास इतर प्रांतांतील मंडळींनीं चालविला आहे. तें वाङ्मय मुळांतून आपणांस वाचतां यावें म्हणून त्यांनीं मराठी भाषेचा अभ्यास सुरू केला आहे.

(५) असा हा इहपरलोकींचें कल्याण साधून देणारा श्रीसमर्थांचा शुद्ध मार्ग आहे. या मार्गानें जाऊन महाराष्ट्रानें एकवार आपलें कल्याण करून घेतलें आहे. आपण राष्ट्रकल्याणासाठीं अनेक उपाय योजीत असतो. ज्याला जो उपाय वाटतो, तो तो उपाय आग्रहानें सुचवीत असतो. पण ते सारे उपाय प्रयोगावस्थेंतील आहेत. ते असिद्ध आहेत. श्रीसमर्थांचा उपाय सिद्ध झालेला आहे. त्या मार्गानें जाऊन जगाला ताळ्यावर आणणें सांप्रदायिकांचें कर्तव्य होय. त्यांच्यावर ही मोठी जबाबदारी आहे. ती त्यांनीं पार पाडली पाहिजे.

(६) आज आमचा हात धरून किंवा कान धरून आम्हांस ठिकाणावर आणण्याचें सामर्थ्य कोणांत नाहीं. आपणांस संघटित होतां न

आलें, तर प्रत्येक व्यक्तीनें एकएकट्यानें कार्यास लागावें, उद्धरेत् आत्मनात्मानम्, अशी वेळ आज आली आहे. श्री छत्रपति राजाराम महाराज जिंजीस गेले असतां, असा प्रसंग महाराष्ट्रावर राजकारणांत येऊन गेलेला आहे. आज तसा प्रसंग धर्मकारणांत आपणांवर आला आहे. पण अशा प्रसंगीं प्रत्येकानें कसें वागावें, याचा धडा त्या वेळीं राजकारणापुरता मिळाला, तो च आज धर्मकारणापुरता प्रत्येकानें गिरवावयाचा आहे. ही परिस्थिति ज्याला जाणवली असेल, त्यानें आपल्या जागीं राहून काम करावें, सर्वांना एकत्र करणारा पुरुष कालांतरानें उदयास येईल. पुढील काळावर नजर ठेवून प्रत्येकानें वागलें पाहिजे. श्रीसमर्थांच्या उपदेशाचा केव्हां हि विसर पडूं देऊं नये, ते कृपा करतील, हा विश्वास असूं द्यावा. मी म्हणत असतों कीं, त्रेतायुगीं होऊन गेलेल्या श्रीरामाची जर ते कृपा संपादन करूं शकले, प्रत्यक्ष श्रीरामलक्ष्मणांनीं त्यांचे शरीररक्षक होऊन रानांत आणि वनांत, सतत सर्वत्र त्यांचें रक्षण केलें, तर अवघ्या तीनशें वर्षांमागें होऊन गेलेल्या त्या च श्रीरामाच्या दासाची कृपादृष्टी महाराष्ट्राकडे वळवून घेणें अशक्य आहे, असें आपणांस कां वाटावें ? रामाची कृपा संपादन करण्यासाठीं त्यांनीं जे कष्ट केले, ते च कष्ट त्यांची कृपा व्हावी म्हणून आपण केले पाहिजेत.

(७) कष्ट करणें आपणांकडे, कृपा करणें त्यांच्या कडे. कृपा करतील हा विश्वास मात्र वाटतो. श्रीसमर्थ आपल्या शिष्यांना, तुम्ही सिंहाचे बच्चे आहांत, असें म्हणून धीर देत आणि कार्याला प्रवृत्त करीत. राम आपलासा करून घ्या, यश निश्चित आहे, म्हणून सांगत. आपणांकडे पहा, म्हणत. आपला शब्द रामानें कधीं खालीं पडूं दिला च नाहीं. भक्ताचे मनोरथ पूर्ण करणें हें रामाचें ब्रीद आहे, तें आपल्या प्रत्ययास आलें आहे, इतकें च नव्हे, तर त्यांचें ब्रीद आतां मला प्राप्त झालें आहे, मग तुम्ही कां भिता, कां मागें पाय घेता, विश्वास ठेवा, निस्सीम विश्वास, किती निस्सीम तें अनेकदां सांगून झालें आहे, आकाश कोसळोन पडलें तरी मार्गापासून ढळूं नका. या संप्रदायाचे कैवारी राम आहेत, साहाय्यकर्ते हनुमंत आहेत आणि चिंता वाहणारे समर्थ आहेत.

(८) एवढा आधार असल्यावर सांप्रदायिकांनीं मोठ्या उत्साहानें संप्रदायाच्या कार्याला स्वतःला वाहून घेतलें पाहिजे. स्वतःच्या उद्धारासाठीं,

आत्मीयांच्या कल्याणासाठीं, स्वदेशाच्या हितासाठीं, स्वधर्माच्या रक्षणासाठीं, मानवजातीच्या बऱ्यासाठीं, जगाच्या सुस्थितीसाठीं या विश्वव्यापक संप्रदायाचा स्वीकार सर्वांनीं करून त्याच्या सेवेला लागावें. सांप्रदायिक म्हटला म्हणजे त्याच्या ठिकाणीं भूतदया असावी, त्यानें सदाचार पाळावा, स्वार्थ सोडावा, त्यागवृत्ति बाणून घ्यावी, परोपकाराविषयीं सदा तत्पर असावें, समाधान राखावें, स्वरूपसाक्षात्कार अनुभवावा.

(श्री) त्यानें श्रीसमर्थवाङ्मयमूर्ति हृदयीं धरावी. त्या वाङ्मयाचें परिशीलन करावें. तें वाङ्मय (१) धर्म आणि राष्ट्र यांची सेवा करण्याची स्फूर्ति देणारें, (२) कर्तव्याचा अचूक मार्ग दाखविणारें, (३) सन्मार्गापासून लवमात्र ढळूं न देणारें, (४) मनाला सतत उल्हसित करणारें, (५) हृदयाला सद्गुरुभक्तिप्रेमानें उचंबळून सोडणारें, (६) ज्ञानवैराग्यसामर्थ्य यांचा लाभ करून देणारें, असें आहे. अशा या वाङ्मयाचा छंद सर्वांनीं घ्यावा; बाळांनीं घ्यावा, तरुणांनीं घ्यावा, वृद्धांनीं घ्यावा; स्त्रियांनीं घ्यावा, पुरुषांनीं घ्यावा; ब्राह्मणांनीं घ्यावा, क्षत्रियांनीं घ्यावा; चारी वर्णांच्या आणि चारी आश्रमांच्या लोकांनीं घ्यावा; राजांनीं घ्यावा, प्रजाजनांनीं घ्यावा; आपलें राज्य सतत टिकावें, असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं घ्यावा आणि गेलेलें राज्य ज्यांना परत मिळवावयाचें असेल त्यांनीं हि घ्यावा. असें हें वाङ्मय विश्वकल्याणकारी आहे.

(रा) त्यानें संप्रदायाची त्रिस्थळी यात्रा केली पाहिजे. जांब, चाफळ, सज्जनगड, ही संप्रदायाची त्रिस्थळी होय. जांब ही श्रीसमर्थांची जन्मभूमि, चाफळ ही कर्मभूमि आणि सज्जनगड ही विश्रांतिभूमि होय. या तिन्ही ठिकाणांकडे सांप्रदायिकांचें सारखें लक्ष असावें. त्या तिन्ही ठिकाणीं श्रीसमर्थ नांदत आहेत. जांबेस मार्गशीर्ष शु. ११ करावी, चाफळास चैत्र शु. ९ स जावें आणि गडावर माघ वद्य ९ ची पुण्यतिथि साजरी करावी. वाटल्यास चैत्र शु. ९ स एकदा चाफळास जावें व एकदा जांबेस जावें, कारण श्रीराम आणि श्रीसमर्थ यांची जन्मतिथि आणि जन्मघटिका अगदीं एक च असल्यामुळें मधून मधून जन्मतिथीस जांबेस जाणें इष्ट होय. मला कोणी विचारील कीं, आपणांस तिन्हीं ठिकाणीं जाणें शक्य नाहीं, एका कोणत्या तरी ठिकाणीं जाऊं शकेन, तर कोठें जाऊं सांगा. या प्रश्नाचें

उत्तर देण्याला मला वेळ लागणार नाहीं. पण मी कोणतें ठिकाण सांगेन याविषयीं तुम्ही जो तर्क कराल, तो मात्र सर्वांचा चुकेल. एका च ठिकाणीं जावयाचें तर चाफळास श्रीरामनवमीस जात जा. श्रीसमर्थ हि तुम्हांस असें च सांगते. चाफळास श्रीराम आहेत. ती समर्थांची कर्मभूमि आहे. तुम्हांस विश्रांति घ्यावयाची नाहीं, कर्में करावयाचीं आहेत. चाफळास जात जा. तेथून संप्रदाय जगभर प्रसृत झाला. तेथें प्रतापमारुतीपाशीं जाऊन एकांतांत बसत जा, चिंतन करा, श्रीसमर्थ डोंगरांत रहात, तेथें जाऊन ध्यान करा, गडबडा लोळा, उतावीळ व्हा, श्रीसमर्थ कृपा करतील. या तिन्ही ठिकाणीं तुम्ही जाल च, पण याशिवाय, त्यांनीं स्थापिलेल्या मारुतीचीं स्थानें त्यांच्या घळी, त्यांच्या शिष्यप्रशिष्यांचे मठ, वगैरे त्यांच्या संबंधाचीं सर्व स्थळें पाहिल्यावांचून राहूं नका.

(म) सांप्रदायिक म्हटला म्हणजे त्यानें आतांपर्यंत झालेल्या संशोधनाची माहिती करून घेऊन पुढें अखंड संशोधन चालू ठेवलें पाहिजे. श्रीसमर्थचरित्रग्रन्थसंप्रदायादिविषयक संशोधन पुरें कधीं च व्हावयाचें नाहीं, हें मी सांगतों, तें कृपा करून ऐकून ठेवा आणि संशोधनकार्यांत केव्हां हि खंड पडूं देऊं नका. संशोधनांत काय ब्रह्मानंद असतो, त्याचा अनुभव घ्या.

(दा) सांप्रदायिक म्हटला म्हणजे तो श्रीसमर्थसंघाचा सभासद असावा, तो रहात असेल तेथें त्यानें संघाची शाखा स्थापावी, त्याला अनुकूलता असेल तर त्यानें इतर ठिकाणीं शाखा काढण्याविषयीं प्रयत्न करावा. महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेर मिळून हजारों शाखा निघाल्या पाहिजेत, हें त्यानें लक्ष्यांत ठेवावें. श्रीसमर्थांची कृपादृष्टि पुनरपि महाराष्ट्राकडे वळावी, हा सर्वांचा हेतु आहे. तो एरव्हीं कसा साध्य व्हावा ?

(स) पुढें काय करावयाचें ? इतकें सर्व आपण मनोभावानें केलें, म्हणजे पुढें काय करावयाचें, तें श्रीसमर्थ च आपणांस सांगतील.

या सर्व गोष्टी वृद्धांपेक्षां तरुणांनीं च करावयाच्या आहेत. तरुणांच्या पुढें पुष्कळ काळ पसरलेला असतो. वृद्ध शेवटच्या मुक्कामाजवळ जाऊन पोंचलेले असतात. मजसारख्या वृद्धाची गणना आतां मेलेल्यांत करण्यांत यावी. आमच्या हातून यापुढें काय होणार आहे ? श्रीसमर्थकार्याचा अभिमान

तरुणांनीं बाळगावा आणि आपलें आणि आपल्या सर्वांचें, आपल्या समाजाचें आणि राष्ट्राचें जीवन सुखमय करावें.

(९) या सर्व कार्याच्या बुडाशीं माझा एक सिद्धान्त आहे. आयुष्यांत श्रीसमर्थवाङ्मयाचा जो कांहीं थोडा परिचय घडला, महाराष्ट्राचा पूर्व इतिहास जो अल्पस्वल्प पाहण्यांत आला, महाराष्ट्राची विद्यमान स्थिति अवलोकन करून ज्या कांहीं कल्पना झाल्या, त्यावरून मी माझ्या मनाशीं सिद्धांत ठरविला कीं, श्रीसमर्थांचें अखंड स्मरण हें च महाराष्ट्राचें जीवन होय. त्यांचें विस्मरण म्हणजे महाराष्ट्राचें मरण च. आपण सर्व जण जाणता कीं, सुमारें तीनशें वर्षांमागें काळ मोठा कठीण आला होता. हें राष्ट्र आणि त्याचा धर्म हीं बुडण्याची वेळ येऊन ठेपली होती. समाज अत्यंत अधोगतीला जाऊन पोचला होता. आपल्या आयाबहिणींच्या अब्रूचें रक्षण करण्याचें हि सामर्थ्य जनतेंत उरलें नव्हतें. त्या स्थितीचें प्रत्यक्ष वर्णन श्रीसमर्थांनीं आपल्या अस्मानी-सुलतानी प्रकरणांत केलेलें सर्वांना श्रुत च आहे, पण त्यांनीं केलेल्या श्रीरामाच्या प्रार्थनेवरून हि तत्कालीन स्थितीची आपणांस कल्पना होणार आहे. प्रार्थनेचें तें पद अगदीं लहान आहे, पण त्यांत, जनस्थिति पाहून श्रीसमर्थांचें अंतःकरण किती विव्हल होत असे, तें आपणांस स्पष्ट दिसत आहे. त्या पदांत त्यांच्या अंतःकरणाची तळमळ स्पष्ट उमटलेली आहे. आज हि तें पद प्रत्येकानें प्रत्यहीं श्रीरामापुढें उभे राहून म्हणावें, इतकें तें आजच्या काळाला हि लागू पडणारें आहे. तें पद हृदयग्रन्थांत आलेलें असणार च. शिवाय तें सर्वांच्या पाठांत हि असणार. क्वचित् कोणाच्या नसल्यास, असावें म्हणून येथें देतों :

### श्रीसमर्थांनीं श्रीरामाची केलेली प्रार्थना

**कल्याण करीं देवराया । जनहित विवरीं ॥ ध्रु० ॥**
**तळमळ तळमळ होत चि आहे । हे जन हातिं धरीं ॥ १**
**अपराधी जन चुकत चि गेले । तुझा तूं चि सांवरीं ॥ २**
**कठीण त्यावरि कठीण जाले । आतां न दिसे उरी ॥ ३**
**कोठें जावें काय करावें । आरंभिली बोहरी ॥ ४**
**दास म्हणे आम्ही केलें पावलों । दयेसि नाहीं सरी ॥ ५**
**कल्याण करीं देवराया । जनहित विवरीं ॥ ध्रु० ॥**

१ बाकी, ठावठिकाण, धडगत २ देशोधडी, हद्दपारी, सत्यानास

ही स्थिति कशी पालटावी, काय करावें, कोठें जावें, सुचेनासें होऊन श्रीसमर्थ श्रीरामाला आळवीत आहेत, आम्ही आमच्या च कर्माचीं फळें भोगीत आहोंत, अशी कबुली देऊन, सर्वांच्या कल्याणासाठीं रामापाशीं दयेची याचना करीत आहेत.

श्रीसमर्थांची पुण्याई थोर, रामाला दया आली, त्यानें श्रीसमर्थांवर कृपा केली आणि त्या कृपेच्या बळावर श्रीसमर्थांच्या ठिकाणीं इतका दांडगा आत्मविश्वास उत्पन्न झाला कीं, त्यांना सारें त्रिभुवन ठेंगणें वाटूं लागलें.

**रामाचेनि स्वामींपणें । मी हें ब्रह्मांड मानी ठेंगणें ॥**

**राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥**

असे किती तरी आत्मविश्वासाचे उद्गार त्यांनीं काढले आहेत.

याच्या पुढचा सारा इतिहास तुम्ही जाणत च आहां.

म्हणून मी माझ्या मनाशीं सिद्धान्त ठरविला आणि तुम्हा सर्वांची—चिकित्सकांची आणि भाविकांची—क्षमा मागून तो च आज तुम्हांस सांगतों कीं, श्रीसमर्थांचें स्मरण हें च महाराष्ट्राचें जीवन होय. श्रीसमर्थांचें विस्मरण म्हणजे महाराष्ट्राचें मरण च. श्रीसमर्थांचें चरित्र आठवून आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाचें चिंतन करून, श्रीसमर्थकालीन देशस्थितीची कल्पना करून व तिची प्रस्तुतच्या स्थितीशीं तुलना करून मी निःशंकपणें म्हणूं शकतों कीं, महाराष्ट्र श्रीसमर्थांचें अखंड स्मरण ठेवील तर तो अमर होईल, त्यास कोणी हि तुडवूं कीं बुडवूं शकणार नाहीं. जगांत अशी कोणती हि शक्ति नाहीं, कीं जी श्रीसमर्थांच्या महाराष्ट्राला जगांतून उठवून लावील.

पण, श्रीसमर्थांचें स्मरण ठेवावयाचें म्हणजे काय करावयाचें ?

**रामदास चतुराक्षरि मंत्र जप वारंवार ।**
**दुस्तरतरभवसागरतारक सच्चित्सुखसार ॥**

असें प्रत्यक्ष श्रीसमर्थपंचायतनांतील राजयोगी निगडीकर श्रीरंगनाथस्वामी सांगतात, त्याप्रमाणें 'रामदास रामदास' असा चतुराक्षरी मंत्र सारखा जपल्यानें श्रीसमर्थांचें स्मरण केलें, असें होईल काय ?

**गुरुराज महाराज जय जय ।**
**रामदास महाराज जय जय ।**

हें किंवा अशासारखें दुसरें एकादें भजन सतत करीत राहिलें, तर त्यांचें स्मरण केल्याचें जें फळ असेल, तें आमच्या पदरीं पडेल काय ?

**आदिनारायणं विष्णुं ब्रह्माणं च वशिष्ठकं ।**
**श्रीरामं मारुतिं वंदे रामदासं जगद्गुरुम् ॥**

अशी परंपरा नित्य आठवीत राहिल्यानें भागेल काय ?

या तिन्ही प्रश्नांना माझें पटकन उत्तर, हो, होईल, पडेल, भागेल, असें च आहे. मंत्र जपल्यानें, भजन केल्यानें, परंपरा आठवल्यानें स्वतःपुरता स्मरणाचा कार्यभाग साधेल, पण त्याच्या जोडीला आणखी कांहीं केलें, म्हणजे त्यांत आपल्या बरोबर सर्वांचें च कल्याण आहे.

आणखी काय करावें ?

मंत्र, भजन, परंपरा, यांच्या पाठीशीं जें त्यांचें अपूर्व चरित्र आहे, जें तत्त्वज्ञान आहे, जी शिकवण आहे, ती पाहिली पाहिजे. एक च गोष्ट सांगतों. मला वाटत नाहीं, महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या दुसऱ्या कोणत्या हि सत्पुरुषानें आपल्या पूर्वींचा चार पांच शतकांचा इतिहास पाहून राष्ट्रास अखंड सावधानतेचा इषारा दिला होता ! असा इषारा एकट्या श्रीसमर्थांनीं च दिलेला आढळतो ! अर्थात् श्रीसमर्थांचें स्मरण करावयाचें म्हणजे राष्ट्रांत बहुतां दिसांचें जें बंड माजून राहिलें होतें, त्याचा हि विचार, त्यांच्या इषाऱ्याप्रमाणें, मनांत आला पाहिजे. त्याकडे दुर्लक्ष केलें तर घात होईल.

तसें च मला असें हि वाटतें कीं, श्री छत्रपति शिवाजी महाराज यांच्यावर कृपा करून श्रीसमर्थांनीं भावी काळांतील आपल्या धोरणाचा पाया घातला. १५६७ पासून १८६७ पर्यंत, आज त्यास बरोबर तीनशें वर्षें झालीं. त्या पायाचा आणि त्यावर उभारलेल्या मराठी साम्राज्याचा आणि त्याच्या अंताचा हि इतिहास आपण अवलोकिला पाहिजे.

तात्पर्य, श्रीसमर्थांच्या पूर्वींचीं चार पांच शतकें, खुद्द त्यांच्या हयातीचा ७३ वर्षें, १० महिने, १९ दिवसांचा काळ आणि त्यांच्या पश्चातचा चालू घटकेपर्यंतचा, १८६७ उणें १६०३, बरोबर २६४ वर्षांचा काळ, या सर्व काळांतील इतिहासाचा खोल अभ्यास करणें, कारणें शोधणें, अनुमानें

काढणें, आत्मोद्धाराचे उपाय सुचविणें, ते अंमलांत आणणें, इत्यादि सर्व प्रकार श्रीसमर्थांच्या स्मरणांत मोडतात.

तथापि, हें खरें आहे कीं, या सातशें आठशें वर्षांतील अत्यंत महत्त्वाचा काळ म्हणजे श्रीसमर्थांच्या हयातीचा होय. त्या काळांत त्यांनीं ज्या अद्भुत लीला केल्या, जो प्रचंड व्याप केला, जो बहुमोल उपदेश केला, जें श्रेष्ठ प्रतीचें तत्त्वज्ञान प्रतिपादिलें, आत्मकल्याणाच्या ज्या हजारों विधिनिषेधात्मक आज्ञा केल्या, जो दैवी संप्रदाय प्रवर्तित केला, या सर्व गोष्टींचें प्रेमादरानें चिंतन करणें आपलें आद्य आणि पवित्र कर्तव्य आहे. तें करणें म्हणजे च श्रीसमर्थांचें खरें स्मरण करणें होय.

( १० ) आतां ग्रंथाचा शेवट करण्यापूर्वी फार थोडें काम उरलें आहे. प्रथम आमची लाचारी प्रकट करून मेरुस्वामींच्या शब्दांत श्रीसमर्थांची प्रार्थना करूं, त्यावर श्रीसमर्थांचें म्हणणें काय पडतें तें आदरानें ऐकून घेऊन तें हृदयावर कोरून ठेवूं आणि नंतर आम्हांस जो कांहीं निश्चय करावासा वाटेल, तो श्रीसमर्थांच्या सेवेसीं सादर करून व ग्रंथ त्यांचे चरणीं अर्पण करून त्यांचा आशीवाद घेऊं.

( ११ ) आम्ही लाचार आहोंत. आमच्यांत कोणता च गुण नाहीं. कल्याणांची सेवावृत्ति नाहीं, उद्धवांचा निश्चय नाहीं, दिनकरांची विद्वत्ता नाहीं, दिवाकरांचें बुद्धिवैभव नाहीं, पराक्रमाची तर गोष्ट च बोलावयास नको, रामचंद्र नीळकंठांचें चातुर्य नाहीं ! आहे च काय आम्हांत ? भोळारामांची श्रद्धा असती तरी आम्ही कृतार्थ झालों असतों. मग आम्ही जी आशा करून आहोंत, तिला आधार काय ? तिला आधार केवळ आमच्या इच्छाशक्तीचा. आमची तीव्र इच्छा आहे, आपणांस पहावें, आपला अवतार व्हावा, आपल्या कारणीं आमचा देह पडावा. आमची इच्छा आहे, पुनरपि रामराज्य प्रस्थापित व्हावें, धर्माची प्रतिष्ठा रहावी, गोब्राह्मणांचें पालन व्हावें, स्त्रियांना निर्भयता वाटावी, अवघे सुखी असावेत. म्हणून मेरुस्वामींना पुढें करून आम्ही आपली प्रार्थना करतों.

रामसोहळ्याच्या प्रथम रुद्राच्या अकराव्या उल्लासांत मेरुस्वामींनीं १ ते ५२ ओवीपर्यंत श्रीसमर्थांचें अर्चन केलें आहे. अति प्रेमळ आहे. त्या अर्चनानंतर

**पुढती करूनियां नमन। मागितलें आश्वासन।**
**जें आठवितां चि दर्शन। द्यावें अंतरस्थितीनें॥ ५३**

आपण मनांत आणूं तेव्हां आपली मूर्ति माझ्या हृदयांत प्रकट व्हावी, असें मेरुस्वामींनीं श्रीसमर्थांपाशीं आश्वासन मागितलें आणि श्रीसमर्थांनीं कृपाळुपणें तें तत्काळ दिलें हि.

**परमकृपाळ सदयहृदय। माथां कर ठेऊनि कृपान्वयें।**
**दिल्हें वरदान अभय। मनोरथसिद्धीनें॥ ५४**

असें अभय देऊन श्रीसमर्थांनीं मेरुस्वामीस जें रहस्य सांगितलें आहे, तें च तुम्हां आम्हांस हि आहे, असें मानून आपण तें आमरण आपल्या हृदयावर कोरून ठेवूं—

**मागुतेन कृपेनें श्रवणीं। रहस्य सांगितलें समर्थांनीं।**
**जे सर्वस्वें आर्जवीं[1] भजनीं। कोदंडपाणिविग्रह[2]॥ ५५**

**जें कां ध्येय सदाशिवाचें। परम जाप्य जापकाचें।**
**सिद्धसाधुऋषीचें। आराध्य दैवत॥ ५६**

**जें निजजीवन जीवांचें। जें हृदय सर्व निगमाचें।**
**जें कुलदैवत विरक्तांचें। आर्जवीं तया॥ ५७**

**परम पवित्र अवतारचरित्र। परत्रगतीचें सत्क्षेत्र।**
**स्वयंभसाक्षात्कारीं स्वतंत्र। न विसंबे तयासी॥ ५८**

**रामा ऐसें दैवत कैंचें। अवतरलें सभाग्य सृष्टीचें।**
**नाम चरित्र विख्यातीचें। पावन आधिदैवत॥ ५९**

**नलगे तत्त्वशोधन। न करणें अध्यात्मविवरण।**
**सर्वदा करी रामध्यान। सद्गदीत मानसें॥ ६०**

**राम घननीळ सांवळा। सकल प्रातीचा जिव्हाळा।**
**राहे जयाच्या ध्यान डोळां। तो चि कृतार्थ॥ ६१**

**सद्भावें श्रीरामस्मरण। करील तो चि ज्ञानी पावन।**
**काय करावें तें ब्रह्मज्ञान। रामीं प्रेम नसतां॥ ६२**

---

१ नम्रपणें प्रार्थना करून प्रसन्न करून घे. २ विग्रह म्हणजे तनु, देह, मूर्ति.

असें हें श्रीसमर्थांनीं सांगितलेलें रहस्य व केलेला उपदेश ऐकून मेरुस्वामी म्हणतात—

ऐसें समर्थें संबोधनीं। दृढाविलें रामभजनीं।
जैसें अर्भकासी जननी। क्षणक्षणां सिकवी॥ ६३

सकळ भक्तांचा कळवळा। सदय समर्थांची लीळा।
एकात्मतेचा जिव्हाळा। जीवापासूनि सांगणें॥ ६४

ऐसा समर्थ माझा उदार। जीवीं जडला निरंतर।
लागला समर्थवेध निर्धार। येणें चि सभाग्य आम्ही॥ ६५

आणि मग मेरुस्वामी श्रीसमर्थांच्या स्तवनास प्रवृत्त झाले आहेत. त्या स्तवनाच्या ओंव्यांत त्यांचें जें समर्थभक्तिप्रेम उचंबळून बाहेर पडलें आहे, तें पाहून आपण कांहीं बोध घेतला पाहिजे. तर च आपल्या हि भाग्याला कांहीं कमी पडणार नाहीं.

समर्थ माझी गतीची निजगती। समर्थ माझी प्रतीतीची प्रतीति।
समर्थ विश्रांतीची विश्रांति। जोडली मज॥ ६७

समर्थ माझी तारक जननी। समर्थ ज्ञानसंजीवनी।
समर्थ निजकृपेची खाणी। अवचट लाधलों॥ ६८

समर्थ माझी अमृतवाहिनी। समर्थ माझी स्वानंदभरणी।
समर्थ उन्मनीची निजउन्मनी। मज प्रत्यक्ष जाली॥ ६९

समर्थ कैवल्याची धरणी। समर्थलीला अकल करणी।
साच समर्थचरित्रश्रवणीं। चाकाटलें चित्त॥ ७०

समर्थवचनें चित्त चमत्कारे। समर्थविरक्तीनें विरक्ति भरे।
समर्थ विख्यातीनें अवतरे। निजांगीं उद्बोध॥ ७१

समर्थासी प्रशंसितां कोणी। मज्जे मन सुखाब्धिजीवनीं।
समर्थमूळपुरुषस्तवनीं। आदरें चि प्रवर्ते॥ ७२

समर्थ मज संकटीं सोडविता। समर्थ पावे मज आठवितां।
समर्थावांचूनि सर्वथा। इतर गती असेना॥ ७३

निजध्यास निश्चयेंसीं। वसोनि नित्य समर्थापासीं।
असतां समर्थ सहवासी। भाग्यासी काय उणें॥ ७४

असें सद्गुरुप्रेम असावें. तें भाग्याचें लक्षण होय. हा इतिहास आहे. भाविक असतील ते तो मानतील च, पण जे चिकित्सक असतील, त्यांनीं हि याचा विचार करावा. अशा भक्तांच्या भाग्यांत च संप्रदायाचें भाग्य आहे.

(१२) आतां काय उरलें ? कांहीं उरलें नाहीं. लिहिण्याचें हि कांहीं उरलें नाहीं आणि मजजवळ हि कांहीं उरलें नाहीं. नाहीं म्हणायला एक च उरलें आहे, पण तें माझ्या हातचें नाहीं. अशा मनस्थितींत श्रीसमर्थांना मी बिनशर्त शरण आहे. माझ्या कांहीं कांहीं शर्ती होत्या, पण त्या हि मी सोडून देत आहे, कारण सशर्त अंगिकार करण्यास श्रीसमर्थ तयार नाहींत. त्यांना माझी बिनशर्त शरणागति ( unconditional surrender ) पाहिजे आहे. त्यांचें पहिल्यापासून एक च म्हणणें, तूं आपलें कांहीं मानूं नकोस, हातचें कांहीं राखून ठेवूं नकोस, बिनशर्त शरण ये, म्हणजे आपण तुला तुझें मूळचें अढळ पद प्राप्त करून देऊं.

अरे तूं कोण कोणाचा । कोठून आलासी कैचा ।
ऐसा विवेक पूर्वींचा । घेईं बापा ॥ आत्मा० १-२५

अरे त्वां जन्मांतर घेतलें । काय मानितोसी आपुलें ।
ऐसे तुवां विचारिलें । पाहिजे आतां ॥ २६

येथें तुझें कोणी च नाहीं । भुलला आहेस काई ।
चुकोनी आलासी जाई । जेथीचा तेथें ॥ २७

तूं समर्थाचें लेंकरु । अभिमानें घेतला संसारु ।
अभिमान टाकितां पैलपारु । पावसील बापा ॥ २८

ईश्वरापासून जालासी । परी तूं तयासी चुकलासी ।
म्हणोनी हें दुःख भोगिसी । वेगळेपणें उत्कट ॥ २९

त्यागिसी सकळ वैभवाला । आणी विश्वाससी माझिया बोला ।
तरी मी घालीन रे तुजला । जेथील तेथें ॥ ३०

तुझें अढळ पद गेलें । तुज मायेनें वेढां लाविलें ।
तें जरी तुझें तुज दिधलें । तरी मज काय देसी ॥ ३१

जितुकें कांहीं नासोन जाईल । जें अशाश्वत असेल ।
तुज समागमें न येईल । तितुकें च द्यावें मज ॥ ३२

अशी बिनशर्त शरणागति श्रीसमर्थ मागतात. मी विचार केला, पूर्ण विश्वास वाटला आणि शरणागति मान्य केली. मान्य करितों कीं, प्रापंचिक आणि लौकिक बंधनें दूर सारून, निदान त्यांना दुय्यम स्थान देऊन उर्वरित आयुष्य सर्वस्वीं आपल्या चरणसेवेंत अर्पण करावयाचें. ग्रंथ संपला. तेव्हां

श्रीसमर्थासी रिघोनि शरण ।
ग्रंथ करितों तच्चरणार्पण ।
आतां ग्रंथाचें दूषण भूषण ।
सर्वस्वें त्यांचें त्यांसी ॥

( १३ ) श्रीसमर्थ आशीर्वाद देतात :

जें जें तुवां कांहीं केलें ।
तें तें सर्व आम्हां पावलें ।
तुजकडे त्यांतील कांहीं न उरलें ।
येणें तुज घडलें आत्मनिवेदन ॥ १

आतां जें जें असेल तुझें ईप्सित ।
तें तें प्राप्त होवो कीं समस्त ।
ऐसीं आशीर्वचनें होतां श्रुत ।
देह पडे निचेष्टित सद्गुरुपुढें ॥ २

श्रीसमर्थवाग्देवतामंदिर
धुळें
१८६७ अ० ज्येष्ठ शु.८

शंकर श्रीकृष्ण देव